हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास

# मराठी रियासत

६

## छत्रपति रामराजा

## ४ निग्राहक माधवराव

[ स. १७६१-१७७२ ]

लेखक

**गोविंद सखाराम सरदेसाई**, बी. ए.

केशव भिकाजी ढवळे, गिरगांव, मुंबई ४

किंमत रु. ४-००

# प्रस्तावना

रियासतींच्या उजळणीची मजल हलके हलके पुढें चालत असलेली पाहून मजप्रमाणेंच वाचकांनाही संतोष वाटेल. माधवराव पेशव्याचा हा भाग प्रथम स. १९२५ सालीं म्हणजे जवळ जवळ तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला, तेव्हांपासून प्रस्तुतकालपर्यंतच्या दीर्घ अवधींत इतिहाससंशोधन पुष्कळच वाढलें. नवीन साधनेंही विपुल निर्माण झालीं. पेशवे दप्तर, पर्शियन कॅलेंडर अशा मुख्य संग्रहांखेरीज पुरंदरे, हिंगणे, पेठे, सिंदे, होळकर, वैद्य अशा घराण्यांचीं बहुमोल दप्तरें, तशाच भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या विविध माला असे नवीन कागद प्रसिद्ध होऊन इतिहासाचा पूर्वीचा विस्तार व व्याप सर्व बदलून गेला. या वाढत्या साधनांची दखल घेऊन पूर्वीचें लिखाण दुरुस्त करण्याची तळमळ माझ्या अंतःकरणांत सारखी वागत होती. अशा स्थितींत योगायोगानें श्री० वि० सी० चितळे या निष्ठावंत अभ्यासकाचें साह्य मला मिळालें. त्यांच्याशीं वारंवार अनेक मुद्द्यांची चर्चा केल्यावर पूर्वीच्या आवृत्तींतील उणीवा तीव्रतेनें माझ्या नजरेस आल्या. मुख्यतः माधवरावाचा हा भाग मीं सर्वथा नवीन लिहिला तो सर्व हस्तलेख चितळे यांनीं काळजीपूर्वक वाचून उपयुक्त फरक सुचविले, याबद्दल त्यांचे उपकार मानणें व त्याचप्रमाणें त्यांच्या अकल्पित निधनानें होणारें दुःख व्यक्त करणें आज माझें मुख्य कर्तव्य बनलें आहे.

मराठ्यांच्या इतिहासांत माधवराव पेशव्याचा हा काल अनेक दृष्टींनीं उज्ज्वल व क्रान्तिकारक गणला जातो. यापूर्वी अनेकांनीं हा विषय हाताळलेला आहे. महाराष्ट्राबाहेरही कांहीं अभ्यासकांनीं त्यांत लक्ष घातलें आहे. भारतभूमींत इंग्रजी सत्तेचा आरंभ या कालांत झाला. क्लाइव्हनें बंगालची दिवाणी पैदा करून देशांत कंपनीचा अंमल कायम केला. हिंदी राजकारणाचें हें परिवर्तन इतिहासांत महत्त्वाचें होय. अनिलचंद्र बानर्जी या बंगाली अभ्यासकांनीं या पेशव्याचें विवेचक चरित्र स. १९४३ त इंग्रजींत प्रसिद्ध करून महाराष्ट्रेतरांस हा राजकारणी झगडा पटवून दिला. खुद्द मराठींत तर अनेक लहानमोठ्यांनीं या पेशव्याचें इतिवृत्त आपापल्यापरी वाचकांपुढें ठेवलें होतें. तथापि सर्वांगीण व अधिकृत असा या कालाचा आढावा अद्यापि निर्माण झालेला नाहीं. माधवरावाच्या कारभाराचा काल जरी दहा अकरा वर्षांचा अल्प असला, तरी

त्यांत हिंदी राजकारणाची महत्त्वाची क्रान्ति अंतर्भूत असल्यामुळें तत्संबंधानें देशभर चाललेल्या नानाविध घडामोडी व निरनिराळ्या भाषांत झालेलें त्यांचें विवेचन लक्षांत घेऊन या प्रकरणाची सुस्पष्ट व निर्विकार मांडणी अद्यापपावेतों झालेली नाहीं. त्यांतून माझ्या पूर्वावृत्तीचे दोष तर माझ्या लक्षांत पूर्णपणें वागत होते. मराठे, मुसलमान, इंग्रज, इत्यादि सत्तांचे लहान मोठे हस्तक देशभर राजकारणें खेळवीत होते, त्यामुळें या विषयांत भीषण गुंतागुंत निर्माण झाली, ती सोडवून सर्व संदर्भ व धागे व्यवस्थित जुळविणें हें काम कोणासही विकट व जिकिरीचें वाटणारें आहे, तें या पुस्तकांत कितपत साधलें आहें हें वाचकांनीं ठरवावें. पूर्वीच्या आवृत्तींतला वायफळ पाल्हाळ गाळून हें विवेचन संशोधनदृष्टीनें रेखीव, सुटसुटीत व सुस्पष्ट सांगण्याचा प्रयत्न मीं केला आहे. त्यांत शक्यतोंवर तत्कालीन साधनांतले उतारे दाखल करून मी पूर्वीचें वातावरण वाचकांच्या नजरेंत भरेल अशी व्यवस्था स्वीकारली आहे. साधनसंदर्भ पादटीपांत विस्तारानें दाखवूनही, संदर्भांचा निर्देश नाहीं असाही भाग कांहीं थोडा नाहीं, पण तो वाचकांस सहज समजेल असा आहे.

माझ्या पहिल्या कृतींत इतिहासाचा विषय माधवरावाच्या मृत्यूशीं न संपवितां तो सवाईमाधवरावाच्या जन्मापर्यंत आणून ठेवला होता, म्हणजे जवळजवळ आणखी दोन वर्षांचा काळ एकाच पुस्तकांत समाविष्ट होता. अर्थात् नारायणरावाचा वध व तदुत्पन्न बारभाईचें कारस्थान हे महत्त्वाचे विषय त्याच खंडांत आले. पण नवीन आवृत्तींत चरित्रवार मांडणीचा स्वीकार मीं केल्यामुळें हें पुस्तक माधवरावाच्या मृत्यूशीं पुरें करणें भाग पडलें. अर्थात् त्या पुढील दोन वर्षांचा भाग लिहून तयार असूनही तो आतां उत्तर विभागांतच येणें अपरिहार्य आहे. उत्तर विभागाच्या नवीन आवृत्ती केव्हां छापल्या जातील तें आतांच सांगवत नाहीं. तेही तीन भाग पुनर्मुद्रणास पात्र असून मीं दुरुस्त करून ठेवले आहेत. प्रस्तुतच्या महागाईत हें काम माझ्या हयातींत सिद्धीस जातें कीं नाहीं याची शंका वाटते. मीं आपल्या डोळ्यांदेखत रियासतींचा संपूर्ण संच सुधारून वाचकांस द्यावा अशी विवंचना अहर्निश मनांत वागत आहे, याउपर नेमानेम असेल तो खरा.

गो० स० सरदेसाई

कामशेत ता० ४ एप्रिल, चैत्र शु० १ स. १९५४.

# अनुक्रमणिका

# मराठी रियासतींची कालक्रम यादी

१. शहाजी राजे भोसले

२. शककर्ता शिवाजी

३. उग्रप्रकृति संभाजी

४. स्थिरबुद्धि राजाराम

५. पुण्यश्लोक शाहू

  १. पेशवा बाळाजी विश्वनाथ १७०७ – १७२०

  २. पेशवा बाजीराव १७२० – १७४०

  ३. पेशवा बाळाजीराव : १, १७४० – १७४९

६. छत्रपति रामराजा

  ३. पेशवा बाळाजीराव : २, १७४९ – १७६१

  ४. निग्राहक माधवराव १७६१ – १७७२



# १. काल सूची – छाप बसली

| | | | |
|---|---|---|---|
| स. १७३४ | मार्च | ७ | निजामअली जन्म |
| ,, | ऑगस्ट | १८ | रघुनाथराव जन्म |
| स. १७४५ | फेब्रुवारी | १६ | माधवराव जन्म |
| स. १७६० | नोव्हेंबर | २० | फतेसिंग भोसले मृत्यु |
| स. १७६१ | जून | २३ | नानासाहेब मृत्यु |
| ,, | जुलई | २० | माधवराव पेशवाईचीं वस्त्रें |
| ,, | ,, | | निजामअलीची पुण्यावर चाल |
| ,, | ऑगस्ट | २० | पेशव्याची निजामावर चाल |
| ,, | नोव्हेंबर | | टोक्याचा विध्वंस निजामअलीनें |
| ,, | डिसेंबर | ८ | निजामअलीचा मुक्काम चासेवर |
| ,, | ,, | १० | ताराबाईचा मृत्यु साताऱ्यास |
| ,, | ,, | | श्रीगोंद्याची खणती |
| स. १७६२ | जानेवारी | ५ | उरळीवर निजामाचा तह |
| ,, | फेब्रुवारी | २१ | सखारामबापू कारभारांतून कमी त्रिंबकराव पेठे दाखल |
| ,, | फेब्रुवारी | १६ | रघुनाथरावाचा पुत्र भास्करराव जन्म |
| ,, | फेब्रुवारी | | पेशव्याची कर्नाटकस्वारी, मिरजचा कबजा पटवर्धनांस |
| ,, | मार्च | | मल्हारराव होळकर वाफगांवास दाखल |
| ,, | जून | | पुण्यांत मुत्सद्द्यांच्या वाटाघाटी |
| ,, | जुलई | ६ | सलाबतजंग पदच्युत |
| ,, | ऑगस्ट | २२ | दादाचें पलायन वडगांवास |
| ,, | सेप्टेंबर | | चुलते-पुतण्यांचें युद्ध सुरू |
| ,, | नोव्हेंबर | ७ | घोडनदीची लढाई |
| ,, | ,, | १२ | आळेगांवची लढाई, पेशव्याची शरणागति |
| ,, | ,, | २१ | आळेगांवीं निजाम-दादा भेट व तह |
| ,, | डिसेंबर | ६ | दादाचें प्रयाण साताऱ्यास |
| ,, | ,, | १३ | दादापुत्र भास्करराव प्रतिनिधि |

| | | | |
|---|---|---|---|
| स. १७६२ | डिसेंबर | २४ | जमखिंडीची लढाई गोपाळराव पराभूत |
| ,, | ,, | २९ | मिरजेस दादाचा वेढा |
| स. १७६३ | फेब्रुवारी | ३ | मिरज काबीज दादाकडून |
| ,, | ,, | ९ | निजाम-जानोजी भेट साठचाळिशीचा तह, पेशवा-निजाम युद्ध |
| ,, | मार्च | ७ | पेशव्याचा हल्ला औरंगाबादेवर, दादाचे खुनाचा प्रयत्न |
| ,, | एप्रिल-मे | | लूट व जाळपोळ पुण्याची निजामाकडून, हैदराबादची पेशव्यांकडून |
| ,, | एप्रिल | ११ | निजाम–जानोजी–गमाजी करार |
| ,, | ऑगस्ट | १० | राक्षसभुवनची लढाई, निजामाचा संहार |
| ,, | ,, | १३ | जानोजी भोसले याची पेशव्याशीं भेट |
| ,, | सेप्टें० | ५ | पेशव्याची चढाई औरंगाबादवर |
| ,, | ,, | १९ | सलाबतजंगाचा वध |
| ,, | ,, | २५ | औरंगाबादचा तह, पेशव्याचा कारभार सुरू |
| ,, | ऑक्टो० | १६ | पेशव्याची विजयादशमी गोदावरीवर पूर्वीच्या सरदारांचीं पदें, प्रतिनिधि, होळकर, फडणीस इत्यादि बहाल |

# निग्राहक माधवराव§

— १ —

## छाप बसली

१. वस्त्रग्रहण. २. दादाची निजामावर कृपा. ३. आपसांतील युद्ध. ४. तीन कृतकर्मे. ५. युद्धाचा धुमाकूळ. ६. राक्षसभुवनाचा तडाखा.

**१. वस्त्रग्रहण** — ता० २३ जून १७६१ रोजीं पेशवा नानासाहेब पर्वतीवर मरण पावला. त्याचा मृत्यु थोडा बहुत अपेक्षित असल्यामुळें एकाएकीं घाला पडावा तसा प्रकार झाला नाहीं. त्यावेळीं पेशव्याच्या कुटुंबांत रघुनाथराव दादा हाच एक केलेला पुरुष असून वडीलकीच्या नात्यानें राज्याचा भार अंगावर घेऊन मराठ्यांचें नांव उज्ज्वल राखण्याची तयारी व तत्संबंधाची जबाबदारी आतां त्याच्यावर होती. बायकांत वडील गोपिकाबाई, दादापेक्षां निदान दहा वर्षांनीं मोठी, मानी व करारी स्वभावाची होती. पण या दोघांचे विचारप्रवाह भिन्न दिशांनीं वाहूं लागले. दादा चलचित्त होता. सर्वांचें म्हणणें ऐकून व सल्लागारांची लायकी ओळखून स्वतःचें निश्चित मत बनविण्याची ताकद त्याच्या अंगीं नसल्यामुळें त्यास नेहमीं दुसऱ्याच्या तंत्रानें चालावें लागे. शिवाय आपण मोठे कर्तबगार अशी त्याला फार घमेंड होती. म्हणून नानासाहेबाच्या मृत्यूनंतर सर्व कारभार आपल्या हातीं ठेवावा, आपण पेशवा व्हावें असें त्यास वाटूं लागलें. माधवराव लहान, त्याला काय समजतें या विचारानें, आलेल्या संधीचा उपयोग करून पेशवाई पद घ्यावें आणि पानिपतचें अपयश धुऊन काढण्या-साठीं लगोलग उत्तरेंत जावें असा विचार दादानें ठरविला. तदनुसार त्यानें

§ सत्ताधारी पुरुषांस कर्तृत्वदर्शक विशेषण लावण्याची प्रथा इतिहासांत असून तसा प्रयत्न मी करीत आलों आहें. आद्य योजक बाळाजी विश्वनाथ, वीर्यशाली बाजीराव, अष्टपैलू अथवा चतुरस्त्र नानासाहेब हीं नांवें रूढ होण्यासारखीं आहेत. माधवरावास कर्दनकाळ, रुद्रावतार, जहाल अशीं कित्येक नांवें पूर्वींच्या कागदांत लावलेलीं आढळतात, पण त्यांत त्या पेशव्याचें समग्र जीवन व्यक्त होत नाहीं. त्यांतल्या त्यांत निग्राहक शब्द मला युक्त वाटतो. विद्यार्थ्यांनीं हा प्रघात स्वीकारला पाहिजे.

बादशहा व शुजाउद्दौला यांस पत्रें लिहून गोपाळराव बर्व्यांचे मार्फत उत्तरेचें संधान चालू केलें.* पण पुण्यास जवळच्या एकाही व्यक्तीला दादाचा हा मनोदय योग्य वाटला नाहीं. माधवरावाचें वय लहान सोळा वर्षांचें असलें तरी नानासाहेबाच्या वंशाकडेच पेशवाई चालावी असा आशय सर्व जाणत्या माणसांचा व्यक्त झाला. एकानेंही दादाच्या विचाराला अनुकूलता दर्शविली नाहीं. यामुळें प्रथमच दादाची नाउमेद झाली. गोपिकाबाईस लोक भिऊन असत. तिचा विचार माधवरावास वस्त्रें देऊन दादांनीं त्याचें साह्य करावें असा होता, तोच सर्वांस पसंत पडला. पानिपतचें अरिष्ट दादाच्या अव्यवस्थेमुळें उद्भवलें, त्यांत भाऊसाहेबाची कसूर नव्हती असा सामान्य ग्रह प्रचलित होता. अर्थात् वस्त्रांच्या बाबतींत माधवरावाला उघड विरोध करण्याचें धाडस दादास झालें नाहीं. माधवरावासच पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा निश्चय झाल्यावर अशौचनिवृत्ति होतांच वस्त्रांच्या व्यवस्थेसाठीं मंडळी पुण्याहून साताऱ्यास रवाना झाली. त्यांनीं सर्व सिद्धता केल्यावर माधवरावानें एकट्यानेंच जाऊन वस्त्रें घ्यावीं असा पहिला विचार होता तो बदलून दादानेंही बरोबर जावें असें ठरलें. तदनुसार दोघेही साताऱ्यास गेले. ताराबाईच्या संमतीनें रामराजाकडून सोमवार आषाढ व० ३, ता. २० जुलई १७६१ रोजीं माधवरावास वस्त्रें मिळालीं. बरोबर दादाशिवाय सखाराम बापू, आबा पुरंदरे, नाना फडणीस, त्रिंबकराव पेठे अशी मंडळी असून त्याच वेळीं आबास मुतालकीचीं व बापूस दिवाणगिरीचीं वस्त्रें देण्यांत आलीं. "दरबारीं कारभारी सखारामपंत व बाबूराव फडणीस असून उभयतांचें एकचित्त आहे. सखारामपंत करार म्हणतात, दादा द्यावें म्हणतात." वस्त्रांचा हा विधि साताऱ्यास पार पडल्यावर मंडळी पुण्यास आली. रामराजा ताराबाईच्या अटकेंत होता, त्यास स्वतंत्र करून कऱ्हाड-वाई प्रांताचा कारभार द्यावा असे विचार चालू होते. परंतु ताराबाईनें ही गोष्ट घडूं दिली नाहीं. पुढें ता० १० डिसेंबर १७६१ रोजीं तिचें देहावसान § झालें.

पुण्यास आल्यावर दादाचा नूर पालटला. माधवरावास आपले छायेंत ठेवून आपणच कारभार करावा, त्यास बोलूं देऊं नये, अशा डौलानें त्यानें बंदोबस्त

---

*का. सं. प. या. १९३-१९४.

§ रा० खं. १-२८९, २९२, २९४; का. सं. प. या. ४८९.

चालविला. परंतु रावसाहेब याप्रमाणें राहतील हें न घडे. याच कारणास्तव सुरवातीपासून कारभारांत तेढ उत्पन्न झाली. पानिपतचें अरिष्ट व नानासाहेबाचा मृत्यु या दोन बनावांनीं राष्ट्रास चेव आला होता. पूर्वी संभाजीच्या वधानें जसें राष्ट्रास नवीन पाणी चढलें, तसाच कांहींसा प्रकार यावेळीं झाला. सर्वांनीं एकचित्तानें वागून झालेल्या चुका दुरुस्त करून तीन पिढ्यांचा राज्याचा उद्योग पुरा करावा अशी उत्सुकता आंत बाहेर फैलावली होती. "आजवर करामत केली त्याचें नवल नाहीं, आतां मोडली बाजू सांवरली, तरच कर्तृत्व सर्वांचें. गड किल्ले मजबुदीनें राखावे, पुण्याची खबरदारी करावी, आळस न करावा, सर्व मंडळी शहाणे आहेत तितक्यांनीं लोभ धरूं नये, सर्वांनीं मिळोन एकचित्त असावें," असा उपदेश गोविंद हरीच्या पत्रांत आढळतो. नाना पुरंदरे अनुभवी मनुष्य पानिपतावरून आलेला म्हणाला, § "खावंदांचे दौलतीस घट किती बसली हें ध्यानांत आहेच, त्यास इतक्या गोष्टी व्हाव्या, दौलतीचा बंदोबस्त व्हावा, गेली काबू सावरावी या गोष्टीवर चित्त कायम राहून डौल धरावा." परंतु हा सर्व उपदेश फुकट गेला. लहानमोठ्यांना जरबेंत वागवून राष्ट्रकार्य करण्याची पूर्वजांची हातोटी दादास नव्हती, त्यामुळें गोंधळ व बेदिली उत्पन्न झाली. माधवराव लहान त्यास दाबांत ठेवून आपण सत्ता गाजवूं ही त्याची ईर्षा. गोपिकाबाई व माधवराव दोघेंही तडफदार, तसेच त्यांचे अनेक होतकरू सल्लागार उत्तरोत्तर नाखूष झाले. कारभारांतला एकसूत्रीपणा बिघडला. कारभार करूं लागतांच दादाचा पूर्व स्वभाव बाहेर स्पष्ट दिसूं लागला. दोन तीन महिन्यांतच बाचाबाची सुरू झाली. दादाला हा प्रकार दिसला. विरोधकांनीं परिस्थितीची जाणीव ठेवून ताणून धरण्याचा मोह आवरला. एकूण एक कारभारी व सरदार यांचें लक्ष माधवराव व गोपिकाबाई यांजकडे असल्यामुळें दादास दुटप्पी वर्तन ठेवून वरवर सर्वांस खूष ठेवावें लागे. यामुळें उघड दोन पक्ष उपस्थित झाले.

यावेळीं मराठी राज्याची परिस्थिति संकटमय होती. खजिन्यांत पैसा नव्हता. चहूंकडे शत्रु उठलेले, पूर्वीचीं अनुभवी माणसें गारद झालेलीं, अशा अडचणींत राज्याचा निभाव लागणें कठिण झालें. पुण्याचा गोंधळ बाहेर जाहीर होण्यास उशीर काय! तेथील खडा न खडा बातमी शेजारच्या

§ ख. १·३३; ऐ. प. १००.

निजामास व म्हैसूरच्या हैदरअलीस लगोलग कळून त्यांनीं त्याचा पूर्ण फायदा घेण्याचा निश्चय ठरविला. निजामाच्या मनांत उदगीरचा प्रसंग डाचत असून त्याची पूर्ण भरपाई करून घेण्याची ही संधि त्याला प्राप्त झाली ती तो काय म्हणून सोडील? पुण्याचे घोटाळे कानांवर जातांच त्यानें उघड चढाई आरंभिली.

**२. दादाची निजामावर कृपा** — निजामास हलका करणें हें मराठशाहीचें आद्य कर्तव्य असून बाळाजी विश्वनाथापासून उदगीरपावेतों एक एक मजल कशी गांठली तो प्रकार जाहीर होता. उदगीरच्या तहांत भाऊसाहेबानें निजामाचा साठ लक्षांचा प्रदेश हासडला, पण त्याजवर पूर्ण ताबा बसविण्याचें काम अपूर्णच राहिलें. नानासाहेबानें तो उद्योग चालविला असतांच त्याला मृत्यूनें गांठलें. नवीन मिळालेला बराचसा मुलूख रायचूर दुआबांत कृष्णा-भीमांच्या चिमट्यांत होता, त्यास पंचमहाल ही संज्ञा होती. हा प्रदेश अक्कलकोटकर भोसल्यांच्या जागिरींत मोडत होता. अक्कलकोटचा संस्थापक शाहूचा मानीव पुत्र फत्तेसिंग भोसले या प्रदेशाचा मालक ता० २० नोव्हेंबर स. १७६० रोजीं मरण पावला, तेव्हां त्याचा पुत्र शहाजी संस्थानचा मालक बनला. त्याचें साह्य बारामतीकर बाबूजी नाईक करीत असे. पण त्याच्या हातून कारभार रेटेना म्हणून नानासाहेबानें नीलकंठराव पटवर्धनास हुजूरचीं पथकें देऊन बंदोबस्तास पाठविलें. सदाशिवराव पानिपतावर गेला त्याच वेळीं नीलकंठराव निजामावर जाऊन त्यानें तो प्रदेश रगडीत आणिला. त्याला अडविण्यासाठीं सलाबतजंग, बसालतजंग व निजामअली हे त्रिवर्ग बंधु कलबुर्ग्याचे बाजूस एकजुटीनें चालून गेले. यावेळीं निजामाची जूट मोठी होती. मद्रासकर इंग्रज, मुरारराव घोरपडे, हणमंतराव निंबाळकर, कर्नूळ, कडाप्पा, सावनूरचे नबाब या सर्वांशीं संधानें बांधून निजामानें मराठ्यांशीं चढाई आरंभिली. कित्येकांस त्यानें नवीन प्रदेश दिले. स. १७६० च्या अखेरीस मराठे पानपतावर झगडत असतां मराठे निजामांचा हा झगडा चालू होऊन खुद्द रघुनाथरावही पटवर्धनाचे मदतीस नांदेडावरून मेदकपावेतों चालून गेला. बरोबर पंचवीस हजार फौज होती. *

पेशव्याच्या मुख्य फौजा उत्तरेंत गेल्या आणि दक्षिण उघडी पडली, हा प्रकार सुधारण्याकरितां नानासाहेबानें पटवर्धन मंडळीस हातांशीं घेऊन त्यांस

* ख. १. २६, २८, ३२; पे. द. ३८. ९, १०.

मोठ्या तैनाता देऊन गौरवानें वाढविलें. गोविंद हरि हा त्यांचा पुरुष शूर व महत्त्वाकांक्षी असून चहूंकडचीं सूत्रें धिटाईनें चालवीत होता. त्याचा पुत्र गोपाळराव तरुणबांड तशाच बेडरवृत्तीचा असून त्याजवर गोपिकाबाईची मर्जी विशेष होती. नानासाहेब व भाऊसाहेब उत्तरेंत होते त्या अवधींत रघुनाथराव दादाचें प्रस्थ पुण्यास वाढलें. त्याचा सल्लागार सखाराम बापू अंतस्थ कारस्थानांत चतुर गणला जात असे. निजामाची वरील चढाई पाहून बापूनें त्याची समजूत काढण्याचा प्रयत्न सुरू केला तो पटवर्धनांना मानवला नाहीं. दादा फौज घेऊन निजामावर गेला तेव्हां त्यानें पटवर्धनांचा पाठपुरावा केला नाहीं. नानासाहेबाच्या अंतसमयीं तो आपलें काम टाकून परत आला. पटवर्धन उघडे पडले. निजामाचा सरदार लाला ब्रिजलाल यानें पंचमहालचा प्रदेश काबीज करून अक्कलकोटच्या मुलुखावर चाल केली आणि पेशव्याचा नळदुर्ग किल्ला घेतला. खुद्द निजामअली गाडदी व तोफखाना बरोबर घेऊन सोलापूरच्या रोखानें चालून आला. जुलईंत इकडे माधवरावास वस्त्रें मिळतात तों निजामानें पंधरा हजार सैन्यानिशीं बेदर गांठलें. त्यानें रामचंद्र जाधवाची समजूत काढून त्यास दहा हजार फौज ठेवण्याची सोय करून दिली. पुढें माधवराव व दादा साताऱ्याहून पुण्यास येतांच निजामावर मोहीम करण्यासाठीं त्यांनीं फौजा जमविण्यास सुरुवात केली. ठिकठिकाणच्या सरदारांस फौज व पैसा घेऊन सामील होण्याचे हुकूम काढले. अशी तयारी करून ते दोघे निजामावर चाल करण्यासाठीं २० ऑगस्टला डेरेदाखल झाले. सर्व जमवाजमव होऊन हालचाली सुरू होण्यास ऑक्टोबर महिना आला. सत्तर हजारपावेतों जमाव जमला. तरी मल्हारराव होळकर व जानोजी भोसले यावयाचेच होते.

या संकट समयीं दादा आपलेकडून मोठा आवेश दाखवीत होता. ता० २९ ऑक्टोबर स. १७६१ रोजीं तो गोपिकाबाईस लिहितो, "आम्हीं ती० नानासाहेब व भाऊसाहेब यांचे शागीर्द आहों. लागभाग पाहूनच करणें तें कारितां. उतावीळ करीत नाहीं. माधरावास मर्यादेविषयीं शिकवीत जावें ऐशास, ते तीर्थरूपांचे पुत्र आहेत, शिकवावें लागत नाहीं. तथापि सांगत जाऊं. मोगलाची गांठ पंधरा दिवशीं पडेलसें दिसतें. सर्व मदार चिरंजीवांवर आहे. उतावळी करूं लागतील त्यावेळेस आम्हीं सांगूं तें ऐकावें लागेल. त्याविशीं वडिलांनीं त्यांस वारंवार लिहावें. वरकड कारभार आमचे आज्ञेप्रमाणें करीत

आहेत. पेंच नाहीं. गनिमी तऱ्हेनें मोगलास झुंजवून दोन महिन्यांत तो दमेल. आमची फौज जमा झाल्यावर मग पौषमाघमासीं थोरली लढाई व्हावी असें योजिलें आहे. गडबडीमुळें चार किल्ले गेले तरी चिंता नाहीं. लोकांचे मतें दौलत सावरणार नाहीं म्हणोन शत्रूनें चहूंकडे लबाड्या केल्या. परंतु अशा गडबडीवर जाऊं नये. एक मोगलाचें पारिपत्य जहालें म्हणजे चार आभाळें उठलीं आहेत तीं विरतील. होणें जाणें ईश्वराधीन. आमचे स्वाधीन काय आहे! प्रपंच असत्य आहे. तथापि मनापासून कृपादृष्टीनें इकडे पाहिल्यास आमचा जयच आहे. वडिलांस सुचेल तें लिहीत जावें." § या पत्रांत दादाचा अहंकार स्पष्ट दिसतो.

यावर गोपिकाबाईनें दादास सुचविलें, "प्रसंग कठिण दिसतो तर मोगलाशीं तह करून मोकळें व्हावें." दादानें हें मान्य केलें नाहीं. त्यानें प्रत्युत्तरीं तिला कळविलें, "हे गोष्ट कदापि व्हावयाची नाहीं, दबून सल्ला केला कीं ते वरसास बोकांडीं बसतील. यास्तव फिरून लबाडी न करी असें शासन केलें पाहिजे. वडिलीं दम न सोडावा. या मुलासाठीं इतकें करितों. मला शहाणपण आहे तितकें खर्च करितों. मेहेनत, शिपाइगिरी तजविजीनें होईल तें करितों." या त्याच्या लिहिण्यांत भावी कलहाची छटा उमटलेली दिसते. प्रपंच असत्य, होणें जाणें ईश्वराधीन हा वेदान्त राज्यकारभारास अनुचित होय. एवढें करूनही उरुळीवर निजाम वठणीस आला असतां त्याला दादानें कसें वागविलें तेंही पुढें दिसेल.

पेशव्यानें फौजा गोळा केल्या, मराठे आपल्यावर चालून येतात ही कल्पना निजामास होती. सुमारें साठ हजार फौजा जमवून तोही पुण्याच्या रोखानें चालून आला. ठिकठिकाणीं चकमकी झडूं लागल्या. "नोव्हेंबरांत तो औरंगाबादेस येऊन सडा झाला, आणि लगेच परत टोक्यावर दाखल झाला. श्रीस भग्न केलें, देवालय आदि करून गाव सर्व जाळिला. ब्राह्मणांस उपद्रव केला. याप्रमाणें हिंदुधर्मावर यांनीं बदनजर ठेविली आहे. कौल देऊन विश्वासघात केला. याचप्रमाणें प्रवरासंगम व कायगाव टोकें या पवित्र क्षेत्रांचा विध्वंस करून औरंगजेबावर मात केली." † या कृत्यांनीं महाराष्ट्रांत एकंदर गहजब उडवून दिला. उदाजी चव्हाण, रामचंद्र जाधव वगैरे निजामाचे सरदार नाराज झाले.

§ ऐ. टि. २. १८ ले. ३. † पे. द. ३८. ३०, ३२, ३८, ४७; ख. १. ४४, ५२.

धन्यास सोडून ते पेशव्यास मिळण्याच्या गोष्टी बोलूं लागले. "रामचंद्र जाधव रुसून मोगलांकडून इकडे आले त्यांस सेनापति द्यावी हा करार करून आपल्या बाजूस मिळवून घेतलें." त्याजबरोबर निजामाचा भाऊ मोगल अली हाही येऊन मिळाला. या बनावानें निजामाची बाजू फारच हलकी झाली. तरी निजामानें पुण्यावरचा रोख धरून पुढें चाल केली. पुण्याचे लोक घाबरून गेले. त्यांनीं सिंहगड, पुरंदर, लोहगड, राजमाची अशा किल्ल्यांचा आश्रय केला. पेशव्यांचा जवाहीरखाना व खजिना पुरंदरास गेला. जामदारखाना व सिलेखाना झाडियानिशीं सिंहगडास रवाना केला. दादानें किल्ल्यांचे रखवालीच्या ताकिदी चहूंकडे पाठविल्या. उभय पक्षांचे कासीद व बातमीदार पकडले जाऊं लागले.

ता. ८ डिसेंबरला मोगल चासेवर येऊन राहिला. जुन्नरपासून अहमदनगर पावेतों मोठी धामधूम उडाली. ता. १४ डिसेंबरला निजामानें एकाएकीं श्रीगोंद्यावर चाल केली. सिंद्यांचे हवेलींत भूमिगत द्रव्य सांपडेल या समजुतीनें बेलदारांकडून सर्व हवेली व गुप्त भाग खणून काढले. एक दोन भांड्यांचीं पेवें मात्र सांपडलीं, ऐवज कांहीं मिळाला नाहीं. या कामीं निजामअली व सलाबतजंग यांजबरोबर विनायकदास, मुरादखान वगैरे प्रमुख होते. वाड्यांत भरपूर द्रव्य मिळेल अशी बातमी त्यांस तेथील काजीनें दिली होती. तेथून पुढें मोगल मराठे झगडत लोणी उरुळी पावेतों आले. वाटेंत लहान मोठे संग्राम होतच होते. त्यांनीं पाटस जाळलें. उरुळीस निजामाचे सहा मुक्काम झाले. एकदम चढाई करून मोगल साफ बुडवावा असा आवेश समस्त मराठे सरदारांस चढला असतां दादानें काल हरण करून अंतस्थें सल्याचा संदर्भ लाविला. मोगलावर कृपावंत झाले. सलूख झाल्याचें दादानें एकदम जाहीर केलें. नबाबाचे चित्तांत आलें कीं हे उमदी गोष्ट सांगतात. त्यासाठीं निजामाकडून बोलणें करण्यास मुरादखान, हणमंतराव व आनंदराव निंबाळकर हे दादांस भेटले. ता. ५ जानेवारी स. १७६२ रोजीं पेशवा लिहितो, "निजामलीशीं लढाई असतां जेर होऊन त्यांनीं सल्याचा संदर्भ लाविला. मोगलअली व रामचंद्र जाधव फूटोन आले. चाळीस लक्षांचा मुलूख निजामापासून घेऊन सल्ला केला." §

§ पे. द. २०·१२८; रा. खं. १०·२; ऐ. प. १०३ यांत भरपूर तपशील पहावा.

निजामास साफ बुडविण्याची संधि चालून आली असतां दादानें हा जो राष्ट्रघात केला, त्याजबद्दल सर्व प्रमुख मंडळीस मोठा संताप आला. गोपाळराव, त्रिंबकराव, बाबूजी नाईक, जानोजी भोसले व खुद्द माधवराव यांचा विचार निजामास पूर्णपणें जिंकून घ्यावें असा असतां दादानें हा जो अवसानघात केला, तेणें करून कारभारांत लगेच दुही उत्पन्न झाली. उभयतां श्रीमंतांची चित्तशुद्धि बिघडली. देशस्थ कोंकणस्थ असे पक्ष निर्माण झाले. दरबार नासला असा भाव प्रगट झाला. सखाराम बापू दादाचा मुख्य सल्लागार असून मागें पुढें त्यास पेशवाई मिळविण्यांत निजामाचें साह्य उपयोगी पडावें म्हणून त्याचा पेंच यांनीं निवारण केला अशी उघड चर्चा सुरू झाली.

सलाबतजंगाचा नेभळा कारभार तिखट वृत्तीच्या निजामअलीस कधींच मानवला नाहीं. मराठ्यांशीं नमून न वागतां त्यांचा उच्छेदच करावा हें निजाम-अलीचें धोरण सिंदखेडच्या प्रसंगापासून व्यक्त होत आलें होतें. या बाबतींत त्याचा सूत्रचालक विठ्ठलसुंदर हा महाखटपटी व मराठ्यांचा द्वेष्टा होता. नानासाहेबानें सलाबतजंग व त्याचे दरबारी यांस सांभाळून आपली छाप कायम ठेविली. पुढें उत्तरोत्तर निजामशाहींत सलाबतजंग मावळत जाऊन निजामअली प्रमुख बनला. “ छ १३ जिल्हेज म्हणजे ता. ६ जुलै स. १७६२ रोजीं सलाबतजंग व निजामअली यांच्या भेटी बंदेनवाज पीराचे दर्ग्यांत झाल्या. शपथक्रिया जाली. सलाबतजंगांनीं सरदारीनें राहावें. कारभार सर्व निजाम अलीखानांनीं करावा. सलाबतजंगांनीं कोणे गोष्टींची तफावत करूं नये व त्याच्या मानमहत्त्वांत अंतर करूं नये ऐसा करार जाला. त्याउपरी निजाम अलीखान सलाबतजंगाचे डेऱ्यास गेले. सलाबतजंग, त्यांची मातुश्री व निजाम अलीखान या तिघांचें खलबत जालें. तेथेंही मागती परस्परें शपथ झाली. उपरांतिक छ १९ जिल्हेजीं सलाबतजंगाचेथें दरबार झाला. निजाम अलीखानास कूलकारभाराचीं वस्त्रें दिलीं. शिरपेंच आपले हातीं बांधला. मोहोर त्याचे स्वाधीन केली. सर्व राज्यकारभाराचा बंदोबस्त त्यांनीं करावा. अखत्यार सर्व निजाम-अलीचा. ते करतील, तें करूत. आपण भोजन करून समागमें असावें हा प्रकार जाहला. ” यानंतर विठ्ठलसुंदर यांस राजा प्रतापवंत किताब व दिवाणगिरी देण्यांत आली. पुढें आणखी एक वर्षानें ता. १९ सेप्टेंबर १७६३ रोजीं निजामअलीनें सलाबतजंगाचा शिरच्छेद केला त्याचा प्रकार असा. “ छ २८

रोजीं अलाउद्दौला याचा काळ जाला. अलाउद्दौला म्हणजे सयफजंग यांचे सापत्न बंधु. पेशजी यांचे हातें सलाबतजंग यांचा वध करविला, त्यास त्या दिवसापासून दौला मजकूर यांस भ्रमही होता, व हरवख्त सलाबतजंग यांची तसवीर दृष्टिसमोर उभी राहत होती कीं मजला निरपराधें कां मारिलें. त्याजमुळें चैन पडत नव्हतें व रक्तपितीही जाली होती. येलगंदलचे किल्लेदारीचें काम मशारनिल्हेकडे होतें. त्याशिवाय पंनास हजारांची जागीर होती. मृत्यु पावले तेच दिवशीं जागीर व किल्लयास जप्ती गेली." § सलाबतजंगाचा हा शोचनीय अंत मुस्लीम अत्याचारांत टळक भर घालतो. सारांश निजामअली अधिकारावर आल्यामुळें आतां मराटे–निजाम व्यवहार बिघडले.

निजामाचें प्रकरण व कारभारांतील भानगडी यांजमुळें वस्त्रें घेतल्यापासून माधवरावास रोजरोज नवीन अनुभव येऊं लागला. तेणेंकरून गोंधळून जाण्याऐवजीं स्वतः प्रत्येक बाबतीचा तपास करून आपल्या मनास पटेल तेंच अमलांत आणण्याचा उपक्रम त्यानें आरंभिला. यामुळें त्याच्या अंगचें खरें तेज क्षणोक्षणीं प्रगट होऊं लागलें. हा धनी दुसऱ्याच्या शिकवणीनें चालणारा नव्हे, स्वतंत्र बाण्याचा आहे अशी सर्वांना खात्री पटत चालली. निजामास साफ बुडविलें नाहीं याची चर्चा सुरू होऊन दादा व सखारामबापू अंतस्थ मतलबानें वागतात असे उघड आरोप चालू झाले. होतां होतां होळकरांचा गंगोबा तात्या चंद्रचूड, चिंतो विठ्ठल रायरीकर, तुकोजी होळकर, मानाजी सिंदे, सदाशिव रामचंद्र, दमाजी गायकवाड अशी प्रमुख मंडळी यांचा एक पक्ष दादासाहेबांचा म्हणून बनला, आणि त्यास निजाम, हैदर, इंग्रज अशा परस्थांचा पाठिंबा दादानें मिळविला. उरुळीपासून ही दुही प्रगट झाली. निजामास साफ बुडवावा, पुनः पुनः ही ब्याद पाठीवर नको, निजामास दक्षिणेंतून उडवून दिला कीं उत्तरेंतील कार्यभाग सुलभ होईल अशी त्यावेळीं राष्ट्रीय भावना उत्पन्न झाली. दादास ही संधि सोन्यासारखी आली होती, ती त्यानें पोकळ स्वार्थाचे पायीं वायां घालविली. लोकसंग्रह करून पुढारीपण गाजविण्याचें चातुर्य त्याला नव्हतें. माधवरावास वरचढ होऊं द्यावयाचें नाहीं हा क्षुद्र मतलब दादाचे पोटांत सदैव कायम होता. या त्याच्या वृत्तीमुळें माधवरावाचे उद्योगास अपरिमित विघ्न उत्पन्न झालें.

§ पे. द. ३८·६४, ७३, ११८; भा. व. श.; सैयर मुताखरीन, मिल इत्यादि ग्रंथांत सलाबतजंगाचे वधाचा वृत्तान्त आहे.

**३. आपसांतील युद्ध**—उरुळीच्या तहानें निजामाची चढाई थांबली तरी पुण्याच्या कारभारांत धुमसत असलेला चुलते-पुतण्यांचा कलहाग्नि जोरानें उसळूं लागला. निजाम परत फिरतो न फिरतो तोंच सखारामबापूनें कारभारांतून आपलें अंग काढून घेतलें. ते कारभार बरोबर करीत नाहींत अशी उघड चर्चा बाहेर चालली ती बापूस दुःसह वाटली. इकडे त्याच वेळीं दादाही बेचैन बनला. आपण पुढें कारभारांत मन न घालतां स्नानसंध्या व देवतार्चन करणार असा विचार त्यानें जाहीर केला. ता० ६ जानेवारी १७६२ रोजीं माधवराव मातुश्रीस लिहितो, "ती. दादासाहेबांचे विचारें स्नानसंध्या करावी, मेहनत होत नाहीं असें मनःपूर्वक आहे. सखारामपंतानेंही अंग काढून घेतलें आहे. कारभार करीत नाहीं म्हणतात. पण अंतःकरणापासून नाहीं. सारे कोंकणस्थ एकीकडे होऊन फशीं पाडतील यास्तव अंगानिराळें टाकतात. आम्हांस वडिलीं आज्ञा केली कीं बाबूराव फडणिसावर अखत्यारी देऊन ते व तुम्ही कारभार करणें. यावर आम्हीं उत्तर केलें, आपण वडील, कारभारांतून अंग न काढावें. दोन तीन वर्षें कारभार करावा, पुढें आम्ही ओझें घ्यावया जोगे झाल्यावर जशी आज्ञा कराल तशी वर्तणूक करूं. परंतु अद्याप ठराव जाला नाहीं." §

माधवरावाच्या या पत्रांत त्या परिस्थितीचें स्पष्ट चित्र कळून येतें. बापूस कारभार नको अशांतला भाग नव्हता. पण त्याचा समज होता कीं पेशवा लहान, त्याजवळ आपल्यासारखीं अनुभवी माणसें नाहींत, आपल्याशिवाय त्याचें अडेल. त्याला असेंही कळून चुकलें कीं पेशवा लहान असला तरी तो दुसऱ्याच्या तंत्रानें चालणारा नसून स्वतंत्रवृत्तीचा आहे, सबब आपण मुद्दाम थोडेंसें ओढून धरून वागावें म्हणजे झकत तो आपलीं आर्जवें करील. असा हा धूर्तपणाचा डाव सखारामबापूनें आरंभिला. शिवाय दादालाही त्यानें तशीच सल्ला देऊन त्याजकडून स्नानसंध्येची सबब व्यक्त करविली. त्यावरून माधवरावानें पडतें घेऊन दोघांसही कारभार न सोडण्याचा आग्रह चालविला. ते ऐकेनात तेव्हां अन्य व्यवस्था करणें पेशव्यास भाग पडलें. या भानगडींत मुख्यतः चार व्यक्तींचा संबंध आला. माधवराव व दादा हे दोन मुख्य व त्यांना अंतस्थ पाठिंबा देणारे गोपिकाबाई व सखारामबापू. माधवराव बुद्धिमान, मानी व

§ इ० ६२; ख. १·५४.

तेजस्वी, वय लहान म्हणून आपुलकीच्या भावनेनें तो मातुश्रीस विचारून वागे. गोपिकाबाई अनुभवी, विचारी व करारी होती. नवऱ्यानें तिचा हट्ट कधीं चालूं दिला नाहीं, कीं राज्याचे बाबतींत तिला कधीं विचारलेंही नाहीं. आतां माधवराव लहान त्याचा जम बसवून द्यावा ही तिला हौस, रघुनाथरावाच्या चंचल व स्वार्थी स्वभावाला ती पूर्ण ओळखून होती. त्याचें कांहीं चालूं द्यावयाचें नाहीं असा प्रयत्न आरंभून तिनें आपल्याला अनुकूल पडणाऱ्या व्यक्तींना जवळ केलें. पुत्रानें आपल्या पसंतीचीं माणसें हाताखालीं घेऊन रगडून कारभार चालवावा अशी खटपट तिनें चालविली. माधवरावानें आपल्यापरी सर्वांची योग्यता ओळखून आपल्या बुद्धीस पटेल तें स्वतंत्र विचारानें करावें असा उपक्रम स्वीकारला. सखारामबापूला तो चांगला ओळखून होता. दादाला मुठींत ठेवून दीर्घसूत्री अंतस्थ काव्यानें आपला पगडा कायम ठेवावा ही सखारामपंताची ईर्षा चालूं द्यावयाची नाहीं, मात्र त्याच्या कर्तृत्वाचा उपयोग पूर्ण करून घ्यावयाचा अशी खूणगांठ माधवरावानें मनाशीं ठरविली. गोपिकाबाईनें त्रिंबकराव पेठ्यास कारभारावर नेमण्याची सूचना माधवरावास केली ती त्यानें तूर्त अंमलांत आणिली.

त्रिंबकरावाची मान्यता कांहीं कमी नव्हती. तो बाणेदार व निःस्पृह होता. त्यानें उरुळीच्या छावणींतून गोपिकाबाईस लिहिलें, "आम्ही कारभारी नव्हों, बहुता दिवसांचे सेवक. परचक्र आलें तें माधवरावांच्या प्रारब्धेंकरून निवारलें. दादांचा विश्वास कोणास पुरत नाहीं. सखारामपंतानें शिकविल्याप्रमाणें बोलतात. बाबूजी नाईक वगैरेंचें मत सखारामपंत कारभारी असला तर आपण चाकरी करीत नाहीं. दादासाहेबांचा सालाचा खर्च साठसत्तर लक्षांचा आतां कसा निभावेल ! नानासाहेबांमागें पंधरा दिवसांत हरणें पाखरें वगैरे दूर करून आपण संसारत्याग करणार असें दर्शविलें. रावसाहेब व सखारामपंत यांचें चित्त शुद्ध नाहीं. लष्करांत सारे आपापल्यापरी बसले आहेत." § दादासही हा प्रकार दुःसह होऊन त्यानें गोपिकाबाईस कळविलें, "आम्ही व सखारामपंत कारभार सोडून माधवराव व बाबूराव फडणीस यांस सांगितला आहे. आम्ही भोळे, जें मनांत येईल तें बोलतों, त्यानें बिघडतें. आम्हांस दौलत करावयाची हौस तिळमात्र नाहीं." हा वैताग त्याचा केवळ दिखाऊ होता. पेशवेगिरी आपण

§ ख. ५५.

करावी हा पोटांतला उद्देश कायम असल्यामुळें पुढील विपरीत प्रकार घडून आले. खोटा वैताग दाखविण्याचें कारण नव्हतें.

तूर्तातूर्त प्रस्तुतची तेढ गोपिकाबाईनें मिटविली. सखारामबापूनें कारभार सोडावा. बाबूराव व त्रिंबकराव यांनीं तो करून दादांनीं त्यांस सल्लामसलत देत जावी. नारोशंकर व विठ्ठल शिवदेव यांनीं हिंदुस्थानांत व माधवरावांनीं कर्नाटकांत जावें. पण या नवीन कारभाऱ्यांस दादाचा विश्वास येईना. त्यांनीं माधवरावास आग्रह चालविला कीं दादांचा आमचा विरोध पडला तर तुम्ही आम्हांस अंतर देणार नाहीं अशी शपथ घ्या. माधवराव ही शपथ करीना आणि हे कारभार स्वीकारीनात. दादानें कारभार सोडला नाहीं. अशा भानगडी सारख्या चालू राहिल्या. गोपिकाबाईनें त्रिंबकरावाची समजूत घालून दादांस कळविलें, "त्रिंबकराव तुमची मर्जी राखून कारभार करतील. देशस्थ असोत, कोंकणस्थ असोत, कोणी कोणास पेंचांत आणूं नये. त्रिंबकरावांनीं मान्य केलें." ता. २१ फेब्रुवारी १७६२. *

दादानें बाईस कळविलें, ज्येष्ठमासीं परत आल्यावर पुण्यास सर्वांनीं एकत्र बसून निकाल करूं. तूर्त माधवरावानें दादासह कर्नाटकाकडे प्रयाण केलें. सखारामपंत व आबा पुरंदरे रुसून घरीं बसले. पण स्वारींत माधवराव व दादा यांचें पटेना. चिकोडीच्या मुक्कामाहून मार्चांत दादा पुण्यास परत आला, त्यावेळीं माधवरावानें मातुश्रीस कळविलें, "तीथरूपांनीं माझी रवानगी कर्नाटक प्रांतें केली. दौलतीस या काळीं पेंच फार पडले आहेत. त्र्यंबकराव समंजस, एकनिष्ठ, खावंदांचे कार्यास जपणारे, मेहनती, युक्तीस मनसुब्यास न चुकणारे, त्यांचें आमचें मन मिळून गेलें, पण बाबूराव फडणीस कारभारांत नसतील तर मामांची एकट्याची उमेद नाहीं. तीर्थरूपांची मर्जी एक प्रकारची, त्यांस रक्षून सर्वांची सोय केली तरच कार्यास पडेल. मल्हारराव होळकर देशीं आले आहेत ते आणखी पेंच पाडण्यास चुकणार नाहींत. सबब आपण मल्हाररावाचा व बाबूरावाचा एकविचार अगोदर पासून जपून करावा." त्रिंबकरावानेंही स्वारींतून हा प्रकार गोपिकाबाईस स्पष्ट कळविला.

मल्हारराव होळकर गंगोबाच्या तंत्रानें चालणारा दादांच्या बोलण्यावरून स. १७६२ च्या मार्चांत वाफगांवास दाखल झाला. तो दादांस मिळून आणखी

* ख. ६१, ६२.

पेच उत्पन्न करील यास्तव त्यास आपल्याकडे मिळवून घेण्यासाटीं माधवरावानें मातुश्रीला सुचविलें. यावेळीं गोविंद हरि पटवर्धन व त्याचा पुत्र गोपाळराव हे माध्वरावाचे मुख्य संरक्षक असून अडीअडचणीस त्यांची मदत हुकमी होती. त्यांना स्वतःचें स्थायिक मजबूद स्थळ राहण्यास नव्हतें, त्यासाटीं मिरजेचें ठाणें आपल्यास देण्याचा गोविंद हरीनें गोपिकाबाईकडे आग्रह धरिला. माधवराबानें तें ठिकाण गोविंद हरीचे कबजांत दिलें, ( फेब्रु० १७६२ ). तेथें माधवरावाचा सासरा शिवाजी बल्लाळ जोशी बंदोबस्तास होता, तो तें ठिकाण सोडीना, तेव्हां माधवरावानें स्वतः मिरजेस जाऊन जोशी यास काढून तें स्थळ गोविंद हरीच्या कबजांत दिलें. गोविंद हरीनें त्वरा करून तेथें लगेच आपली अशी मजबुदी केली कीं सहसा तें स्थळ पुनः दुसऱ्याचे हातीं लागूं नये. हा प्रकार दादा व सखाराम बापू यांच्या अंतःकरणास विशेष झोंबला. माधवरावाचा पक्ष बळावणें त्यांना कसें रुचावें ?

मिरज पटर्धनांचे हवालीं करून माधवराव व त्रिंबकराव पुढें कर्नाटकांत गेले. तुंगभद्रेपावेतोंच्या प्रदेशावर आपली हुकमत बसवून व थोडीबहुत पैदास करून पर्जन्य सुरवातीस १३ जूनला ते परत पुण्यास आले. त्याबरोबर पुनः पूर्वींच्या वाटाघाटी सुरू होऊन दरबारचें वातावरण क्षुब्ध होत गेलें. मध्यस्थीसाठीं बोलावणें गेल्यावरून मल्हारराव होळकर पुण्यास आला. उघड चर्चा चालू झाली तेव्हां माधवराव, गोपिकाबाई, त्रिंबकराव यांनीं सर्व प्रकार स्पष्ट बोलून दाखविले. फक्त दादाला मात्र आपल्या अंतःकरणांतील वक्रता उघड सांगतां येईना. उलट सर्व मंडळी दादासच उपदेश करूं लागली, तेव्हां तो वैतागून म्हणूं लागला, " माझें म्हणणें तुम्हांस पटत नाहीं तर मी बाहेर कोठें पोट भरण्यास जातों. " त्यावर गोपिकाबाईंनीं आग्रह करून राहविले. माधवराव व त्रिंबकराव यांनीं विनंती केली, " आपण वडील, आम्ही आज्ञाधारक, जैशी आज्ञा कराल तैसी वर्तणूक करूं, " यावरून भीड पडून राहिले. परंतु पुनः सासवडकर मंडळींनीं त्यास बोध करतांच तो म्हणाला, " एक तुम्ही तरी असावें, किंवा म्यां तरी असावें. " मामानें यावर उत्तर केलें, " बहुत उत्तम, मजमुळें गृहकलह तुटतो तर संतोषानें मजला यात्रेस जाण्यास आज्ञा द्यावी. मात्र अन्याय पदरांत घालून निरोप द्यावा. हिताची गोष्ट सांगत असतां दुसऱ्याच्या शिकवणीनें बाहेर जाऊं म्हणतां हें काय ! बंधु कैलासवासी झाले,

त्यांमागें तुम्ही वडील, मूल लहान हातीं धरून राज्य रक्षावें, तें न करितां निराळे होऊन बंड करावें अगर मोगलाईंत जावें याचा अर्थ काय ? " त्यावरून देहाहर येऊन बोलले, " मी काय करूं, चौघेजण कुतर्क सांगोन निघावें म्हणतात. याउपर तुम्ही बोलतां हें खरें. तुम्हीच मूल हातीं धरून दौलत सांभाळा. मी स्नानसंध्या करून राहीन. " असें बहुत समाधानें करून मामास बोलले. मामा लगेच माधवरावांस घेऊन आले, त्यांनीं साष्टांग नमस्कार घालून सांगितलें, " मला आज्ञा कराल त्या प्रमाणें राहीन. वडिलांचे पायांशीं दुसरा विचार नाहीं. " तेव्हां दादा संतोषें करून बोलले, " मामा व तुम्ही कारभार करा. मात्र माझे शागीर्द पुरंदरे व सखाराम यांचे सरंजामांची घालमेल करूं नये, " असें बोलून माधवराव त्रिंबकराव यांस समागमें घेऊन बाहेर सदरेस आले. तेथें मल्हारराव आले त्यांस बोलले, " माधवराव धनी, त्रिंबकराव कारभारी सर्वांनीं यांच्या विचारें वर्तावें. " होळकर म्हणाले, " बहुत उत्तम. " गंगोबा म्हणाले, " पण दोन फळ्या झाल्या त्यांची गत काय ? " त्यावर दादा बोलले, " आतां वेड्यासारखें पुसतोस काय ? " हें ऐकून तत्पक्षीयांचीं गात्रें विकलित झालीं. राव, बाबूराव व मामा यांनीं मातुश्रींस जाऊन सर्व सांगितलें. उत्तम झालें म्हणोन बोलली. ×

राज्यकारभारांत जातिभेदांचें खूळ वाढून दुही उत्पन्न झाली तेणेंकरून राज्याचा अधःपात होणार हा विचार सर्व विचारी माणसांच्या अंतःकरणास झोंबला, आणि सर्वांनीं मिळून ही भीषण आपत्ति टाळण्याचे प्रयत्न पराकाष्ठेचे केले. राज्यकारभारांत कोणत्या अनिष्ट गोष्टी शिरल्या आणि त्या कशा दुरुस्त कराव्या, फौज कशी बनवावी, खर्च कसा उभारावा, सरंजामदारांची जबाबदारी काय आहे याजबद्दलच्या विस्तृत सूचना या दुहीच्या प्रसंगीं त्रिंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे यानें केलेल्या उपलब्ध आहेत. पुरंदरे घराणें मराठी राज्याच्या उभारणींत प्रमुख असून हा नाना पुरंदरे शाहूच्या मृत्यूनंतर सातार्‍यास रामराजा व ताराबाई यांचा कारभार पहात होता. तो भाऊसाहेबाचा जिवलग मित्र असून त्याजबरोबर पानपतावर जाऊन त्या अरिष्टांतून जिवंत परत आला. अर्थात् राज्याचा अनुभव त्याचे ठिकाणीं पूर्ण मुरलेला असून नानासाहेबाच्या पश्चात् सखारामबापूच्या

× इ० ले. ६६ हें उद्बोधक पत्र पहा.

कारवाईनें दुहीचें व जातिभेदाचें नवीन संकट राज्यांत उत्पन्न झालेलें पाहून त्याचें अंतःकरण विदीर्ण झालें, आणि सुधारणेच्या दृष्टीनें त्यानें आपल्या सूचना प्रमुखांपुढें लेखी कळविल्या. त्यांतच खावंदांचे घरीं लहानमोठे सर्व सारखे, कोंकणस्थ, कऱ्हाडे, शेणवी, परभु, मराठे सर्वांनीं एक दिलानें दौलतेची सेवा करावी, सर्वांचें खावंदांनीं यथान्याय चालवावें, मुख्यतः उभयतां श्रीमंतांनीं चुलते पुतण्यांनीं मातुश्रींच्या विचारें चालावें, अशा कित्येक बहुमोल सूचना स. १७६२ च्या पावसाळ्यांत नाना पुरंदरे यानें केलेल्या अभ्यासकांचे नजरेंत असाव्या. भाऊसाहेबाची कैफियत हें प्रकरण या त्रिंबक नाना पुरंदरे यानेंच लिहिलें असावें असा तर्क आहे. हा गृहस्थ ता० ११ डिसेंबर स. १७६८ रोजीं वारला.* नाना पुरंदऱ्याच्या या राजकारणी सूचना पुढें माधवरावानें यथावकाश अंमलांत आणल्या हें सिद्ध आहे. तथापि पुरंदऱ्याच्या सूचना पहिल्या आवेशांत कोणासही पटल्या नाहींत. कित्येकांस भीति पडली कीं आपले सरंजाम जातील. त्यांना स्वतःच्या मतलबापुढें दौलतीची परवा वाटली नाहीं. सखारामबापू कर्ता व अनुभवी होता, त्यानें दादांस निक्षून दाबलें असतें तर त्याला एकट्यानें अलग राहण्याची छाती नव्हती. शिवाजीच्या पंताजी गोपीनाथाचा हा वंशज, नानासाहेबाहून कदाचित् थोडा वडील, शनिवारवाड्याचे उभारणींत त्याची चतुराई बाजीरावाचे लक्षांत आली. तदुत्तर नानासा०, भाऊसा०, दादासा० यांचे सान्निध्यांत वागून कारभारांत प्रवीण झाला. अशा या चतुर अनुभवी गृहस्थानें दादास आवरून गृहकलह मिटविला नाहीं याचा अत्यंत उद्वेग वाटतो. माधवरावानें मात्र त्यास योग्य दाबांत ठेवून त्याचा उपयोग कारभारांत करून घेतला. यावेळचे बनाव लेखांत व करारांत उतरलेले पाहिल्यास त्यांची गणति होणार नाहीं.†

होतां होतां प्रकरण वर्दळीवर आलें. दादानें उघड मागणी केली कीं मला पांच किल्ले व दहालक्ष उत्पन्नाची जागीर निर्वाहाकरितां स्वतंत्र तोडून द्या. यावरून पूर्वीचा समेट फिसकटला. पटवर्धन मंडळी देशस्थांविरुद्ध

* पे. द. १९·६ चा कागद ता० २० जून स. १७६२ चा व पुरंदरे द० ३·२३ चा जानेवारी १७६३ चा हे विषयाच्या व भाषेच्या दृष्टीनें एकमेकांचे पूरक दिसतात. पहिल्याचे शेवटीं दुसरा बंद गहाळ असा शेरा आहे तो दुसरा बंद हाच असूं शकेल. ऐ० प० १०० येथेंही हाच लेख छापलेला आहे. नानापुरंदरे सखारामबापूचा द्वेष करी हें पु. द० ३·८२ वरून स्पष्ट आहे. † पे. द. १९·५६, पु. द. ३·२, ३.

जळफळत होती. बाहेर भूमका उठली कीं गोपिकाबाईनें गोपाळरावाचे विचारें दादास कैदेंत घालण्याचा उद्योग चालविला आहे. या वार्तेनें दादा घाबरून गेला. भाद्रपद शु० ३ म्हणजे ता० २२ ऑगस्ट रोजीं अनुष्ठान समाप्तीचें निमित्त करून दादा शनिवारवाडा सोडून नजीक वडगांव ‡ येथें गेला. त्याचे मागोमाग गोपिकाबाई, माधवराव, मल्हारराव वगैरे मंडळी त्याची समजूत करण्यास गेली. पुष्कळ बोलणें झालें. दादानें नानासा० चे पायांची शपथ घेऊन कळविलें, " मी पाषाणास जाऊन परत येतों." त्याप्रमाणें तो लगेच पाषाणास गेला. तेथून तो रात्रीचा दिवस करून नगरच्या रोखानें बाहेर पडला. सखारामबापू, आबा पुरंदरे, महिपतराव चिटणीस बरोबर जाऊं लागले, त्यांस त्यानें परत पाठविलें, ( ३० ऑगस्ट ). " योगाभ्यासास जातों असें म्हणून चालले. पुष्कळांचे मतें कलहाकरितांच गेले. पारनेर येथें सर्वांस परत जाण्यास निरोप दिला. तेथून आपण एकाकी एकट्या घोड्यानिशीं नर्मदातीरास जावयास गेले." प्रथम तो तसाच नाशकास गेला, तेथून विंचुरास जाऊन २ सेप्टेंबर रोजीं विठ्ठल शिवदेवास लिहितो, " आम्ही विंचुरास दाखल झालों. सखाराम भगवंत आले. कित्येक विचार सांगणें आहेत तर तुम्ही दरमजल येणें. बाकी सखारामपंतांनीं लिहिलें आहे त्यावरून कळेल." आबा पुरंदरे, बहिरो अनंत वगैरे तत्पक्षीय मंडळी विंचुरास जमली. तेथें निजामाचा मुरादखान व नागपुरकर जानोजी भोसले यांस मिळवून पुणेकरांविरुद्ध या मंडळींनीं नवीन घाट रचिला.§

दादाच्या या हालचाली ऐकून पुण्याच्या मंडळींस धास्ती उत्पन्न झाली. हा गृहस्थ मोठा उपद्व्यापी, काय करील याचा नेम नाहीं. निजामासारख्या शत्रूला घरांत आणून घात करील. पण दादानें आव्हान दिलें तें स्वीकारण्या-शिवाय पेशव्याला गत्यंतर नव्हतें. त्यानें मल्हाररावास भेटीस आणून त्याची विनवणी केली. धन्यास नमविण्याची ही संधि मल्हारराव बरा फुकट घालवील ? त्याच्या मागण्या कबूल करून त्याजकडून माधवरावानें निष्ठेची शपथ घेवविली.*

युद्धाच्या तयारीनें माधवराव दसऱ्यास ता. २७ सेप्टेंबरला बाहेर पडला. तितक्यांत प्रकृति बिघडल्यानें त्याचे कांहीं दिवस फुकट गेले. दरम्यान दादांकडे

‡ पुण्याजवळ. § विंचुर घ. इ. पृ० ५१–५६. * मा. रो. १·१५६.

शिष्टाईचा प्रयत्नही त्यानें चालविला. रामशास्त्री, कृष्णराव पारसनीस, उपाध्ये गंगाधरभट कर्वे दादांकडे जाऊन आले, पण उपयोग झाला नाहीं. फौजा जमवीत दादा नगरच्या बाजूस गेला. निजामाचे सरदार मुरादखान व रामचंद्र जाधव यांस पत्रें लिहून त्यानें फौजेसह साहाय्यास बोलाविलें. दोनही पक्ष युद्धाच्या तयारीस लागलेले पाहून पुष्कळ सरदारांची त्रेधा उडाली. धन्याचे चाकरीस हजर राहवयाचें एवढाच त्यांचा दंडक. पुष्कळांना दोघेही आपले धनी वाटत. शहाजी भापकरास पेशव्यानें लिहिलेलें पत्र वाचलें म्हणजे लोकांच्या मनाची तारांबळ कळून येते. §

ता० १४ सेप्टेंबरला दादा शंभर रावतांनिशीं नगरास पोंचला, तेथें निजामाचा मुरादखान औरंगाबादेहून येऊन त्यास भेटला. बापू व विठ्ठल शिवदेव हे त्या वाटाघाटींत दादाचे सहायक बनले. त्यांनीं चहूंकडे कारस्थानें पेरिलीं. हे जर तटस्थ राहिले असते तर पुढील यादवी बंद पडली असती. या बातम्या पुण्यास पोंचतांच माधवरावानें मातुश्रीच्या सल्यानें दादाशीं सामना करण्याचा निश्चय केला. गोविंद हरि लिहितो, " एकपरी झालें हें चांगलें. दुही तुटली. दादा दगा करणार होते तें अरिष्ट चुकलें. ते बाहेर गेले काय, वाड्यांत राहिले काय, त्यांच्या हातून कांहींच होणें नाहीं. सखारामास ठिकाणीं ठेवण्याची गोष्ट पूर्वींच केली असती तर इतके खेळ तरी कशास होते ! दादांस आणावयास आनंदीबाई गेली, बरें झालें." यावरून दादाचा उपक्रम आनंदीबाईला मान्य नव्हता हें उघड आहे. *

उभयपक्षांनीं भावी संग्रामाची सिद्धता ताबडतोब केली. मुरादखान व विठ्ठल सुंदर आपल्या फौजा घेऊन दादांस सामील झाले. इकडून त्रिंबकराव, गोपाळराव, आनंदराव रास्ते, मल्हारराव होळकर, पिराजी नाईक निंबाळकर इत्यादि सरदारांसह माधवराव दादासाहेबांच्या रोखें नगरच्या बाजूस चालून गेला. मल्हारराव रास्ते मात्र पेशव्यास सोडून दादासाहेबांचे पक्षांत गेला, म्हणून त्याजवर पुढें माधवरावाचा विश्वास बसला नाहीं. त्यासच दादानें जानोजी भोसल्यास आणण्यासाठीं घाईघाईनें नागपुरास रवाना केलें. मल्हारराव रास्त्याबरोबर गमाजी यमाजीही त्या कामावर गेला. पुढें हे सरदार व जानोजी भोसले आळेगांवच्या तळावर येऊन दादास सामील झाले. †

§ पे. द. १९·७. * ख. ७१–७३. † पे. द. २०·१३०–१३२.

युद्धांतील पहिला संग्राम कार्तिक व० ६ रविवार ता० ७ नोव्हेंबर रोजीं घोडनदीवर बनून आला, त्याचें वृत्त माधवरावानें मातुश्रीस कळविलें तें असें,–" तीर्थस्वरूप बेजरब आमचे गोटावर चालून आले. ते पलीकडे आम्ही अलीकडे, मध्यें नदी या प्रमाणें गांठ पडली. उतारावरच युद्ध झालें. आमची फौज अनिवार मार खाऊन उभीच राहिली. त्यांनीं गोळे टाकिले. आम्ही जेजाला बाणांचा मार दिला. त्यांनीं माघारें तोंड फिरविलें. त्यांचीं माणसें, घोडीं जखमी झालीं. नंतर आम्ही दोन तोफा सुरू केल्या, त्यांनीं काम फार केलें. सहा घटका झुंज होऊन ते माघारे दीड कोसांवर मुक्कामास गेले. दिवस मावळल्यावर लढाई थांबली. " या प्रसंगांत दादाचे दीड दोनशें व पेशव्याचे पंचवीस तीस जायां झाले. नीलकंठराव पटवर्धनास जखमा लागल्या. †

आपसांतील हा युद्धप्रसंग माधवरावाचे अंतःकरणास अत्यंत झोंबला. आपणच पडतें घेऊन चुलत्यास समक्ष भेटावें असें त्याच्या मनानें ठरविलें. त्यासाठीं त्यानें मल्हारराव होळकरास मध्यस्थीस पाठविलें. मात्र हा उपक्रम पेठे पटवर्धन वगैरेंना पसंत नव्हता. संधि आली आहे तर एकदांच कायतो निकाल करून घ्यावा ही त्यांची सल्ला. त्यांच्या सूचनेवरून पेशव्यानें आपला तळ घोडनदीवरून मागें दक्षिणेस सुमारें पंधरा मैलांवर भीमेच्या उत्तर भागीं आळेगांवावर आणिला. दरम्यान दादानें ठरविलें कीं लढूनच कायतो शेवटचा निकाल करून घ्यावा. या विचारानें त्यानें १२ नोव्हेंबर रोजीं पेशव्याच्या आळेगांवच्या तळावर चाल केली, त्यावेळचें वृत्त माधवरावानें मातुश्रीस कळविलें तें असें,–" आम्ही घोडनदीवरून कूच करून आळेगाव नजीक आलों, तों मागून त्यांच्या फौजा चालून आल्या. प्रहर दिवसापासून दिवस मावळे तों झुंज जालें. उराशीं ऊर मीं केलें. आमच्या फौजेंत फितूर यामुळें माघारें घेतलें. आम्हांकडील तीनचारशें माणूस ठार व जखमी, त्याचप्रमाणें त्यांजकडील. पण आमच्या फौजेचा धीर सुटला. रातोरात भीमा उतरून अलीकडे आलों. फौजेस उपास, मामा वगैरे सर्वांच्या मतें सल्लाच करावा. दुतर्फा सरकारची दौलत खराब होते हा विचार करून ( मीच दादासाहेबांस ) जाऊन भेटलों. गोपाळराव, त्रिंबकराव, बाबूराव फडणीस यांनीं सांगितलें, आतां प्रयत्न राहिला नाहीं. तेव्हां रास्ते यांस तीर्थरूपांकडे पाठवून भेट घेतली. इकडील प्रसंग विपरीत

† ख. ८९, १०५; पु. द. ३. ३, ८, १७, १८, १९, ७३.

झाला म्हणून मातुश्रींनीं उदास होऊं नये. काळ सदैव सारखा असतो असें नाहीं. आज शनिवारीं दोन प्रहरीं ( १३ नोव्हेंबरीं ) दादांच्या आमच्या भेटी झाल्या. एकठायींच पारगांवावर सारें लष्कर उतरलें." * पारगांव घोडनदीहून पश्चिमेस १० मैल, आळेगांव पारगांवचे उ० ४ मैल. येथेंच निजामअली दादाचे साहाय्यास दाखल झाला.

दादानें गोपिकाबाईस लिहिलें, "आमचे चित्तांत दुसरा अर्थ नाहीं. होणारानुरूप झालें. आम्ही जें करीत होतों तें दौलतेस अपाय न व्हावा या करितां. कारभारी यांचे बुद्धीनें या थरास गोष्ट आली. श्रीकृपेनें व आपले आशीर्वादें सर्व यथास्थित होईल." उभयतांच्या भेटी मल्हारराव होळकरानें घडवून आणिल्या. माधवरावानें पारनेरावर दादाचे गोटांत जाऊन शरणागति स्वीकारिली. "दोनशें राउतांनिशीं जाऊन भेटले. मुजरे केले. दादासाहेबांचा जोडा उचलून डोईवर घेतला. बहुतच आर्जवें केलीं. तेणेंकरून दादा मायावादांत पडले. रायांस आज्ञा केली कीं सर्व तुमचेंच आहे. मजला कांहीं नको. तुमची फौज येऊं देणें. त्याजवरून पांच सात हजार फौज पेशव्याची आली. रावसाहेबांनीं चार किल्ले मात्र मागून घेतले. वरकड दादांचे मर्जीप्रमाणें जाबसाल करून आपली काबू साधिली. दादांनीं मुद्दे लिहून दिले, त्यांवर यांनीं करारयाद लिहून दिली. मल्हारराव दरम्यान होऊन सल्ला ठरला." †

माधवरावानें मातुश्रीस कळविलें, "दादा साहेबांनीं बहुतां प्रकारें समाधान केलें कीं दौलत सारी तुमची आहे. कारभाऱ्यांमुळें इतका प्रकार जाहला. मन माने तसा सरंजाम सरदारांस व मोगलांस कबूल करणें प्राप्त जाला. निजामअलीस स्नेहाच्या रीतीनें काढून माघारे घालवितों. तुम्हां खेरीज व मातोश्री खेरीज मला दुसरा अर्थ नाहीं. याउपर दौलतीचा भार आम्हांवर द्यावा म्हणजे सर्व बंदोबस्त होईल. अशा गोष्टी निखालसपणें डोळ्यांत पाणी आणून बोलले. आम्हांकडील लोकांचा द्वेष ते करीत नाहींत. त्रिंबकराव व बाबूराव यांस तीर्थरूपांस भेटावयासी धीर न पुरवे, तेव्हां उभयतांस सांगितलें सिंहगडास मातोश्रींकडे जा. तें न करितां ते बारामतीस बाबूजी नायकांकडे गेले, त्यांनीं हें तीर्थरूपांस विदित केलें. त्यांची अब्रू घ्यावी हें त्यांच्या मनांत नाहीं. गोपाळराव मिरजेस गेले. सलूख करते समयीं कारभारी व गोपाळराव यांचे विचारें केला.

---

* ख. ९१. † पे. द. १९·१४ ; पु. द. ३·१०, ७३ ; चं. १४४.

त्रिवर्गांनीं आपण होऊन सांगितलें कीं या उपर ओढून धरूं नये. आमचा प्रयत्न राहिला नाहीं. भेटून सलूख करावा. ऐसें सांगितल्यावर रास्ते यांस पाठवून भेट घेतली. ” §

निष्कारण संहार टाळण्याकरितां माधवरावानें चुलत्यास शरण जाण्याचा हा जो नम्रतेचा मार्ग स्वीकारला, तो त्याच्या भावी उत्कर्षास कारण झाला आणि याच अनुभवानें पुनः चुलत्याशीं झगडा करण्याचा प्रसंग आला तेव्हां हटकून यश मिळविण्याचें सामर्थ्यही त्याला प्राप्त झालें. त्याची पंतप्रधानकी कायम होती आणि शरणागति दाखवून एक काम बिघडलें तर दुसरीं नऊ कामें आपण सिद्धीस नेऊं शकूं अशी हिंमत त्याला आली. दादाचा नाकर्तेपणा जगजाहीर असल्यामुळें लोकमताचा पाठिंबा माधवरावासच मिळाला. दादाचा अस्थिर स्वभाव ओळखून आपण लीनत्वानें त्याजकडून हवा तसा कारभार उरकूं अशी शक्कल त्यानें योजिली. आपमतलबी लोक तुम्हांस कसे फसवितात हा प्रकार जवळ राहून तो दादाचे प्रत्ययास आणूं लागला. आळेगांवच्या शरणागतीपासून राक्षसभुवनच्या संग्रामापर्यंत जो नऊ महिन्यांचा काळ गेला, त्यांत एका अर्थानें हा तरुण पेशवा जरी चुलत्याचा कैदी होता, तरी दुसऱ्या अर्थानें त्या उभयतांची लायकी नालायकी परभारें बाहेर प्रगट झाली. “जीव काढून यानें आपणांस निर्माल्यवत् केलें, निरुपाय जाणून स्नानसंध्या मान्य केली, ” असें खुद्द दादाच पुढें म्हणूं लागला. पूर्वीं फुटून गेलेले बरेच लोक आतां माधवरावाचें कर्तृत्व पाहून त्यास येऊन मिळाले. मुख्यतः सखाराम बापूवर त्यानें आपला पगडा बसविला. एक पटवर्धन मात्र सुडाच्या भावनेनें निकरावर आले. मिरजेचा मजबूद किल्ला त्यांचे कबजांत होता, तेथें दारूगोळा सामान इत्यादि त्वरेनें भरून रघुनाथरावास शह देण्याचा निश्चय समस्त पटवर्धनांनीं ठरविला.

पेशवाईच्या या गृहकलहांत आळेगांवच्या बनावाला विशेष महत्त्व आहे. निजाम, जानोजी भोसले, गमाजी यमाजी, विठ्ठल सुंदर, मुरादखान, मल्हारराव होळकर, दमाजी गायकवाड, यांशिवाय पेशव्यांच्या पदरचे सर्व लहान मोठे सरदार व मुत्सद्दी असा सुमारें एक लाखावर जमाव पाऊण महिना पावेतों या तळावर एकत्र होता. माधवराव आपण होऊन चुलत्याचे स्वाधीन झाल्यानें

---

§ ख. ९४.

मुत्सद्दी व लढवय्ये विरोधी पक्षांत सामील झालेले फशीं पडल्यासारखे झाले. अल्प काळ दादाकडे प्रमुखपण आलें. मतलबासाठीं जमविलेलीं भुतें वाटेस लावणें हेंच पहिलें निकडीचें काम दादासाहेबापुढें निर्माण झालें. "रविवार ता० २१ नोव्हेंबर रोजीं अविंधाच्या व श्रीमंतांच्या भेटी झाल्या. ता० २३ रोजीं विठ्ठल सुंदर श्रीमंतांचे डेऱ्यास मेजवानीस आले. उदईक निजाम अली श्रीमंतांकडे मेजवानीस येणार, उभयतांचा स्नेह चांगला झाला. पेशजीं उदगीर-वर घेतलेली ८५ लक्षांची जागीर व दौलताबाद किल्ला परत देऊन सल्ला केला." एवंच भाऊसाहेबानें कष्टानें मिळविलेला प्रदेश केवळ या दुहींत सोडावा लागणें हें राष्ट्रीय लांछन होय. दादानें तर निजामाला हा लांच देऊन पुढें केव्हांही त्याचें साह्य आपणास मिळण्याची सोय करून ठेविली. या व्यवहाराचें इंगित माधवरावाच्या हृत्पटलावर कायमचें कोरलें गेलें. आळेगांवा-तील या धामधुमींत त्याची प्रकृतिही नीट नव्हती, म्हणून ते व्यवहार तो स्वस्थ चित्तानें पाहत राहिला. मल्हारराव होळकर रजा घेऊन वाफगांवास गेला. दमाजीला दादानें आग्रह करून आपल्याजवळ थोडे दिवस ठेवून घेतलें.

राजकारणाच्या दृष्टीनें तर आळेगांवचा हा प्रतिष्ठित जमाव जास्तच संस्मरणीय बनला. रथी महारथी सर्व पक्षीय शहाणे महिना पंधरा दिवस एकत्र जमून बुद्धिप्रभाव गाजवूं लागले, त्यांतूनच पुढें साडेतीन शहाण्यांची प्रख्या निघाली असें दिसतें. जानोजीचा देवाजीपंत, निजामाचा विठ्ठल सुंदर व दादासाहेबांचा सखारामबापू हें त्रितय या संयुक्त छावणींत प्रथम प्रकाशायला लागलें. गमाजी यमाजी त्याच कोटींतला. पुढें अल्पावकाशांत या ताऱ्यांनीं महाराष्ट्रक्षितिजावर आपला प्रभाव गाजविलेला दिसतो. एकमेकांवर मात करण्याला भरपूर क्षेत्र या वेळीं निर्माण झालें. बिचारा माधवराव व त्याचा कैवारी उदयेच्छु नाना फडणीस कपाळास हात लावून दुःखावेग अनुभवीत होते. त्यांनीं पुढें यथाकाल तीन शहाण्यांना ठिकाणीं बसवून आपल्या अर्ध्या शहाणपणाची शक्ति दाखविली. या तीन शहाण्यांचीं अंतस्थ खलबतें काय चाललीं होतीं आणि त्या खलबतांतूत त्यांनीं काय कमाई केली हें प्रथम सांगणें अवश्य आहे. पेशव्याचें सामर्थ्य छत्रपतीपासून निघत असल्यामुळें मागें पुढें दादासाहेब पेशवा झाला तर त्याला सोयवार पडेल असा छत्रपति हाताशीं पाहिजे ना! या दृष्टीनें जानोजी भोसल्यास छत्रपति करण्याची कल्पना

निजामशाहीच्या शहाण्यानें काढिली, म्हणजे दादाला वस्त्रें मिळण्याची पंचाईत मिटली. पण हीं वस्त्रें देण्याला प्रतिनिधि लागतो, म्हणून दुसऱ्या एका शहाण्यानें शक्कल काढली कीं या संधींत दादासाहेबांना ता. २६ फेब्रु० १७६२ रोजीं पुत्र झाला होता, त्यासच प्रतिनिधिपद द्यावें. तिसरा शहाणा नागपुरचा हजर होता त्याला कांहीं तरी कार्यभाग नको का ! त्यानें अंतस्थपणें निजामअली व जानोजी भोसले यांचें गुप्त रहस्य जमवून प्रत्यक्ष पेशव्यांच्या पुण्यावरच घाला घालावा अशी योजना बांधून तो बार भरून ठेविला. पण पेशवाई टिकेल तरच मराठ्यांचें राज्य टिकणार आणि तें राज्य टिकेल तरच छत्रपति प्रतिनिधि इत्यादींचें अस्तित्व, हा उघडा विचार या शहाण्यांचे मनांत आला नाहीं.

एवंच दादानें स्नानसंध्येच्या निवृत्तीचें ढोंग करून चार दोन महिन्यांत माधवरावास दुर्बल बनवून आपल्या मतें मोठा डाव जिंकला. हातीं भरपूर सत्ता आली तिचा उपयोग करून त्यानें प्रथम भानूंच्या घरची पिढीजाद फडणिसी काढून ती चिंतो विठ्ठलास दिली. त्रिंबकरावास दूर करून कारभार सखाराम बापूला सांगितला, आणि त्याच्या वास्तव्यासाठीं सिंहगड किल्ला त्याचे ताब्यांत दिला. पुरंदरची मालकी व पेशव्याची मुतालकी त्यानें नीळकंठ आबा पुरंदरे याजकडे कायम करून त्याला आपल्या लगामीं लावून घेतलें. नाना पुरंदऱ्याची मालकी उडवून दिली. महिपतराव चिटणीसास लोहगड दिला. दादांचा पुत्र भास्करराव अल्पवयी प्रतिनिधि होणार सबब त्याची मुतालकी नारोशंकर याजकडे दिली. अर्थात् खरा हक्कदार मुतालिक गमाजी यमाजी या घटनेनें संतप्त झाला. अशा रीतीनें माधवरावाचे सर्व सहाय्यक ठिकाणीं बसवून खुद्द त्याचे डेऱ्यावर दोन हजार गारद्यांचा पहारा दादानें बसविला, म्हणजे तो पक्का कैदी बनला. तसाच आणखी गारद्यांचा पहारा त्यानें पुण्यांत गोपिकाबाईच्या मुक्कामावर बसविला. गोविंद शिवराम खासगीवाल्यास पुण्यांतून हाकून दिलें. अशा रीतीनें दादानें आपला बंदोबस्त कडेकोट बनविला. गोविंद हरीचा एक हस्तक आळेगांवीं हजर होता, त्यानें खालील हकीकत आपल्या धन्यास मिरजेस कळविलेली आढळते.

" श्रीमंतांनीं मुलकाची बंदोबस्ती येणें प्रमाणें केली. सिंहगड सखारामपंतास, पुरंदर नीलकंठ महादेवास, चिटणीसास लोहगड, मुरादखानास दौलताबाद, जानराव निंबाळकरास अहंमदनगर, पिराजीस नेवासें वगैरे महाल द्यावे. निजाम

अलीस साठांची जहागीर देतों म्हणत होते, परंतु तो ऐकत नाहीं, आजपर्यंत घेतलेला सर्व मुलुख तो परत मागतो. नाना पुरंदरे याची मामलत काढून घेतली. देशत्याग करून जाण्यास सांगितलें. बाबूजी नायकास शिव्यागाळी करून बारामतीस घालविलें. आपणास वीस लक्षांची जागीर नासिक प्रांतीं ठेविली आहे." *

ताराबाई जिवंत असेपर्यंत रामराजा साताऱ्यावर तिच्या कैदेंत होता. ती वारल्यावर माधवरावानें छत्रपतीचा प्रतिबंध दूर करून त्यास खालीं वाड्यांत राहून कारभार करण्याची सोय करून दिली. छत्रपति पेशव्यांचे स्वामी असतां सेवकांनीं धन्याची दुर्दशा केल्यामुळें पानिपतचें अरिष्ट उद्भवून नानासाहेबाची वाताहत झाली, स्वामिद्रोहाचें पाप केलें त्याचा बदला परमेश्वरानें दिला, असा एक सार्वत्रिक समज त्यावेळीं चहूंकडे बोलण्यांत येऊं लागला. हा प्रकार स. १७६२ च्या आरंभींच माधवरावानें दुरुस्त करून छत्रपतीस स्वतंत्रता दिली. त्रिंबक सदाशिव म्हणजे नाना पुरंदरे याचा पुत्र महिपतराव यास सातारा येथें आपल्या तर्फेनें छत्रपतीची व्यवस्था ठेवण्यास नेमिलें. महाराजांच्या दोन कन्या होत्या, त्यांचीं लग्नें यथायोग्य करून दिलीं. ‡ हा जो फेरफार माधवरावानें नवीन केला तो आतां अडचणीच्या प्रसंगीं त्याचे उपयोगास आला. रघुनाथरावास रामराजाचा भरंवसा येईना. त्यास काढून जानोजीस छत्रपतिपदावर रुजू करणें आणि तेथील सर्व व्यवस्था आपल्यास अनुकूल बनविणें हीं निकडीचीं कामें उपस्थित झालीं. शिवाय पेठे व बाबूराव फडणीस बारामतीस जाऊन उपद्रव करूं लागले, पटवर्धन मिरज बळकावून बसले, प्रतिनिधिपदाची भानगड मिटविणें यासाठीं दादानें ६ डिसेंबरास आळेगांवचा तळ सोडून साताऱ्याकडे प्रयाण चालविलें. दादा आपला सूड घेणार या भावनेंत माधवरावाचे पक्षपाती आपापल्या बचावास लागले. बारामतीवर दादा आल्यास ठाणें लढविण्याचा विचार त्रिंबकराव वगैरेंनीं ठरविला. दादानें गोविंद हरीस दरडावणी घातली, कीं गोपाळराव दंगा करतात सबब मिरजेचें ठाणें व तुमचा सर्व सरंजाम तूर्त आमचे हवालीं करा. या मागणीमुळें सर्व पटवर्धनमंडळी एकदम बिथरली. गमाजी यमाजीची मुतालकी गेल्यामुळें तो गोपाळरावास सामील

* ख. १०४. यावेळीं निजामअलीचा पाय मराठ्यांचे राज्यांत रुजला.

‡ धा. रा. च. पृ. ३१

झाला. गोपाळराव तापट वृत्तीचा मनुष्य वाटेल तें साहस करण्यास तयार, म्हणून दादाचा त्याजवर मुख्य रोष. प्रत्यक्ष पुतण्याला ज्यानें नमविलें तो दादा आतां आपली वाट लावल्याशिवाय राहणार नाहीं, हें पुरतेपणीं ओळखून गोपाळरावानें निजामअलीशीं संधान बांधलें कीं प्रसंग आल्यास बाहेर आश्रय असावा. मिळून गोविंद हरि व गोपाळराव दोघेही दादावर तुटून पडण्यास तयार झाले. गोविंद हरीनें दादास स्पष्ट जबाब कळविला, कीं "आज तीन वर्षांत पेशव्यांची कामगिरी करितांना आम्हांस पंचवीस लाख कर्ज झालें आहे. ती आमची रक्कम द्या म्हणजे आम्ही मिरज सोडून बाहेर वाटेल तिकडे जाऊन पोट भरूं. पण आमचें कर्ज फिटेपर्यंत मिरज किंवा सरंजाम सोडणार नाहीं." गोविंद हरीनें दादास लिहिलेलें २२ नोव्हेंबरचें हें बाणेदार पत्र सर्वच वाचण्यालायक आहे.*

गोविंद हरीनें मिरजेवर दादाशीं सामना करण्याचा निश्चय ठरवून आपली तयारी चालविली. पुण्यापासून सातारा मिरजपर्यंतचा प्रदेश हादरून गेला. निजामाचा सरदार रामचंद्र जाधव व त्याचा भाऊ मीर मोगल हे पटवर्धनांचें साह्य करूं लागले. खुद्द निजामअली तटस्थेचा बहाणा दाखवून हरतऱ्हेनें मराठी राज्य बुडविण्याचा उद्योग करूं लागला. याचें प्रतीक रामचंद्र जाधवानेंच आचरून दाखविलें. आळेगांवाहून परत जातांना जाधवानें पंढरपुरचें क्षेत्र लुटून धुळीस मिळविलें. हिंदूंनीं मुसलमानी सेवा तत्परतेनें कां न करून दाखवावी.‡

**४. तीन कृतकर्मे**—दादा, सखारामबापू व आबा पुरंदरे यांस 'कृतकर्मे' हें उपपद त्यावेळच्या कागदांत दिलेलें आढळतें. यांत आणखी दोन नारोशंकर व विठ्ठल शिवदेव मिलाफी असून हें पंचायतन आतां अल्पकाळ आपली करामत दाखवूं लागलें. ता० ६ डिसेंबरास यांनीं आळेगांवचा तळ सोडला. आपला शह बसवीत ते साताऱ्याकडे गेले. त्यावेळीं प्रतिनिधिपदावर भवानराव होता. आपलें पद जाणार या दुःखानें तो कष्टी होऊन किन्हईच्या देवीपुढें अनुष्ठान करीत बसला. त्याचा मुतालिक गमाजी पटवर्धनांस सामील होऊन पेशव्यावर सूड उगवूं लागला. दादानें सातारा येथें ता० १३ डिसेंबरास भवानरावाचें पद काढून तें आपल्या मुलाच्या नांवें केलें आणि नारो शंकरास मुतालकी सांगितली. प्रत्यक्ष छत्रपतीस दूर करण्याचा खटाटोप दादानें त्यावेळीं

---

* ख. ११६. ‡ ख. १२१,१२३.

केला नाहीं. दुर्दैवानें दादाचा हा पुत्र पुढें तीन महिन्यांनीं स. १७६३ च्या मार्चांत देवी येऊन मृत्यु पावला ‡ त्यामुळें सर्वच डाव कोसळून पडला. दादाबरोबर दमाजी गायकवाड होता. त्यास त्यानें रामराजाकडून सेनाखासखेलीचीं वस्त्रें देववून सेनापतिपद मूळचें दाभाड्याचें तें रामचंद्र जाधवास दिलें. पंढरपुर क्षेत्राचा नाश केल्याचें हें बक्षीस त्याला मिळालें. हा उपकार जाधवानें कसा फेडला तोही प्रकार पुढें कळून येईल. न्यायाधिशीवर दादानें विठ्ठल शिवदेवाची नेमणूक केली. पटवर्धनांचा सरंजाम सर्व जप्त करून तो आपला मेहुणा गोपाळराव बर्वे याचे नांवें लिहून दिला. अशा रीतीनें सर्व सहायकांची बोळवण करून दादानें माधवरावासह कर्नाटकांत जाण्याचें ठरविलें. दरम्यान मिरजेवर पटवर्धन त्यास आडवे आले त्यांची खोड मोडणें ओघास आलें. २० डिसेंबरास साताऱ्याहून निघाले.*

ता. २९ डिसेंबर रोजीं मिरजेस मोर्चे लावले. काम वाटलें तितकें सोपें नव्हतें. गोविंद हरि मोठा आवेशी गृहस्थ. त्यानें अशा निकराचा सामना केला कीं दादास कायमची आठवण राहवी. एक महिना त्यानें एवढ्या फौजेस चैन पडूं दिलें नाहीं. दोघेही हट्टास पेटले. गोविंद हरीचा निभाव लागेना, तेव्हां मध्यस्थांमार्फत बोलणें करून ३ फेब्रुवारीस त्यानें किल्ला दादाचे कबजांत दिला. गोविंद हरीचें कर्ज वारण्याची जबाबदारी दादानें स्वीकारली आणि एका मिरजेशिवाय बाकीचा सर्व प्रदेश त्यानें पटवर्धनांचा पूर्ववत् कायम ठेवला. हजार बाराशें लोकांनिशीं गोविंद हरीनें पन्नास हजारांशीं जो हा सामना केला त्या योगानें त्याची चहूंकडे वाहवा होऊन दादासच खालीं पाहण्याचा प्रसंग आला. तूर्त गोविंद हरि मंगळवेढ्यास जाऊन पुत्र गोपाळरावाचे बचावाचा उपाय करूं लागला. मिरज कबजांत आल्याचा संतोष दादामाधवरावांनीं गोपिकाबाईस लिहून कळविला. गोविंद हरि लिहितो, "श्रीनें आमची लज्जा रक्षिली. चार खंडांत झुंजाचा लौकिक जाला, धन्यास यश आलें. श्रीमंतांची सारी फौज आमच्या शौर्याचें आश्चर्य करून राहिली. पुढें परिणाम श्री लावील." §

दरम्यान गोविंद हरीचा पुत्र गोपाळराव स्वस्थ बसला नव्हता. बापापेक्षांही तो जास्त उपद्व्यापी. दादानें आबा पुरंदरे यास त्याचे पाठीवर रवाना केलें

‡ हा पुत्र त्रिंबकेश्वरीं मातुश्रीजवळ वारला अशी बातमी दादास कळली, (मार्च ७—१२).

* साताऱ्याचा वृत्तान्त पु. द. ३·१२५ मध्यें पहावा.

§ ख. १६८ वगैरे पुष्कळ भारूड मिरजेचें आहे.

होतें. २४ डिसेंबरास आबानें त्यास जमखिंडीजवळ गांठून त्याचा धुव्वा उडविला आणि लष्कर लुटून घेतलें. * खुद्द गोपाळराव जीव बचावण्यासाठीं निजामाचे आश्रयास गेला. ता. ३ जानेवारीस उभयतांची भेट झाली. आळेगांव सोडल्यावर निजामअली यावेळीं पुढील योजना ठरवीत महाराष्ट्रांतच होता. दादाचे हालचालींवर लक्ष ठेवीत शक्य तितका आपला लाग साधून जानोजी भोसले व गोपाळराव यांस तो आपले लगामीं लावीत होता. गोपाळरावास प्रत्यक्ष कुमक अशी निजामानें कांहींच केली नाहीं. उलट निजामाचा आश्रय केल्यानें तो फशीं पडला, आणि पुढें निजामानें जे अत्याचार केले त्यांची आळ गोपाळरावावर आली. स. १७६३ चे सहा सात महिने गोपाळराव निजामाचे संगतींत राहून आपला बचाव करीत होता. गोपिकाबाई सुद्धां सर्व लोक त्यास दूषणें देऊं लागले. वस्तुतः सर्व पटवर्धन मंडळी यावेळीं मोठ्या पेचांत आली. उभें राहण्यास जागा नाहीं असें होऊन त्यांनीं मातुश्रींचीं व दादांचीं आर्जवें चालविलीं. धन्याचे घरांत कलह लागला कीं सेवकांची दुरवस्था कशी होते हें येथें निदर्शनास आलें. पटवर्धनांची ही करुण वाणी पहा. “जन्मभरी अन्न भक्षिलें. आतां कोणाकडे जावें. जीव कसा वांचेल ही चिंता करतों तों घाला पडला. एक धोतर नेसावयास नाहीं कीं समागमें मनुष्य नाहीं. प्राणाशीं संकट. सेवा केली तेंच पुण्य, तेणेंकरून पार होऊं. निमकहरामी केली नाहीं. कोटि अपराध, परंतु स्वामींचे एकनिष्ठ सेवक आहों. जीव वांचवावयास कोठें आश्रय दिसेना, यवनांकडे जावें, तूर्त जीव वांचवावा म्हणोन मनसबा करून गेलों. स्वामींचे अनिष्ट करावें हा अर्थ नाहीं. गमाजीबावा नबाबाकडे गेले, त्यांनीं जाऊन भोसले आणिले. नबाबांनीं आपला भारीपणा जाणोन बिघाड केला. उत्पात मांडिला. गोपाळरावांनीं लष्कराचें कहीकबाड मारिलें नाहीं. गाव लुटले नाहींत. जीव बचावून राहिलों.” खुद्द सखारामबापू गोपिकाबाईस लिहितो, “दादासाहेबांचे मर्जीचा प्रकार आपले ध्यानांत आहेच. जेथवर संभाळायचें तेथवर चुकत नाहीं. सर्व थोड्या बहुतानें मेळवून घेतले. गोपाळरावांनीं फार ओढून धरलें त्यास आमचा इलाज चालला नाहीं.” †

मिरज घेतल्यावर दादा पुढें कर्नाटकांत जाणार तों विरुद्ध कारस्थान एकदम बळावलें. जानोजीचा वकील येऊन सातार्‍यास छत्रपतीस भेटला.

* ख. १४२, १४५. † ख. १५२, १४४.

पेशवाईचीं गृहछिद्रें विठ्ठल सुंदरास चांगलीं अवगत होतीं. त्यानें निजामअलीस भर दिली कीं हा प्रसंग पेशव्यावर चढाई करायला योग्य आहे. यमाजी शिवदेव सामील झाला. निजामाचें व गमाजीचें सूत जमलें. गमाजीनें जानोजी भोसल्यास निजामअलीचे भेटीस आणिलें. त्यांनीं आपसांतील भानगडी मिटविण्यासाठीं साठचाळिशीचा करार ठरविला. म्हणजे जी काय नवीन प्राप्ति उभयतांचे प्रयत्नानें होईल, तिजपैकीं शेंकडा साठ ऐवज निजामास व चाळीस भोसल्यास मिळावा. या करारानें भोसले निजामाचें पूर्वीचें वैर मावळून त्यांचें अल्पकाळ सख्य जमलें. *

छ २५ रजबीं म्हणजे ९ फेब्रुवारी स. १७६३ ला कलबर्ग्यानजीक नबाबाच्या व जानोजीच्या भेटी झाल्या. गोपाळराव व गमाजी यांनीं त्यांस भर दिली. भेटींत ठरलें कीं सातान्यास जाऊन जानोजीबावास राज्यीं बैसवून आपले अर्थ सिद्धीस न्यावे. आणभाक क्रिया प्रमाण जाली. बरोबर फौज नबाबाची पंचेचाळीस हजार, भोसल्यांची तीस हजार, दीडशें तोफा व दहा हजार गाडदी, येणें प्रमाणें भीवरेवर आले. असे बलवान मराठे सरदार निजामअलीस मिळाल्याबरोबर त्याला विलक्षण बळ चढलें. त्यानें आपल्या चढाईच्या मागण्या पेशव्यांस कळविल्या, कीं भीमेपलीकडील सर्व मुलूख आपले हवालीं करावा. आमचे महत्त्वाचे किल्ले व स्थळें तुम्हीं घेतलेलीं परत द्यावीं आणि तुम्ही आपला कारभार आमच्या विद्यमानें करावा. या अपमानकारक मागण्यांनीं पेशव्यांचा तीन पिढ्यांचा उद्योग वायां जाऊन महाराष्ट्रावर मुसलमानी सत्ता कायम होण्याचा प्रसंग आला. मात्र याचा परिणाम निजामअलीच्या अपेक्षेहून अगदीं उलट झाला. सर्व मराठ्यांस नवीन आवेश चढला. दादा, सखारामबापू इत्यादींनीं आपले पूर्वीचे भेद विसरून निजामाशीं गनिमी युद्ध करण्याचें ठरविलें. या प्रकरणाचे महत्त्वाचे तपशील पुष्कळ असून ते अभ्यसनीय आहेत.†

मराठी राज्य बुडण्याचा हा प्रसंग सर्व लहान मोठ्यांच्या वर्मीं लागून अल्पकाळ मंडळींना नवीन पाणी चढलें. पूर्वीचे हेवे दावे बंद झाले. माधवरावानें

---

* ऐ. प. १०४; ख० १८३, १८५. यमाजी शिवदेव या वेळीं पूर्ववत् वावरतांना दिसतो, पे. द. २०·१३४ + ख. १७५–१७६, ऐ. प. १०४; पे. द. ३८·७८, ७९; पे. द. २०·१३७, १३८; ऐ. टि. १·३२.

मातुश्रीस लिहिलें, " गोपाळरावांनीं न करावयाची गोष्ट करून मोगल आम्हांवर घेऊन येतात. त्यांस भिऊन दौलत द्यावी तर मोगलांची चाकरी करणें पडेल. याउपर मोगलांस दबल्यानें परिणाम नाहीं. आरंभींच कारभाऱ्यांचे पेंचामुळें दौलतेच्या तणावा तुटत चालल्या. लोक फितुर जाले. पत उडाली. त्यांतून पैसा नाहीं, तेव्हां फौज कशानें ठेवावी. फौज नाहीं, तर दौलत कशी टिकणार ! सारें अवघडच आहे. प्रस्तुत दादासाहेब व आम्ही एक झालों हीच गोष्ट एका करोडीची झाली. त्यांची आमची एकवाक्यता झाली. कारभारीही उत्तम प्रकारें लगामीं लागले. ज्या गोष्टीनें दौलतीस कल्याण तीच गोष्ट साऱ्यांनीं करावी ही बुद्धि आहे. परिणाम लावणार परमेश्वर व वडिलांचें पुण्य समर्थ आहे. " दादाला आपल्या कृत्याची थोडी तरी उमज यावेळीं पडून सर्वांनीं एकदिलानें निजामाला वठणीस आणण्याचा निश्चय केला. §

दादानेंही गोपिकाबाईस लिहिलें, " भोसल्यांचें आम्ही कांहीं वाईट न करितां गोपाळराव व गमाजीबावा यांनीं उत्पात करून नेले. मोगल नानाप्रकारचे मुद्दे घालतो यास्तव आपली गनिमीची रीत स्वीकारून मल्हाररावास मेळवून मोगलावर जावें असा विचार आहे. " याप्रमाणें हें समान संकट महाराष्ट्राची दुही तूर्तातूर्त मिटविण्यास उपयोगी पडलें. आळेगांवावर निजामास आळविण्याचे दादाचे विचार आतां मावळले. सखारामबापूनें नवीन आवेश धारण केला. त्याची बुद्धि नवीन युक्त्या सुचवूं लागली. त्यानें प्रत्येकास समजुतीच्या गोष्टी सांगून पूर्वींचे राग, द्वेष व कृति विसरून एकजुटीनें राज्याची इभ्रत सांभाळावी अशी स्फूर्ति उत्पन्न केली. निजामाचा तोफखाना भारी, त्यापुढें आपला निभाव लागणार नाहीं सबब धावपळीचें युद्ध चालवून शत्रूस अडचणींत गांठावें हा डाव बापूनें सुचविला तो सर्वांनीं स्वीकारून पांच महिन्यांत यशस्वी करून दाखविला.

**५. युद्धाचा धुमाकूळ**— मिरजेहून मराठी फौजा कर्नाटकचा रोख सोडून फेब्रुवारी अखेर उत्तराभिमुख झाल्या. मल्हारराव होळकर गनिमी युद्धांत निष्णात म्हणून त्यास आणण्यासाठीं दादानें नारोशंकरास वाफगांवास पाठविलें. बापूनें गंगोबा तात्यास आर्जवाचीं पत्रें लिहून पुढील कार्यास उद्युक्त केलें. त्यांना तरी धन्याकडून आपले मतलब साधण्याची अशी संधि केव्हां मिळणार ! त्यांची

§ ख. ९९.

पेशव्यांनीं केलेली मनधरणी व आपले मतलब उगविण्यासाठीं केलेल्या त्यांच्या कारवाया पाहून मोठा उद्वेग वाटतो. § माधवरावास गंगाधरतात्याची पहिली चुणूक यावेळीं मिळाली.

पेशव्याच्या फौजा नगरपैठणवरून मोगलाचा मुलूख उध्वस्त करीत ता. ७ मार्चला औरंगाबादेवर आल्या. नंतर तेथें १२ मार्चला होळकर येऊन सामील झाला. येतां क्षणीं दादानें त्या शहरावर हल्ला केला तो सफल झाला नाहीं. मुरादखान शहर संरक्षण करीत असून त्यानें मराठ्यांस दोन लक्ष देऊन शहरास उपद्रव देऊं नये असा करार केला. * निजामाचा दुसरा सरदार रामचंद्र जाधव यास दादानें आळेगांवावर फोडून आपल्याकडे आणिलें. त्याचे उपद्व्याप संभाळतांना दादास आतां पुरेवाट झाली. बाळाजी विश्वनाथास दगा देणाऱ्या चंद्रसेनाचा हा पुत्र विश्वासघात केल्याशिवाय कसा राहील ! "घोडनदीच्या लढाईत चाकरीस चुकले. नंतर पंढरपुर लुटलें तो अन्याय माफ केला. सेनापतीचीं वस्त्रें देवविलीं. मिरजेवर रुसले तेव्हां सरंजाम देऊन समजूत काढिली. सर्वही आडभीड चालवीत असतां फितवा चालूच राहिला. निजामाकडे सूत्रें खेळविलीं. मिरजेहून फौजेबरोबर न येतां मागें राहून गांव लुटीत व खंडण्या घेत आले. एक दोन खूनही केले. औरंगाबादेवर पुनः अडले. शहरावर हल्ला केला ते दिवशीं दादासाहेब हत्तीवर बसले असतां माहुतास गोळी लागली तें अरिष्ट दादासाहेबांचें टळलें. पुढें दादासाहेब शहराहून कूच करून निघाले तेव्हां दोन प्रहरीं भोजनोत्तर शेतखान्यांतून निघते समयीं एका मुसलमान गाड्यानें त्यांजवर कट्यार चालविली, ती कारीगर जाली नाहीं. त्या गाड्यानें नांव रामचंद्र जाधवाचें घेतलें. मोगलास सामील असल्याचे कागद सांपडले. अन्याय लागू करून खुद्द रामचंद्र व त्याचा दत्तक पुत्र श्रीपतराव यांचे पायांत बेड्या घालून दौलताबादेवर ठेविले, त्यांचा गोठ लुटून फस्त केला." हा बनाव ता. ७, ८ मार्चचा होय. ‡

यावेळीं युद्धाचे खर्चाची मोठी अडचण पेशव्यास उत्पन्न झाली. सरदारांची मनधरणी करण्यांत त्यांस मुलूख द्यावा लागला. प्रत्यक्ष उत्पन्न कांहीं नाहीं

§ ख. १९३, २०४. चं. ५३, ५४, ६०, १४३ ; पे. द. ३८. ८०, ८२.

* ख. १९३. ‡ ख. २०४–२०६, २०९; पे. द. ३८. ८३. राक्षसभुवनच्या तहांत जाधवाची सुटका झाली. स. १७७० त त्यास निजामअलीनें ठार मारिलें. पापाचें क्षालन झालें.

आणि फौज जमवायची तर त्यासाठीं पैसा पदरांत ओतावा तेव्हांच लोक बाहेर पडत. होळकर, नारोशंकर, विंचूरकर इत्यादिकांस नवीन बक्षीस दिल्याशिवाय ते फौजा घेऊन बाहेर पडेनात. सर्वांत अग्रगण्य मल्हारराव होळकर. त्याची समजूत काढल्याशिवाय पुढें पाऊल पडेना. म्हणून त्यास दहा हजारांचा सरंजाम नवीन दिला. पण अशा खैरातीनें जास्तच तूट उत्पन्न झाली तेव्हां पेशवा दादासाहेब, सखारामबापू अशांनीं औरंगाबाद येथें एकत्र विचार करून सर्वांवर नवीन पट्टी बसविण्याचा प्रयोग ठरविला. प्रत्येक सरदारानें आपल्या उत्पन्नाचा एकचतुर्थांश सरकारांत द्यावा, संकटसमयीं राज्याची नड सर्वांनीं मिळून निभावली पाहिजे अशी योजना ठरविली, त्यामुळें मोठा घोळ पडला. शेवटीं हा प्रकार सर्वांकडून सक्तीनें अंमलांत आणविला. होळकरानें मोठें अंकाडतांडव केलें, पण शेवटीं त्यानें कबुली दिली. तूर्तातूर्त चौथाई उत्पन्न सरकारांत घेऊन प्रस्तुतची नड भागविली. शिवाय पेशव्यांजवळ जो खासगी ऐवज जामदारखान्यांत होता, त्याची मोडतोड करून कांहीं पैदास केली. अलीकडील राष्ट्रकर्ज उभारण्यांतलाच हा प्रकार होय. ‡

पेशवे औरंगाबादेवर गेल्याचें ऐकून त्यांजवर भोसले-निजामांच्या फौजा चालून आल्या. सर्वांपुढें जानोजी वीस हजार फौजेनिशीं, त्यांमागें दहा हजार घेऊन विनायकदास, त्यांच्यामागें खुद्द निजामअली चहूंकोशांवर असे गेले. दादा औरंगाबादेवर असतां त्याचा पुत्र भास्करराव त्रिंबकेश्वरीं मातुश्रीजवळ वारल्याची खबर आली, तेणेंकरून तो पूर्वींचा व्यूह ढासळला. प्रतिनिधीचें वैर तेवढें पदरांत पडलें. गमाजी व गोपाळराव यांस दादानें निष्कारण दुखविलें नसतें तर सर्व राजकारण निराळें बनलें असतें.

औरंगाबादेवरून १५-२० मार्चचे सुमारास मराठी फौजा वऱ्हाड प्रांत लुटीत मलकापुरावर गेल्या. त्या शहरांतून चाळीस हजार खंडणी घेतली. दरम्यान त्यांचे पाठीवर निजाम व जानोजी बाळापुरावर येऊन पोंचले, म्हणून त्यांस चुकविण्यासाठीं पेशवे दक्षिणेस वळून हैदराबाद राज्यांत शिरले. त्यांचे मुक्काम खालीं दाखविलेले लक्षांत ठेवावे. पैठण ३० मार्च, नलदुर्ग एप्रिल १०, तेथून २३ एप्रिल उदगीर, १० मे मेदक, १५ मे हैदराबाद, १७ जून चितापुर, २३

---

‡ ख० २०५ व पृ० ३०१, पे. द. ३८·८६ ; रा० खं० १२·६४.

जून गुलबर्गा, पुढें जुलईंत बारशी पानगाववरून ८ ऑगस्टला मुक्काम बीड. तेथून १० ऑगस्टला राक्षसभुवनचा संग्राम झाला.

मिरजवरून वऱ्हाडांतील मलकापुर, तेथून भागानगर व परत राक्षसभुवन एवढ्या विस्तृत टापूंत स. १७६३ चे मार्च ऑगस्टचे सहा महिने उभयपक्षांच्या हालचालींनीं कशा धामधुमींत गेले असावे याची आपण कल्पना करावी. एप्रिल मे या दोन महिन्यांत कमालीची लूट व जाळपोळ झाली. त्यापुढील दोन महिन्यांत पावसाळ्याच्या छावणीच्या धडपडीसाठीं उभय फौजा एकमेकांस गांठण्याची संधि पाहूं लागल्या. ही त्यांची मिठी १० ऑगस्टला राक्षसभुवनवर सुटली. सहा महिन्यांच्या या दीर्घकालांत राजकारणाचे व युद्धाचे विविध डावपेच सारखे चालू राहिले. ज्या निजामाशीं गळ्यांत गळा घालून दादानें नुकतेंच सख्य जोडलें, तोच आतां उलट छातीवर आलेला पाहून त्याला असा कांहीं आवेश चढला कीं त्याला आवरून धरतांना जवळच्यांची पुरेवाट झाली. कारण अनुकूल संधि येण्यापूर्वीच निजामाशीं गांठ घालण्यानें सर्वच नाश झाला असता. दादाच्या युद्धाचा हा आवेश थोपवून धरण्यास कसे प्रयास पडले ते अवश्य वाचण्यासारखे आहेत. * दादाचें सर्वच वृत्त इतकें चमत्कारिक आहे कीं त्यानेंच या उत्तर मराठशाहीचा बराचसा इतिहास व्यापलेला आहे. "आम्हांस दौलत नलगे, या मुलासाठीं इतकें करतों," असें एका तोंडानें बोलणारा गृहस्थ, दौलतीची वांटणी करून मागतो, नारायणरावाचा खून नाकबूल करून शेवटीं त्याच्या निवृत्तीचें प्रायश्चित्त मृत्युपूर्वी चार महिने घेऊन भावजयीच्या चरणीं लीन होतो. असे त्याचे विक्षिप्त खेळ एकसमयावच्छेदें लक्षांत आणले म्हणजे दादांची ही मूर्ति घडविण्यांत विधात्यानें कांहीं विशेष अक्कल लढविली असली पाहिजे असें वाटूं लागतें. तूर्त या युद्धांत माधवरावानें युक्तीनें सर्व सूत्रें खेळवून चुलत्यास संभाळून धरलें म्हणूनच पुढें जय मिळाला यांत संशय नाहीं. ता. २५ मे रोजीं माधवरावानें विजयदुर्ग येथें धुळपाच्या आरमाराचा बंद ठरवून दिला, त्यावरून त्याच्या सर्वांगीण दृष्टीची कल्पना करावी. ‡

होळकर, गायकवाड, सखारामबापू वगैरे सर्व प्रमुख गृहस्थ संगतमतानें निजामाला अडचणींत गांठण्याची शिकस्त करूं लागले. अशी जूट पूर्वी कधीं

* खरे २८४ व ऐ. टि. २ पृ० २७ ले० ४. ‡ ऐ. सं. सा. ३ पृ० ३९, ले. २९२.

बनून आली नव्हती. फुटून गेलेल्या सरदारांस परत आणल्याशिवाय निजामाशीं गांठ घालणें घातक झालें असतें. त्यांचीं आर्जवें करावीं तर धन्याचा बोज राहत नाहीं हें ओळखून माधवरावानें युक्तीनें त्या मंडळीस निजामापासून अलग केलें आणि मग त्याशीं गांठ घातली. मराठे हैदराबादेकडे गेले त्याचा वचपा काढण्यासाठीं निजाम पुण्यावर चालून गेला. तेव्हां माधवरावानें मातुश्रीस आश्रयार्थ सिंहगड किल्ल्यावर जाण्याची सूचना केली. ती स्वतः या दोन वर्षांतील कटु अनुभवानें निर्विकार व निरिच्छ बनली. दादानें तर प्रस्तुत संकटाचें कारण दुष्टग्रहांकडे लाविलें. मातुश्रीचें समाधान करतांना तो तिला लिहितो, " प्रस्तुत ग्रहण व षड्ग्रही आली आहे. आणीकही दोनचार योग क्रूरच आहेत. " राज्याचे कारभारास हें लंगडें समर्थन बिलकूल शोभत नाहीं, तथापि नारायणरावाचें लग्न ठरलें होतें, त्यासाठीं बाई २२ एप्रिल रोजीं पुणें सोडून सिंहगडावर जाऊन राहिली. पुण्याचे लोक चिंतातुर झाले. गोपाळराव निजामास आवरून पुण्याचा बचाव करील अशी गोपिकाबाईला आशा होती ती विफल ठरली. निजाम गोपाळरावास थोडीच भीक घालणार! तो गोपाळरावाचा उपयोग केवळ आपल्या मतलबापुरता करीत होता. पेशव्याचे तर्फेनें कोणी प्रमुख येऊन गोपाळरावाची समजूत करीपर्यंत त्याला कष्टानें कालहरण करीत बसावें लागलें.

मोगलानें आपल्या लष्कराचे तीन भाग केले. एक भाग विनायकदासानें नाशकाकडे नेला. स्वतः निजामअली नगरावर राहिला. जानोजी भोसले व गमाजी तिसरा भाग पुण्यावर घेऊन गेले. " पहिला भाग नासिक, त्र्यंबक, जुन्नर लुटीत पुण्याकडे आला. चिंचवडच्या देवांनीं पंधरा हजार दंड भरून आपला निभाव केला. बोरघाट, लोहगड, विसापुर यांतील रयत लुटून नेली. पुण्यावर येऊन बेतली तेव्हां शहर बचावण्यासाठीं पुष्कळांच्या शिफारसी गोपाळरावाकडे गेल्या. अलीकडील दहापांच गांवचीं घरें जाळलीं. पुण्याच्या तोफखान्यांत माणसें जाऊन खणून सांपडेल तें घेऊन गेले. नारो आपाजीकडून भला मोठा दंड तर घेतलाच शिवाय लूट करायची ती केली. पर्वतीच्या मूर्ती फोडल्या. लोहगड, पुरंदर, राजमाची यांवर सेनासमुद्र लोटला. एक महिनापावेतों लूट जाळ जाली." §
" सिंहगडची माची व सरकारी जामदारखाना रघूजी करांड्यानें लुटून नेला.

---

§ ऐ. द. ३८·९५; ख. २२०, २५९, २६१, २६२.

माणसें मारलीं. चार हजारांचा लोट एकदांच आला. पुण्यांत एक देव लहान मोठा राहिला नाहीं. धर्मशाळा जाळल्या. सभोंवत्या फौजा उतरून जाळपोळीस सीमाच ठेविली नाहीं. लोहगडच्या माचीस पुण्याचे लोक वित्तविषय घेऊन गेले होते, त्यांची तीच गत झाली. नाना फडणीस वगैरे एक वस्त्रानिशीं जीव बचावून गडावर गेले. विठ्ठल सुंदरनें तोफखाना घेऊन सासवडच्या रोखें राहून सर्व जाळलें. पुरंदरपासून शिरवळपर्यंत गमाजींनीं लुटून सतऋषीस गेले. गडास मोर्चे दिल्हे. तमाम गावगन्ना एकसाला पैका रोखे करून घेतला. मुलूक जाळला व लुटला. सातारा किल्ला मात्र रक्षिला. सखारामबापूचें हिवरें जाळून विठ्ठलसुंदरनें अग्नि संतुष्ट केला. नीरथडी–भीमथडी मोगलांचे भक्ष्यस्थानीं पडली. "†

एप्रिल मेच्या दोन महिन्यांत पुण्यास हा प्रकार चालू असतां पेशव्यानें भागानगर प्रांताची तीच गत केली. विठ्ठल सुंदरचें औशाचें गांव जाळलें. माधवराव ८ मे रोजीं मातुश्रीस लिहितो, "बेदराहून भागानगर सुभ्यांत आलों. पांचसात लक्ष रुपये मिळाले. आणीकही महिन्यापंधरा रोजांत दहावीस लक्ष मिळतील. रामचंद्र गणेश, बाबुराव हरि डावेउजवे बाजूस खंडण्या घेत गेले. मोगलांचा प्रांत बेचिराख केला." सखारामबापूनें गोपिकाबाईस कळविलें, "मोगलानें तिकडे विध्वंस केला यास्तव यांणींही त्याप्रमाणेंच अंमलांत आणिलें. यंदांच्या सारखा कहर पूर्वी झाला नव्हता. येथें मल्हारबाआदि लहानमोठे एकदील आहेत. एक वेळ मोगलांचे दांत भग्न करावे असा सर्वांचा विचार आहे. आमच्याविषयीं बहुतांनीं आपल्या चित्तांत संशय आणिले होते ऐशास आम्हीं एकनिष्ठेनें सेवा केली. अलीकडे हा प्रकार जाहला. याउपरी जे गोष्टी दौलतेस उचित तेच वर्तणूक करीत आहों." ५ जून रोजीं रघुनाथरावानें बाईस लिहिलें, "भागानगराहून दरकूच कृष्णातीरास आलों. याउपरी निजामअलीवर चालोन गांठ घालितों. पुण्यास उपद्रव केल्याचें ऐकून बहुत क्रोध वाटत आहे. तो उपद्रव करणार नाहीं असें वाटून आम्ही भागानगर जाळलें नाहीं. आतां परमेश्वर स्मरण करून लढाई उत्तम करितों." अखेर निजाम पुणें प्रांतांतून व पेशवे पंचमहालांतून परत आपापल्या मुलखाकडे वळले. मे महिन्यांत

---

† पे. द. ३८·१०२; ख. २७१,

सातान्यावर गदा आली तेव्हां माधवरावानें छत्रपति रामराजाला खालीं शहरांत न ठेवतां किल्ल्यावर ठेवण्याची ताकीद पुरंदऱ्यास केली. ×

पावसाळा सुरु झाला तेव्हां उभय पक्ष आपापल्या छावणीच्या विचारास लागले. गोपाळराव पटवर्धनाचा आशय काढून घेण्यासाठीं माधवरावानें गोविंद शिवरामास त्याजकडे पाठविलें. तसेंच त्यानें सखारामबापूस जानोजीचे भेटीस पाठविलें. या हालचाली त्यांस बोलाचालींत गुंतवून ठेवावें इतक्याच पुरत्या होत्या. त्यांत मनधरणीचा लेश नव्हता. पेशवे आपणास परत घेण्यास कबूल आहेत, झालेला प्रकार विसरून जावा एवढाच हेतु यांत होता. खुद्द दादाही माधवरावापुढें निष्प्रभ बनत चालला. निजामअली बेदराकडे परत जाऊं लागला, त्याची जागजागां मराठे अडवणूक करूं लागले. त्यांनीं तहाची बोली सारखी चालू ठेविली. भीमाकांठानें निजाम औसाधारूरपावेतों गेल्यावर पाठीवर मराठ्यांची मिठी पाहून त्यानें परत फिरून औरंगाबाद गांठण्याचा विचार ठरविला. गोदावरीवर येतो तों तिचा अपरंपार पूर पाहून तो चपापला. मराठ्यांचे तोंडावर तोफखाना ठेवून घाईघाईनें होड्या जमविल्या आणि शहागडावर नदी उतरूं लागला. स्वतःबरोबर जनानखाना, बुणगे व कांहीं थोड्या हलक्या तोफा बचावापुरत्या त्यानें पलीकडे नेल्या; मुख्य फौज, भारी तोफखाना व जड सामान त्यानें विठ्ठलसुंदरच्या हुकमतींत अलीकडच्या कांठावर राक्षसभुवननजीक घोंडराई येथें ठेविलें. हळूहळू पूर उतरतांच हें सर्व पलीकडे नेऊं अशी त्याची अटकळ होती. ही त्याची परिस्थिति मराठ्यांनीं बरोबर ओळखली. आज फार दिवस ज्या संधीसाठीं मराठे टपून बसले होते ती चालून आली असें कल्पक बुद्धीला वाटलें. शत्रूस अडचणींत गांठण्याची ही कल्पना कोणा एका व्यक्तीची कीं समुचित वाटाघाटीची हें कळण्यास मार्ग नाहीं. याच कल्पनेनें मराठी राज्य निर्माण झालें, तिजवरच तें जगलें आणि तिच्या अभावीं तें संपलें. तरुण पेशवा सारखा आपलें डोकें चालवीत होता, एवढेंच आपण म्हणूं शकूं.

गोविंद हरि व गोपिकाबाई माधवरावास आग्रह करीत होते कीं गोपाळराव जवळ आल्याशिवाय निजामाशीं गांठ घालूं नका. संकट निवारण करण्याचें धाडस गोपाळरावांत होतें यांत संशय नाहीं. पण सेवकापुढें धन्यानें एवढा नम्र

× का. सं. प. या. १९८–२००; ख.२९३, २९४, २९७, २९८; ऐ.द. ३८·१०३.

भाव धारण करणें माधवरावाच्या स्वयंप्रकाश बुद्धीस मानवलें नाहीं. गोपाळरावाशिवाय आमचें अडतें हा भाव दाखविणें माधवरावाला नको होतें. गोपाळराव, जानोजी दोघांसही त्यानें सलुखाच्या वाटाघाटींत गुंतवून ठेविलें. शिवाय त्या दोघांचे अंतस्थ कावे किंवा शत्रूकडे फितुरी नसेल कशावरून हाही माधवरावास संशय होता. ते दोघेही आतां फशीं पडल्यासारखे झाले. दोनही पक्षांचा विश्वास त्यांजवरचा उडाला. गोपाळरावच गोपिकाबाईस लिहितो, "आजपावेतों कायावाचामनें आपल्या राज्याचें अकल्याण चिंतिलें नाहीं. आमच्या गुणाचे ग्राहक असते तर मोगलाईंत देखील यावयाचें प्रयोजन नव्हतें. आम्ही सर्वस्वास बुडालों हें चित्तांत न आणतां आमचे ठायींच दोषारोप ठेविले, यामुळें अतोभ्रष्ट, ततोभ्रष्ट. कालमहिमाच तसा त्यास आपला काय इलाज." गोपाळराव मंगळवेढ्यास होता तेथें गोविंद शिवरामानें त्याची भेट घेऊन समजूत घातली.†

माधवरावानें मातुश्रीस कळविलें, "आम्ही मोगलांशीं सख्य तों करीतच नाहीं, गंगेअलीकडे सांपडला तर झुंज होईल. गोपाळरावाशीं गोविंद शिवराममार्फत बोलणें चालू आहे." कलबुर्गा येथें मुक्काम असतां माधवरावानें ता. ३ जुलईस निजामअलीचा भाऊ बसालतजंग यास भेटीस आणून करार ठरवून आपल्या बाजूस आणिलें. सखारामबापू जानोजीकडे शिष्टाईस गेला तेथें नागपुरचा शहाणा देवाजीपंत यानें आपल्या यजमानास कळविलें, "तुम्ही या पेशव्यांचे नादास लागूं नका, गेलां तर रामचंद्र जाधवासारखी स्थिति होईल." जानोजी तीस लक्षांचा मुलूख व अशीरगड किल्ला मागूं लागला. दोघे शहाणे एकत्र मिळाले त्यांचा प्रभाव काय वर्णावा! बाहेर वार्ता उठली कीं बापू विरुद्ध-पक्षाशीं कारस्थानें करीत आहे. दादानें त्याला ताणलें तेव्हां गयावयां करून त्याला अब्रू सांभाळावी लागली. या शहाण्यांना असें कळेना कीं पेशव्यांची मध्यवर्ती सत्ता कोसळून पडली तर नागपुरचें राज्य तरी कसें टिकणार! म्हणून या शहाण्यांचें खोटें नाणें बाजूला गुंतवून पेशव्यानें इकडे आपला डाव साधला. माधवरावाच्या खणखणित नाण्याची परीक्षा झाली. जानोजीचा सरदार पिराजी निंबाळकर निजामाचे पक्षांत होता त्यास माधवरावानें भेटून आपल्याकडे सामील केलें. ऑगस्ट ५ ला तो मातुश्रीस लिहितो, "आम्ही मोगलांच्या शहावर

---

† ख. ३०८, ३२५.

बीडच्या सुमारें आलों. मोगल शहागडावर नांवांवरून गंगा उतरणार. गंगेस पाणी बहुत या संधींत गांठावें असा विचार आहे. महादजी सिंदे उज्जनीहून लिहितात, आज्ञेप्रमाणें येऊन वऱ्हाडचें पुरतें पारिपत्य करतों." § माधवरावाची नजर चहूंकडे कशी फिरत होती हें यावरून उघड होईल.

आषाढ व० ३० तारीख ९ ऑगस्ट रोजीं मराठे माजलगावच्या मुकामास आले, तेथें त्यांस कळलें कीं मोगलाचें मुख्य लष्कर राक्षसभुवनावर आहे. थोडा तोफखाना उतरला. जानोजी भोसले, गमाजी वगैरे निजामास सोडून पूर्वेस दहा बारा कोशांवर अलग राहिले आहेत. महाराव जानोजी निंबाळकर आदलेच दिवशीं मरण पावला. जानोजी भोसले द्विधाचित्त होऊन मोगलाचा निरोप घेऊन गंगेच्या अलीकडील तीरानें बाराचौदा कोस खालीं गेले. प्रवासाच्या श्रमानें पेशव्याची थकलेली फौज विश्रांतीसाठीं माजलगांवावर आली. जवळ दोन कोशांवर मोगलांचा मुख्य संसार त्यांचे तावडींत सांपडला. मंगळवारची रात्र उजाडतांच मोगलांवर अचानक हल्ला करण्याच्या तयारींत गेली. प्रत्येकानें कामाची वांटणी समजून घेतली. दरम्यान गोपाळरावानें गोपिकाबाईस लिहिलें, "अविंधांचे लष्करांतून श्रीमंतांनीं कृपा करून बोलाविलें. नारोशंकरांस आम्हांकडे पाठविलें, त्यावरून आज स्वार होऊन चाललों." पण गोपाळराव येण्यापूर्वींच मोगलाचा संहार झाला. नारोशंकर, सखारामबापू हे देखील त्या संग्रामांत नव्हते.

**६. राक्षसभुवनचा तडाखा**—माधवराव मातुश्रीस लिहितो, "श्रावण शु० १ बुधवार दोन प्रहर दिवस मु० धोंडराई, मोगलाची बातमी राखून सर्व सरदार फुटलेले पाहून आजच प्रातःकाळीं मुकाबला केला. निजाम गंगापार व वरकड कुलसरदार अलीकडे होते. त्यांचें आमचें निकडीचें हत्यार जाहलें. त्याचा मोड जाहला. आमची फत्ते जाहली. विठ्ठलसुंदर याचें डोचकें कापून आणिलें. त्याचे पुतणे विनायकदास व खंदारचा राजा गोपाळदास ठार जाले. मुरादखान वगैरे सोळा सरदार पाडाव सांपडले. चार सहा घटका लढाई मातबर जाली. त्यांची निंमी फौज सातआठ हजार व चारपांच हजार गाडदी इतकी अलीकडे होती ती गारद जाली. निजाम दहशत पावून गंगा उतरूं लागला हें वर्तमान जानोजीनें दादांस कळवून सांगितलें, जलदी येऊन पोचावें. आमचा हल्ला होतांच निजाम पलीकडे कायम होता तो लढाईचें वर्तमान

§ ख. ३२०, ३२५; ऐ. प. १०२.

कळतांच तोफाबाणांची मारगिरी न करितां जनानखाना पुढें पाठवून आपण अर्धरात्रीं डेरे बुणगे टाकून औरंगाबादेस गेला. पंधरा हत्ती व पंचवीस तोफा जनावरें वगैरे लुटून बहुत आणिलीं. पूर्वी लढाया झाल्या पण अशा प्रकारची जरब बसली नव्हती. इस्मायलखान, शहाजी सुपेकर, सदाशिव रामचंद्र वगैरे शत्रुपक्षास मिळालेले वांचून पळून गेले." श्रीमंतांकडील महादाजी नाईक निंबाळकर† व एकदोन सरदार कामास आले. आरंभीं श्रीमंत उभयतां चालून गेले. आघाडीस नीलकंठ महादेव, महिपतराव चिटणीस व महादाजी शितोळे मांजरीकर वगैरे चालून गेले, तों नबाबाचे दारूस व बाणांस आग लागोन बाण उडाले. त्या संधींत नीलकंठ महादेव व विठ्ठल शिवदेव यांजकडील फौजेनें तोंड लाविलें, तों श्रीमंत येऊन पोंचले. नीलकंठ महादेव वगैरे मोर्चे उठवून आंत गेले. मागाहून रघुनाथरावदादांचा हौदा येतां दरम्यान कंबरक्यांत‡ विठ्ठलसुंदर, विनायकदास व इस्मालखान पठाण यांनीं येऊन हौदा माघारा फिरविला. सरकार फौजेचा मोड झाला. तों ईश्वरें कौतुक केलें. त्यांचे लोकांत बार सुटून विठ्ठलसुंदरास गोळी लागली, तितक्यांत मल्हारजी होळकरांनीं सिलक झाडली, त्यामुळें विठ्ठलसुंदरच्या सात अंबाऱ्या फौज सुद्धां उभ्या राहिल्या, तों माधवराव प्रधान घोड्यावर होते, त्यांनीं विठ्ठलसुंदरच्या अंबाऱ्यांवर आपल्या लोकांस तटाच्या झुंजावर पाठविलें. त्या गर्दीत महादाजी सितोळे यांनीं सात अंबाऱ्यांपैकीं विठ्ठलसुंदरची अंबारी मारतों, वांचून आल्यास मांजरीगांव व सरदारी द्यावी. श्रीमंतांनीं कबूल केलें. महादाजी शितोळे अंबारी मारून परत आले. होळकराकडील गिलच्यांनीं विठ्ठलसुंदरचें डोचकें कापून आणिलें. त्याच विठ्ठलसुंदरच्या अंबारींत बसून पेशवे धोंडराईस मुकामावर गेले. सदाशिव रामचंद्र जखमी होऊन एका घोड्यानिशीं गंगेंत उडी टाकून पार गेला. मुरादखान पाडाव आला त्याचे मार्फत अविंधाचें सूत्र लागलें आहे. आतां गंगा उतरून पार जाऊन शहरास शह द्यावा ऐसा विचार होत आहे."*

---

† याचा पुत्र रामराजाचा जावई, भा. व. श. पृ० ४७, रा० खं. ६·४१८.

‡ कटिभाग, सेनामध्य.

* ख. ३३३–३३५; मा. रो. १·३४३; ऐ. टि. ३·२९; पे. द. ३८·१०५–१०६ ऐ. प. १०५; रा. खं. १०·२१; पु. द. ३·२६ व पृ. ११९; बडोदें वेंचे १·९७.

" मोगल पलीकडे होता, त्याचें पत्र आलें कीं मी कांहीं तुमचें केलें नाहीं. विठ्ठलसुंदरांनीं तुम्हांसीं दावा बांधिला होता, त्याचा सूड तुम्हीं घेतला. तुमची लूट आणली आहे ती पाठवून देतों. भाऊसाहेबांचा करार आहे त्याप्रमाणें चालावें. " " विठ्ठलसुंदराचें व विनायकदासाचें शीर पेशव्यानें पालखींत घालून निजामअलीकडे पाठविलें. तीन अंबाऱ्या हत्ती सुद्धां व आणखी खासे गंगेमध्यें बुडाले. तात्या, सखारामबापू व पिराजी नाईक जानोजीस आणावयास गेले आहेत. मोगल शिकस्त केला, येणेंकरून दक्षिण प्रांतीं व हिंदुस्थानांत शत्रूंवर जरब बसली. " बाबुराव हरि, सखाराम हरि व महिपतराव चिटणीस यांनीं शिपाईगिरी बहुत केली. मुख्य लढाई हुजरातीनें केली. पूर्वींचे भेदभाव विसरून सर्वांनीं एकजुटीनें जो पराक्रम यावेळीं केला, त्यास खुद्द दादानेंच पुढें विघ्न आणलें नसतें तर मराठी राज्य माधवरावाच्या तडफेनें चहूंकडे सावरलें असतें. लढाई होत असतां एकदम आभाळ भरून पर्जन्य आला. फौजेंत अंधार झाला. दोन प्रहर होण्यापूर्वींच संग्राम आटपला. ‡

" गंगेनें नबाबाची मोठी कुमक केली " असें एक सूचक वाक्य माधवरावाचे पत्रांत आहे. म्हणजे नदीस पूर नसता तर लगेच पलीकडे जाऊन मराठ्यांनीं खुद्द निजामअलीचा संहार उडविला असता. लष्करचे लोक घरीं जाण्यास निकड लावीत होते. घरेंदारें जळालीं म्हणून ते मुलांबाळांच्या चिंतेंत होते. बरेचसे निघूनही गेले. नावा सर्व जमा करून निजामानें अगोदरच फोडून टाकल्यामुळें लगोलग पलीकडे जाणें मराठ्यांस अशक्य झालें. कित्येक पैठणचे समोर येऊन उतरूं लागले. दहाबारा दिवसांनीं होळकर वगैरे कित्येक हत्तींवरून पलीकडे गेले. नंतर दोन दिवसांनीं सर्व फौज उतरली. या पूर्वींच मुरादखान तहाचें बोलणें करीत होता. पेशव्यानें मागणी घातली, गोदावरीच्या उत्तरेचा सर्व औरंगाबाद प्रांत व अलीकडचा औसा, धारूरखंदारपर्यंतचा मुलूख आम्हांस द्या. म्हणजे फक्त भागानगर प्रांत तेवढा त्याचा राहिला. अशा वाटाघाटींत कालहरण करून निजामानें आपल्या फौजेची सावरासावर केली. दरम्यान

‡ गोदावरीच्या दक्षिण तीरावर गेवराई, धोंडराई, तांदुळजा व राक्षसभुवन हीं स्थळें जवळजवळ असून धोंडराईस संग्राम घडला. हे गांव निजामशाहींत बीडच्या उत्तरेस सिंधफणा नदी उतरल्यावर लागतात. पूर्वेस माजलगांव आहे. धोंडराई गोदावरीच्या कांठीं असून समोर पलीकडच्या कांठावर शहागड आहे. शहागडच्या पश्चिमेस बारा कोस पैठण व उत्तरेस ४० मैल औरंगाबाद.

सखारामबापूनें जानोजी भोसल्यास ता. १३ ऑगस्ट रोजीं म्हणजे संग्रामानंतर तीन दिवसांनीं पेशव्याचे भेटीस आणिलें. पेशव्यानें तीस लक्ष मुलूख व अशीरगड किल्ला ही त्याची मागणी पुरी करून त्यास संतोषानें रजा दिली. गोपाळराव पटवर्धनही २० ऑगस्टला पेशव्यास येऊन मिळाला. ‡

अशा रीतीनें ऑगस्ट महिना पैठणावर संपला. तेथून पेशव्यांनीं औरंगाबादवर चाल केली. ता० ३ सेप्टेंबर रोजीं निकराचा संग्राम होऊन निजामाचे पांच हजार लोक जायां झाले आणि विठ्ठल शिवदेवाची दोन हजार फौज मारली गेली. निजामअली जीव बचावून शहरांत गेला. तेथून त्यानें मुरादखानाकडे आपलीं माणसें तहाचे वाटाघाटीस पाठविलीं. "दादा पुनः सूत्रधार बनले. सखारामबापू, गंगोबा तात्या व कृष्णराव काळे यांनीं बोलणीं करून तह ठरविला. प्रसंगावर नजर देऊन मान्यता देणें पेशव्यास प्राप्त झालें. उदगीरच्या तहांतला साठ लाख व नवीन बावीस लक्ष असा एकंदर ब्यायशीं लक्षांवर २५ सेप्टेंबरला तह कायम झाला." उभयतांनीं युद्धप्रसंगीं एकमेकांचें साह्य करावें असा करार ठरला त्याचा उपयोग पुढें प्रसंगानुसार उभयतांनीं केला. ब्यायशीं लक्षांपैकीं गोदावरीपासून औरंगाबादपर्यंतचे महाल पेशव्यांनीं आपल्याकडे ठेविले. बाकीचे होळकर, भोसले, विठ्ठल शिवदेव, नारोशंकर इत्यादींना मिळाले. या वांटणीनें पेशव्याचा प्रदेश नगरपासून जवळजवळ नागपुरपर्यंत सलंग बनला. औरंगाबादचा हा तह ठरत असतांच निजामअलीनें ता. १९ सेप्टेंबरला सलाबतजंगास ठार मारून निरंकुश सत्ता बळकावली. त्याचा भाऊ मीरमोगल जीव बचावून पळून गेला. * पेशवे निजामाचें सख्य घडविण्यांत शेरजंग प्रमुख होता.

महंमद मुरादखान हा निजामाचा हस्तक औरंगाबादचे कारभारावर असे. तह झाल्यावर तो परत निजामाचे नोकरींत गेला. त्याचें धोरण मराठ्यांशीं सख्य ठेवण्याचें असून तो दादाचे तंत्रानें वागे. उत्तरोत्तर त्याचें निजामअलीशीं बिनसलें. सलाबतजंगाकडे फितुर केल्याच्या आरोपावरून निजामअलीनें स. १७६४ च्या ऑगस्टांत मुरादखानास अटकेंत ठेविलें आणि पुढील जून महिन्यांत ठार मारिलें. †

---

‡ ख. ३४६. * ख. ३६५, ३६६, ३७२, ३७३; पे. द. ३८·१०८–१११.

† ख. ५७५; रा० खं. १३· ८५ व १४· ४.

राक्षसभुवनचा संग्राम १० ऑगस्टला होऊन वरील तह २५ सेप्टेंबरला कायम झाला. त्यानंतर दसऱ्यापर्यंत म्हणजे १६ ऑक्टोबरपावेतों माधवरावानें स्वतः औरंगाबाद प्रांतांत राहून तहाची व सरदारांची व्यवस्था लावली. दोन वर्षांतील अव्यवस्थेचें निराकरण त्यानें स्वतःच्या जबाबदारीवर धडाक्यानें केलें. परत फिरून दसऱ्यास तो गोदावरीवर आला. भवानराव प्रतिनिधि व त्याचा मुतालिक गमाजी भोसल्याबरोबरच पेशव्याकडे परत आले होते, त्यांस दसऱ्याचे मुहूर्तावर पूर्वपदावर स्थापून वस्त्रें व सरंजाम देऊन कामास लाविलें. प्रतिनिधीचा दर्जा पेशव्याहून श्रेष्ठ म्हणून भवानराव पेशव्याच्या चाकरीस येण्याचें मान्य करीना. त्यावरून राज्य सर्वांचें, सर्वांनीं त्याचे संरक्षणाचा भार स्वीकारला पाहिजे अशी वाटाघाट होऊन पेशव्यानें चाकरीचे बदल्यांत प्रतिनिधीचा पाऊणलाख उत्पन्नाचा प्रदेश फौजेच्या खर्चासाठीं म्हणून तोडून आपल्या ताब्यांत घेतला. पेशव्याला फौज मिळाली, भवानरावाला दर्जा मिळाला. गमाजीला मात्र हा प्रकार मानवला नाहीं. त्यानें बंडावा चालविला तोही पेशव्यानें मोडला.

पानपतावर सिंद्यांची सर्वांत मोठी वाताहत झाली. एक महादजी कायमचा लंगडा होऊन जिवंत राहिला, त्याची नेमणूक दौलतीवर अद्याप झाली नव्हती. पेशव्याच्या गृहकलहांत सिंद्यांचें प्रकरण लांबणीवर पडलें. महादजीला माधवरावानें बोलावल्यावरून तो आतां येऊन दक्षिणेंत दाखल झाला. त्याजबरोबर सुसज्ज फौज व अंतःकरणांत पेशव्याबद्दल निष्ठा असल्यामुळें उभयतांचें सौरस्य जमून आलें. "तुमच्या सरदारीची घालमेल होणार नाहीं, त्याबद्दल तुम्ही काळजी बाळगूं नये," असें माधवरावानें गोदावरीवर महादजीस समक्ष भेटून आश्वासन दिलें आणि त्याचा संतोष केला.

भानूंची फडणिसी दादानें चिंतो विठ्ठलास दिल्यामुळें भानु नाखूष झाले. हा अन्याय दूर करण्यासाठीं माधवरावानें नानास पत्र लिहून भेटीस बोलाविलें आणि दसऱ्याचे मुहूर्तावर त्याची पिढीजाद फडणिसी त्याचे हवालीं केली. या सर्व कारभाराच्या बाबती वेळेवर उरकून आपली छाप बसविण्यांत पेशवा गुरुजीच्या सल्ल्यानें वागत होता. त्याचें प्रत्यंतर सातारा २ ले. ३०६ यांत पहावें.

"नाना व मोरोबा पेशव्याचे भेटीस गोदावरीवर आले. दसऱ्याचे मुहुर्तावर फडणिसीचें काम त्यांस देऊन खासें कलमदान, कीर्दीचा रुमाल स्वाधीन केला आणि वस्त्रें दिलीं. यासंबंधानें सखारामबापूनें कित्येक मुद्दे घातले, त्यावर

माधवरावानें त्यास साफ कळविलें, "तुम्ही नवीन दिक्कती काढतां हा प्रकार कामाचा नाहीं." यावेळेपासून पेशव्यानें मोरोबास स्वतःजवळ कामास घेऊन नानास पुण्याचे कारभारावर ठेविलें. दोघेही जवळजवळ समवयस्क होते. स. १७६३ च्या दसऱ्यापासून पुढें कैक वर्षे पुण्याची सर्व व्यवस्था नाना फडणीस व त्याचा जोडीदार नारोआपाजी तुळशीबागवाले यांनीं सांभाळून त्या नगराची भरभराट केली. § स. १७६३ चा ऑक्टोबरचा **विजयादशमीचा प्रसंग** माधवरावाच्या करामतीचा पहिला विजय होय.

युद्ध, राजकारण, बंडावे, गृहकलह अशा नानाविध बाबतींत पानिपतपासूनच्या दोन वर्षांत व मुख्यतः घोडनदीच्या प्रसंगापासून राक्षसभुवनपर्यंत या अल्पवयी पेशव्याला कसे विलक्षण अनुभव मिळत गेले हें आपणांस कळून माधवरावाच्या कर्तबगारीची धन्यता वाटते. त्यानें शत्रुमित्रांवर आपली छाप बसविली. केवळ नम्र भावानें चुलत्यास निष्प्रभ केलें. नानाविध व्यक्तींचे स्वभावभेद व मतलब ओळखून सर्वांस राज्याचे कामीं लाविलें. कोणाची भीडभाड न ठेवतां मनास पटेल तें तो निर्भीडपणें तात्काळ अमलांत आणूं लागला. राक्षसभुवनचा संग्राम सकाळच्या प्रहरीं आटोपतांच दोन प्रहरीं स्वहस्तानें ती युद्धवार्ता मातुश्रीस लिहून कळविली. या वर्षांतलीं त्याचीं मातुश्रीस व इतरांस लिहिलेलीं पत्रें वाचावीं म्हणजे सतरा वर्षांचा हा मुलगा इतकें लेखन कारकुनाच्या मदतीशिवाय केव्हां कसें करूं शकला याचें आश्चर्य वाटतें. तहाच्या वाटाघाटींत त्यानें निजामास नरम आणिलें. अंतःकरणांतील तळमळ, त्वरित निर्णय, दरारा हे त्याचे गुण प्रथमपासूनच स्पष्ट दिसतात. राक्षसभुवनावर शत्रूस बुडविण्याची युक्ति व तयारी त्यानें घडवून आणली तें एक अद्भुत कृत्यच होय. माधवरावाचा हा पराक्रम मुख्यतः त्याच्या चुलत्यालाच स्पष्ट दिसला. त्याला धाकांत ठेवून आपण कारभार चालवूं ही चुलत्याची आकांक्षा नष्ट पावली. लहानमोठे प्रमुख सर्व या मुलाला अनुकूल झालेले पाहून आतां पुण्यांत आपल्याला स्वतंत्र आसन नाहीं अशी खात्री पटून, दादा इतउत्तर निवृत्तीच्या गोष्टी बोलूं लागला. त्यानें भावजईस लिहिलें, "चिरंजीव रायांनीं यंदां मेहनतींत व शिपाइगिरींत कमी केली नाहीं. आम्हांपेक्षां अधिक झाले. इतके दिवस त्यांनीं लढाई देखली नव्हती. ही पहिली लढाई तींत सर्व प्रकारें तर्तूद अधिक केली. यांचा कर्तेपणाचा

§ ख. ३७० – ३७१.

भरंवसा आम्हास आला. सांप्रत कारभार तेंच करितात. आमचे मर्जीप्रमाणें वर्ततात. तिलमात्र वांकडे चालत नाहींत. आम्हीही यथाज्ञानें सुचतें तें त्यांस सांगतों. माझें शरीर बहुत अशक्त झालें, मेहनतीस कामाचें नाहीं. आतां कोठें तीर्थी बसून कांहीं ईश्वरभजन करावें इतकेंच मानस आहे. " †

यजमानाप्रमाणेंच सखारामबापूही माधवरावाचें तेज पाहून निराश व उद्विग्न बनला. खर्च कमी करण्याकरितां त्यानें हुजरात कमी करण्याची सूचना पेशव्यास केली, ती माधवरावानें धुडकावून लावली, त्यावरून आपण कारभार टाकतों अशी धमकी बापूनें घातली. पण न डगमगतां माधवरावानें त्यास जवळ ठेवून कारणापुरती त्याची सल्ला तो घेऊं लागला. चुलत्यास किंवा बापूस त्यानें व्यवहारांत बिलकूल दुखविलें नाहीं. ता. २६ ऑक्टोबरला गोदावरीवर चुलत्याची रजा घेऊन पेशवा २ नोव्हेंबरला पुण्यास पोंचला. दादा तेथून परभारें नाशकास गेला. त्याजबरोबर पेशव्यानें आपले दोन हस्तक त्रिंबकराव पेंटे व गोविंद शिवराम देखरेखीसाठीं पाठविले.



† ख, २४७, २६६, २७६.

## २. कालसूची – हैदरनायकाशीं संग्राम

| | | | |
|---|---|---|---|
| सन १७२२ | | | हैदरअलीचा जन्म. |
| सन १७५१–६१ | | | हैदरनायकाचा कर्नाटकावर विजय. |
| सन १७६१ | जानेवारी | १४ | पानिपतची तिसरी लढाई. |
| सन १७६२ | मार्च | | पेशव्याची कर्नाटकावर पहिली स्वारी. |
| ,, | ऑगस्ट | | हैदरचा मुराररावावर विजय. |
| सन १७६४ | जानेवारी | | पेशव्याची कर्नाटकावर दुसरी स्वारी, |
| ,, | | | कोल्हापुरास पेशव्याचें आगमन. |
| ,, | एप्रिल | | पेशवा सावनुरास दाखल. |
| ,, | मे ३ | | रट्टेहळ्ळीची लढाई. |
| ,, | मे ९ | | पेशवा – मुरारराव भेट. |
| ,, | सेप्टेंबर | | पेशव्याचा धारवाडास वेढा. |
| ,, | ,, | २० | मुराररावास सेनापतिपद दिलें. |
| ,, | नोव्हेंबर | ६ | धारवाड काबीज. |
| ,, | डिसेंबर | १ | अनवडीची लाढाई. |
| सन १७६५ | जानेवारी | २७ | दादा–माधवराव भेट. |
| ,, ,, | मार्च | ३० | हैदरशीं अनंतपूरचा तह. |
| सन १७६६ | नोव्हेंबर | १२ | इंग्रज-निजामांचा दोस्तीचा तह. |
| ,, १७६७ | अखेर | | पेशव्याची कर्नाटकावर तिसरी स्वारी. |
| ,, | जानेवारी | | पेशव्यानें गोठगणति घेतली. |
| ,, | मार्च | ४ | मदगिरी काबीज. |
| ,, | मे | ७ | हैदरशीं पेशव्याचा तह. |
| ,, | ऑगस्ट ते | ४ | एप्रिल १७६९, इंग्रज-हैदर पहिलें युद्ध. |
| सन १७६९ | पावसाळा | | हैदरची सावनूर-गुत्तीवर चढाई. |
| सन १७७० | जानेवारी | | पेशव्याचा म्हैसूर प्रांतांत शिरकाव. |
| ,, | एप्रिल | २९ | निजगलवर नारायणरावास जखम. |
| ,, | मे | २५ | पेशव्याची सुवर्णतुला निवृत्तिसंगमावर. |
| ,, | जून | | त्रिंबकराव पेठ्याकडून चिकबाळापूर काबीज. |
| ,, | ऑगस्ट | | गुर्रमकोंड्यास वेढा. |

| | | | |
|---|---|---|---|
| सन १७७० | ऑक्टोबर | १९ | गुर्रमकोंडा काबीज. |
| सन १७७१ | जानेवारी | १७ | गोपाळराव पटवर्धनाचा मृत्यु. |
| ,, | मार्च | ७ | मोतीतलावची लढाई. |
| ,, | मार्च | १० | श्रीरंगपटणास त्रिंबकराव पेठे दाखल. |
| ,, | मार्च | १७ | श्रीरंगपटणास वेढा चालू. |
| सन १७७२ | जून | २१ | हैदरशीं किकेरीस तह. |
| ,, | सेप्टेंबर | १० | त्रिंबकराव–माधवराव थेऊरास भेट. |

— २ —

# हैदरनायकाशीं संग्राम

१. अनुसंधान. २. हैदरनायकावर पहिली चढाई. ३. पेशव्याची दुसरी स्वारी. ४. हैदरअलीचा इंग्रजांस शह. ५. हैदरनायकावर तिसरी स्वारी. ६. पेशव्याची चौथी स्वारी. ७. गुर्रमकोंड्यावर चढाई. ८. गोपाळराव पटवर्धनाचा मृत्यु. ९. परस्परांचे डावपेच. १०. मोती तलावची लढाई. ११. हैदरची सर्वत्र दाणादाण. १२. निराशेचा तह, इत्यर्थ.

**१. अनुसंधान**— ता. १९ जुलई १७६१ पासून ता. १८ नोव्हेंबर १७७२ पावेतों अकरा वर्षे चार महिने माधवरावानें पेशवाईचा कारभार केला. पैकीं राक्षसभुवनपर्यंतचीं पहिलीं दोन वर्षे त्याचें आसन स्थिर होण्यांत गेलीं. तसेंच शेवटचें वर्ष आजाराच्या विवंचनेंत खर्च झालें, त्या काळांत त्याची हुकमत कायम असली तरी लक्ष भावी परिणामाकडे गुंतलें. मिळून त्याच्या मुख्य पराक्रमाला केवळ आठ वर्षें राहतात. ह्या आठ वर्षांतील कारभारांत कनाटकांतील हैदरनायकाचें युद्ध व उत्तरेंतील व्यवहारांत बादशाहाची दिल्लीस स्थापना हे दोन टळक प्रकार प्रथम लक्षांत येतात. ह्यांच्या अनुषंगानें दुसरे आणखी विषय उद्भवले ते म्हणजे अव्वलपासून अखेरपर्यंत सारखा चालू राहिलेला चुलत्याशीं झगडा आणि त्यांतूनच निघालेलें भोसल्यांचें युद्ध हेही स्वतंत्र विभागानें मांडण्यासारखे आहेत. खरें म्हटलें म्हणजे आज इतिहासकारानें


कर्नाटक
कृष्णा न.
देवदुर्ग
घटप्रभा न.
मणोली
कर्नूल
किचूर
धारवाड
हुबळी
शिरहट्टी
लक्ष्मेश्वर
सावनूर
तुंगभद्रा न.
अनगुंदी
अडोनी
बेल्लारी
गुत्ती
हरपनहळ्ळी
रायदुर्ग
अनंतापुर
कडाप्पा
हरिहर
चितळदुर्ग
पेन्नुकोंडा
बिडनूर
चन्नगिरी
नाडक्षिरा
तारिकेरी
शिरा
मदगिरी
बागेपल्ली
गुरुमकोंडा
बुधिहाळ
कडूर
बाणावर
चन्नरायदुर्ग
चिक्कबाळापूर
देवरायदुर्ग
तुमकुर
तुरुवकेर
हेब्बर
बेलूर
होसकोट
कोलार
मुळबागल
मंगलोर
नागमंगल
मगडी
बंगलोर
चन्नरायपट्टण
मेलकोट
तोन्नूर
चिंकुरली
अनेकल
श्रीरंगपट्टण
कावेरी न.
म्हैसूर

आपल्या इतिहासाची मांडणी सुस्पष्ट प्रकरणवार दर्शवावी हें कांहीं त्या पेशव्यानें लक्षांत घेतलें नव्हतें. त्यानें जें काय साधलें किंवा विघडविलें तेवढ्याचाच व्याप आपण आज दृष्टिसमोर घेणें युक्त आहे. गोपिकाबाईची चिंता माधवरावाचा जम बसवून देण्याची असून पटवर्धन, रास्ते इत्यादि दक्षिणेकडील सरदारांचा ओढा उत्तरेच्या कारभारांत नव्हता. उत्तरेकडील कारभार सुधारण्याची थोडी बहुत उत्कंठा फक्त दादाची होती. पानिपतच्या संहारामुळें तें जोखीम अंगावर घेण्यास पुष्कळांचीं मनें कचरत होतीं. सिंदे, होळकर, नागपुरकर भोसले, सागरकर बुंदेले खेर हे डोईजड सरदार उत्तरेकडे वावरणारे असून त्यांजवर शह बसविणें बरेंच अवघड काम होतें. ह्या परिस्थितीचा खल केल्यावर तूर्त दक्षिणचा जम बसवून लगेच उत्तरेचें काम हातीं घ्यावें असा विचार पेशव्यानें ठरविला. हैदरअलीस नियंत्रण घालणें वाटलें तितकें लवकर सिद्धीस गेलें नाहीं आणि दादाच्या बंडाव्यामुळें पेशव्याला उत्तरेकडे लक्ष देण्याची सवड पांच वर्षें पावेतों आली नाहीं हा प्रकार पुढचा आहे. व्यवहारांत आपण पुष्कळ योजना मनांत बांधून काम सुरू करतों, त्यांत कांहीं अंश पदरांत पडतो, कांहींत फसगत होते आणि कित्येकदां करायला जावें एक आणि घडून येतें भलतेंच. असा कांहींसा प्रकार माधवरावाच्या कारभाराचा लक्षांत येतो. चुलत्यासारखा जळजळीत निखारा अस्तनींत बाळगून त्याला आपले व्यवहार उलगडावे लागत होते. खुद्द त्याचा पत्रसंभार भरभक्कम उपलब्ध आहे त्यांत हे प्रकार स्पष्ट दिसतात. पानिपतचें अपयश धुऊन काढणें हा पहिला कार्यभाग त्याच्या पुढें ठळक होता, तथापि दक्षिणेंत हैदरअली एकदम प्रगट झाला, कोणत्याही कामाला पैसा पाहिजे, पैशाची जवळची पैदास कर्नाटकांतून व्हावयाची, त्या पैदासीचे हस्तक पटवर्धन, रास्ते वगैरे जिव्हाळ्याचे घरचे सरदार; उत्तरेंतील कारभारही निकडीचा खरा, पण दूरचा पल्ला, शत्रू फार, हस्तक विस्कळित अशा स्थितींत प्रथम वर्ष सहा महिन्यांत दक्षिणचा कार्यभाग उरकावा म्हणून तो पेशव्यानें हातीं घेतला. शिवाय उत्तरेचा अनुभव मिळविलेला त्याचा चुलता तें काम हातीं घेण्यास उत्सुक होता, तेंही संधि येतांच त्यानें त्याच्या आधीन केलें. पण दादाच्या स्वभावानुसार त्यानें तो कारभार बिघडविला हें नजरेस आल्यावर आणि मोठा कालापव्यय होऊन गेल्यावरच उत्तरेंतील कामांत पेशव्यास लक्ष घालतां आलें. मात्र ह्या सर्व घडामोडींचा एकमेकींशीं संबंधही

वारंवार येई, त्याचेंही वाचकांनीं अवधान ठेविलें पाहिजे. नुकताच उदय पावलेला हैदरअली सहज उखडून काढतां येईल अशी प्रथम समजूत होती ती मात्र खरी ठरली नाहीं. हैदराशीं युद्ध करण्याची कायमची ब्याद पेशव्याला अखेरपर्यंत संभाळावी लागली. प्रथम माधवरावानें सन १७६२ मध्यें हैदरवर पहिली स्वारी केली, परंतु चुलत्याच्या घालमेलीमुळें ती स्वारी तशीच टाकून त्याला परतावें लागलें. सन १७६४ च्या आरंभीं गोपाळराव पटवर्धन वगैरेंना बरोबर घेऊन माधवरावानें कर्नाटकांत पुनः प्रयाण केलें. त्या वेळीं दादा निवृत्तीचा आव आणून नाशकास जाऊन बसला. परंतु पेशव्यास कर्नाटकांत जय मिळून त्याचें पारडें जड होतेंसें पाहतांच, पुतण्याच्या निमंत्रणावरून तो कर्नाटकच्या युद्धांत सामील झाला व त्यानें हैदरला अनुकूल असा तह घडवून आणिला. १७६७ मध्यें पेशव्यानें कर्नाटकवर तिसरी स्वारी केली, परंतु तींतही हैदरचा कायमचा निकाल लागला नाहीं. तेव्हां सन १७६९ मध्यें त्यानें चौथ्यांदां कर्नाटकांत पदार्पण करून हैदरचा कायमचा मोड करण्याची शिकस्त केली; परंतु त्याच्या प्रकृतीनें दगा दिल्यानें तो परत फिरला व उरलेलें काम त्रिंबकराव पेठ्यानें १७७० पासून १७७२ पर्यंत दोन वर्षें केलें. हा एवढा कार्यभाग आतां आपल्याला पाहावयाचा आहे.

**२. हैदरनाइकावर पहिली चढाई**—हैदरअलीचा उदय ही एक अकल्पित घटना अनेक कारणांच्या मिलाफानें घडून आली. सन १७२२ मध्यें कर्नाटकांत वाढलेल्या एका गरीब घराण्यांत हैदरचा जन्म झाला. आपल्या अंगच्या अक्कल हुशारीनें तो प्याद्याचा फर्जी बनला. एकाद्या धूमकेतूप्रमाणें म्हैसूरच्या राज्याच्या क्षितिजावर चमकणाऱ्या ह्या बहाद्दरानें अल्प काळांतच म्हैसूरमध्यें आपला वचक इतका बसविला कीं त्याच्या इच्छेविरुद्ध तेथील पानही हलेनासें झालें. त्याच्यासंबंधीं विस्तृत वर्णन खऱ्यांनीं केलें आहे. हैदरअली शूर होता, पराक्रमी होता, महत्त्वाकांक्षी होता, उत्तम सेनानायक होता, कर्तबगार मुत्सद्दी होता, दूरदर्शी होता; परंतु आपलें ध्येय गांठण्यास कोणत्याही मार्गाचा अवलंब करण्यास तो कधींही कचरत नसे. कपटविद्या व कावेबाजपणा ह्यांत तो तरबेज असून कृतघ्नपणांतही निष्णात होता. मराठ्यांचा 'गनिमी कावा' त्यानें आत्मसात केला होता. १७६१ च्या पानिपतच्या युद्धांत मराठ्यांचा पराभव झाल्यानें ते निःसत्त्व व बलहीन झाले आहेत या संधीचा फायदा घेऊन हैदरनें म्हैसुरांत आपलें आसन भक्कम केलें. त्याच सालच्या

जूनमध्यें पेशवा नानासाहेब मरण पावल्यावर हैदरनें म्हैसूरचा राजा चिक्क कृष्णराज व त्याचे प्रधान नंजराज व खंडेराव ह्यांस कैद करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली आणि शिरें, होसकोटें, बाळापूर वगैरे मराठ्यांच्या कबजांत असलेले प्रांत हस्तगत केले. त्यामुळें कर्नाटकांत त्याचा चांगलाच वचक बसला. निजामाचा भाऊ अदवानीचा कारभारी होता, तो हैदरचें साह्य करी. गुत्तीचा मराठा सरदार मुराराव घोरपडे मोठा मातबर समजला जाई, पण त्यालाही पराभूत करून हैदरनें नरम आणलें. कडपें, कर्नूल, अर्काट, सावनूर येथील नबाबांकडून व सोंधें, चित्रदुर्ग, रायदुर्ग वगैरे हिंदु संस्थानिकांपासून त्यानें कोट्यवधि खंडणी घेतली.

हैदरअलीच्या चढाईच्या बातम्या माधवराव पेशव्यास कळत नव्हत्या असें नाहीं; निजामाशीं लढण्यांत तो गुंतला असल्यानें हैदराच्या प्रतिकाराची सवडच पेशव्याला लाभली नाहीं. माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळतांच निजाम पुण्यावर चालून आला. ती लढाई संपल्यावर पेशवा सन १७६२ मध्यें आपल्या चुलत्यासह कर्नाटकावर चालून गेला. मार्चांत तो लिहितो. “ कित्तुरचें ठाणें जेर होऊन देसाई भेटीस आला. खंडणीचा निर्गम होतांच सोंधें-बिदनूरच्या सरदेस जात असों. तिकडचा कार्यक्रम उरकून हरपनहल्ली चित्रदुर्गकडे जाऊं.” ह्यावरून हैदरानें बळकावलेले प्रांत परत घेण्याचा उद्योग पेशव्यानें सुरू केला हें उघड होय. मुराराव घोरपड्यासही पेशव्यानें हैदरवर चालून जाण्याची सूचना केली, तदनुसार मार्च २० रोजीं त्यानें हैदरवर चढाई केली व बाळापूरच्या लढाईत हैदराचा त्यानें पराभव केला. “ सरकारची फौज आल्यावर हैदरखान पळोन बंगलुरास जात आहे. हैदरखानाचें पारिपत्य उत्तम प्रकारें होऊन येईल,” अशी उमेद होती. सन १७६२ च्या ह्या स्वारींत पेशव्या-बरोबर त्रिंबकराव पेठे होता. त्यानें धारवाडपासून तुंगभद्रेपर्यंत खंडण्या वसूल केल्या. त्रिंबकराव पेठे कर्नाटकांत आला त्याच सुमारास पेशव्याबरोबर आलेला चुलता रघुनाथराव कर्नाटकांतून पुण्यास चालता झाला. तो तेथें निष्कारण घालमेली करील अशी पेशव्यास धास्ती पडली. शिवाय पावसाळाही येऊन ठेपल्यामुळें त्याला परत फिरणें भाग पडलें. स. १७६२ च्या १३ जूनला तो पुण्यास पोचला. मात्र पुनः कर्नाटकांत जाऊन हैदराचा पूर्ण पराभव करायचा त्याचा निश्चय होता. *

* पे. द. ३७. ५–९; ख. ६७.

पेशवा कर्नाटकांतून परत फिरतांच हैदरानें मुरारराव घोरपड्यावर चाल केली. सन १७६२ च्या पावसाळ्यांत घोरपड्याचा पराभव करून गुत्तीशिवाय बाकीचा त्याचा सर्व प्रदेश हैदरानें काबीज केला; आणि खंडेराव घोरपडे वगैरे कित्येकांस पकडून कैदेंत टाकलें. त्याच वेळीं पुण्यांत चुलतेपुतण्यांचा कलह लागला होता, त्याची भरपूर माहिती हैदरास, त्याच्या हस्तकांतर्फे कळत होती. त्यामुळें त्याला हवी असलेली संधि मिळाली. म्हैसूरच्या पश्चिम घाटांत बिदनूरचें संस्थान स्वतंत्र होतें त्याजवर सन १७६३ च्या आरंभीं हैदरानें स्वारी केली आणि तें सर्व राज्य हस्तगत केलें. शहराचें नांव बदलून त्यास हैदरनगर हें नवीन नांव त्यानें दिलें. तदुत्तर तेथें राहूनच तो आपला कारभार चालवूं लागला. तेथें टांकसाळ घालून त्यानें आपल्या नांवानें होन पाडण्यास सुरुवात केली. बिदनूरच्या राज्यांत पश्चिम किनाऱ्यावर होनावर बंदर आहे तेथें हैदरानें गोदी बांधून आपलें लढाऊ आरमार बनविलें. एका वर्षाचे आंत त्याची सत्ता प्रबळ बनली. त्या संधीस निजाम-पेशव्याचें युद्ध चालू होतें त्यांत हैदरानें निजामाशीं, परस्पर मदतीचा तह ठरविला. बिदनूरजवळच सोंधें संस्थान मराठ्यांचें मांडलिक होतें तें त्यानें स्वारी करून आपल्या राज्यास जोडिलें. शिऱ्याच्या नवाबाचा जांवई मीर फैजुल्ला म्हणून हुशार व पराक्रमी लढवय्या होता, त्यास आपल्या नोकरींत घेऊन त्यानें पेशव्याचे मुलुखावर जोरानें चाल केली. सावनूरचा नबाब पेशव्यांचा मांडलिक होता, तोही त्याचे तावडींत सांपडला. मीर फैजुल्लास सावनूरवर पाठवून मागून सन १७६३ च्या पावसाळ्यांत खुद्द हैदर त्याचे साह्यास धावून आला. ऑगस्टांत त्यानें सावनूर काबीज करून लगेच हुबळी, मिश्रीकोट वगैरे ठाणीं घेतलीं. नंतर मीर फैजुल्ला धारवाडवर चालून गेला, तेथें मेघश्यामराव पटवर्धन बंदोबस्तास होता, त्याचा पाडाव झाला. मीर फैजुल्लानें धारवाड हस्तगत करून मेघश्यामरावास कैदी म्हणून हैदरकडे रवाना केलें. "दोन महिने धारवाड झुंजलें. कुमक न झाली, येणेंकरून हैदरचा शह कृष्णेस पोंचला."* घाटाखालील कारवार जिल्हाही त्याचे हातीं पडून गोवेकर, सावंतवाडीकर व विजयदुर्गचे धुळप ह्यांस जबरदस्त धास्ती उत्पन्न झाली. सालाचें निदान पन्नास लाख उत्पन्न येईल एवढा पेशव्यांचा प्रदेश हैदराकडे जाऊन त्याच्या राज्याची सरहद्द जवळ-जवळ कृष्णेस येऊन भिडली. एवढा हा राज्यघात पेशव्याच्या गृहकलहामुळें निर्माण झाला.

* खरे पृ० ७०२.

**३. पेशव्याची दुसरी स्वारी**—हैदरच्या चढाईच्या बातम्या ऐकून माधवरावाच्या जिवाचा तिळपापड होत असे. पण निजामाशीं चालू असलेल्या युद्धांत अडकल्यामुळें त्यास हैदराकडे डोळेझांक करावी लागली. राक्षसभुवनच्या लढाईनंतर निजामाशीं चाललेल्या लढाईचा शेवट होतांच पेशव्यानें सन १७६३ च्या अखेरीस पटवर्धनांस पुढें रवाना करून सन १७६४ च्या फेब्रुवारींत मोठ्या फौजेसह पेशव्यानें कृष्णानदी ओलांडून हैदरवर चाल केली. रघुनाथरावानें आपल्याबरोबर यावें म्हणून त्यानें चुलत्यास पुष्कळ आग्रह केला परंतु तो नाशकास जाऊन स्नानसंध्या करीत राहिला. नाना फडणिसास पुण्याच्या कारभारावर ठेवून मोरोबास पेशव्यानें आपल्याबरोबर स्वारींत घेतलें. शिवाय सखाराम बापू, हरिपंत फडके, कृष्णराव बल्लाळ काळे वगैरे मुत्सद्दी कामकाजास होते. रास्ते, विनिवाले, रामचंद्र गणेश कानडे, महिपतराव कवडे, शहाजी भापकर, अक्कलकोटकर शहाजी भोसले, इचलकरंजीकर घोरपडे, आनंदराव गोपाळ सुपेकर असे अनेक भरंवशाचे निवडक सरदार पेशव्यानें स्वारींत घेतले होते. विठ्ठलराव विंचूरकरांचें पथकही लष्करांत सामील झालें. सखारामबापू सन १७४७ तील सदाशिवराव भाऊच्या स्वारीपासून कर्नाटक प्रांताचा माहितगार म्हणून प्रसिद्ध होता. शिवाय आपल्यामागें त्यास पुण्यास ठेवणें धोक्याचें होय असें वाटून पेशव्यानें त्यास आपल्याबरोबर स्वारींत घेतलें. सन १७६३ च्या दसऱ्यासच स्वारीची जमवाजमव चालू झाली. ती पूर्ण होतांच वर सांगितल्याप्रमाणें पेशवा चाल करून निघाला. जातांना प्रथम कोल्हापुरास जाऊन तो जिजाबाईस भेटला व तिचा जम नीट बसवून दिल्यावर ठिकठिकाणच्या खंडण्या वसूल करीत व आपली जरब बसवीत पेशवा चिकोडी-मनोळीवर आला. जिजाबाईला वचन दिल्याप्रमाणें हीं दोन्हीं ठाणीं पेशव्यानें कृष्णाबाई शिंदे इच्या कबजांतून काढून परत जिजाबाईस दिलीं. †

इतकें होईपर्यंत चैत्रमास आला. जवळ चाळीस हजार फौज जमली. अद्याप कामाचे पर्वत होते. स्वारींतील कच्ची हकीकत तो मातुश्री व रामशास्त्री ह्यांस वरचेवर लिहून कळवी. या दोनच व्यक्ती त्याला जिव्हाळ्याच्या व गुरुस्थानीं वाटत होत्या. गोपिकाबाईही या वेळीं नाशिकजवळ गंगापुरास जाऊन राहिली. पुण्याच्या भानगडींतून चित्त काढून मनास शांति मिळविणें हें तीर्थवासामुळें तिला शक्य झालें.

† पे. द. ३७. २५, २६; खरे ४१४–१५.

हैदराचा पाडाव करणें तर तो नुसत्या लष्करी सामर्थ्यानें होऊं शकणार नाहीं, पश्चिम किनाऱ्याकडून लढाऊ नौकांनींही त्याचा उच्छेद केला पाहिजे ह्या विचारानें पेशव्यानें वसई–विजयदुर्गाचें आरमार बिदनूरचे रोखानें हैदरच्या शहास बोलाविलें. ह्यासंबंधाचे हुकूम त्यानें रुद्राजी धुळप ह्यास दिले. रुद्राजीनें आरमार आणून हैदराचें होनावर बंदर काबीज केलें. त्याजमुळें हैदरास मोठाच आळा बसला.

हैदर नाईक बिदनुराकडे आहे असा माग काढून अगोदरच गोपाळराव पटवर्धन ह्यास पेशव्यानें त्याजवर रवाना केलें होतें. त्यानें हैदरास शह दिला असतां मागून पेशव्याची फौज आली. पेशव्यानें प्रथम हुबळीचें ठाणें घेतलें. मार्गे धारवाड हैदराचे कबजांत होतें. ता. ११ एप्रिल १७६४ रोजीं पेशवा मातुश्रीस लिहितो. " हुबळीहून कूच करून सावनुरास आलों. तेथचे नबाब भेटीस आले. दुसरे दिवशीं आम्ही त्यांचे भेटीस गेलों. मुराररावही लवकरच येतात. " हे दोघेही पेशव्यांचे त्या बाजूचे ताबेदार, हैदराच्या धास्तीनें कमकुवत बनले होते. पेशवे चालून येतांच त्यांस धीर आला. अर्थात् युद्धाचा प्रसंग सावनुरास उपस्थित झाला. सावनुरचा नबाब हातचा जाणें हैदरास मोठें लांछन वाटून तो ईर्षेनें सावनूरच्या बचावास धावून आला. जवळपास नद्या, डोंगर, जंगलें, वगैरे होतीं, त्यांची टेहळणी करून त्यांच्या आश्रयानें पेशव्याशीं संग्राम करण्याची तयारी त्यानें कडेकोट केली. इकडे पेशव्यालाही तितकाच आवेश चढला. दहा वर्षांपूर्वींचा वडिलांचा उद्योग पुरा करण्याची त्यानें पराकाष्ठा चालविली. कार्यभाग संपल्याशिवाय परत फिरावयाचें नाहीं असा निश्चय करूनच तो उद्योगास लागला होता; आणि सावनूरकरांस पाठीशीं घालून त्याचा बचाव माधवरावानें उत्कृष्ट केला. दोनही पक्षांनीं तोफा व गनिमी कावा ह्यांचा भरपूर उपयोग केला, त्यामुळें सहजच युद्ध अपेक्षेबाहेर लांबत गेलें. त्याचे सांग्रामिक दृष्टीचे एकंदर डावपेंच विशेष अभ्यसनीय आहेत.

मराठ्यांची स्वारी होणार ही बातमी समजल्यापासून हैदरअलीला धास्ती पडली. समोरासमोर मैदानावर मराठ्यांशीं झुंज देणें अशक्य आहे हें तो ओळखून असल्यानें डोंगरांचा व जंगलांचा आश्रय घेऊनच आपल्या फौजांनीं मराठ्यांच्या सैन्यावर छापे घालून त्यास हैराण करावे हें धोरण त्यानें आपल्या सरदारांस सांगितलें. बिकट जागीं छावणी केली तर मराठेही चढाई करून

येणार नाहींत आणि पावसाळा जवळ आल्यानें फार तर दोन महिनेच मराठ्यांशीं लढावें लागेल अशी त्याची कल्पना होती. ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन हैदरानें रट्टेहळ्ळीस आपल्या लष्कराची छावणी दिली. त्याच्याजवळ सुमारें साठ हजार फौज होती. त्याचा तोफखानाही चांगला होता.

उभय पक्षांत तेढ उत्पन्न झाली ती सावनूरबद्दल, म्हणूनच त्याच्या आसमंतांत उभय पक्षांचे तळ पडले. सावनूरबद्दल हैदराचें हें एक प्रकारचें आव्हानच मराठ्यांस होतें. स्वतः अनेकांशीं वाटाघाटी करून पेशवा योग्य त्या सूचना सरदारांस करीत होता, तरी त्यानें मुख्य पुढाकार गोपाळराव पटवर्धनास दिला आणि त्यानेंही हिंमतीनें सर्वांपुढें चाल करून मराठ्यांचें खरें पाणी शत्रूस दाखविलें. युद्धाचे डावपेंच बरोबर ओळखून सर्वांस योग्यतेप्रमाणें कामास लाविल्यानें, माधवरावाचें युद्धकौशल्यही सिद्ध झालें. या मोहिमेंत आरंभापासून लहानमोठ्या चकमकी सारख्या चालू होत्या, त्यांचें सविस्तर वर्णन येथें देण्यास अवकाश नाहीं. अभ्यासूंनीं खऱ्यांचें विवेचन पहावें. त्यांतले त्यांत सन १७६४ च्या मे महिन्यांतली रट्टेहळ्ळीची लढाई, सेप्टेंबर-ऑक्टोबरांतील धारवाडच्या वेढ्याचा भीषण संग्राम आणि पुढील डिसेंबरांतील अनवडीची लढाई हे प्रसंग विशेष स्मरणीय घडले. ता. २१ एप्रिल रोजीं माधवरावानें मातुश्रीस कळविलें, "मीर फैजुल्ला सावनूरहून हानगळावर बातेऱ्या बांधून झाडी धरून बसला आहे त्यास बाहेर काढण्यासाठीं हावनुरास आलों. मुराररावही येतात. त्यांस सामील करून पुढील मनसुवा ठरवूं. सावनूरकर नबाबाचे बचावासाठीं गोपाळरावास ठेविलें आहे."§

पेशव्याशीं फटकून वागणारे कित्येक सरदार होते. त्यांत कर्नाटकच्या संबंधांत मुराररावाचें प्रस्थ भारी असून त्यास वश केल्याशिवाय माधवरावाचा उद्योग टिकाऊ होण्याजोगा नव्हता. अर्थात् त्याची समजून करून साह्यास आणण्याची तजवीज पूर्वींच केलेली होती. राजाराम छत्रपतीचा विख्यात सेनापति संताजी होऊन गेला, तें सेनापतिपद आपणांस मिळावें अशी त्याच्या या पुतण्याची तीव्र आकांक्षा होती, ती माधवरावानें यावेळीं पुरी केली. साताऱ्यास छत्रपतीस लिहून त्यानें सेनापतिपद मुराररावाचे नांवें करार करून दिलें आणि ता. ९ मे रोजीं मुरारराव सावनूरजवळ पेशव्यास सामील झाला. पदाच्या सनदा पुढें २०

§ खरे ४२०.

सेप्टेंबर सन १७६५ रोजीं दिल्या. बागलकोट वगैरे महाल रास्ते यांजकडे होते ते काढून मुराररावास देण्यांत आले. हे रास्ते पूर्वी दादास मलाफी होते आणि हाल्लीं अंतस्थपणें त्यांचा ओढा हैदराकडे असल्याचा संशय आल्यावरून त्यांजवर माधवरावाचा रोष झाला. गोपिकाबाईस वैताग वाटण्याचें हेंही एक कारण होय. †

ह्यावेळीं हैदर नाईक बिदनूरचे झाडींत असून त्याची मुख्य छावणी रट्टेहळ्ळीस होती. मीर फैजुल्लास त्या छावणीच्या संरक्षणाकरितां ठेवून हैदर मराठ्यांच्या लष्करावर छुपे हल्ले करीत असे. इतक्यांत पंचवीस हजार प्यादा व बारा हजार फौजेनिशीं तो हरिहरावर आल्याचें वर्तमान कळतांच पेशव्यानें हावेरीची पेठ मारून हैदराच्या लष्कराच्या दिशेनें कूच केलें. तें कळतांच हैदरही झपाट्यानें मजला करीत रट्टेहळ्ळीसमीप आला. गोपाळराव पटवर्धन व विठ्ठल शिवदेव विंचूरकर हे तेथें होते. त्यांची थोडी फौज पाहून हैदरनें त्यांच्यावर हल्ला केला. गनिमी काव्यानें लढून त्यांनीं हैदराला आपल्या छावणीपासून तीन कोस दूर मैदानांत आणलें. इतक्यांत मोठ्या फौजेनिशीं पेशवा माधवरावही तेथें ३ मे १७६४ रोजीं दोनप्रहरीं आला. तेव्हांपासून घोर युद्धास सुरुवात होऊन सर्व मराठे सरदारांनीं हैदरावर एकदम घसारा केला. त्यामुळें पुष्कळ नाश पावून तो घाबरा झाला आणि जीव बचावून पळून गेला. रट्टेहळ्ळीचा हा तीव्र संग्राम स्मरणीय असून त्याचीं वर्णनें मुळांतच वाचलीं पाहिजेत. या लढाईंत मराठ्यांकडील "चाळीस पन्नास माणूस ठार, दोनशें जखमी, घोडे शंभर ठार; हैदरकडील दीडशेंपर्यंत माणसें ठार, पांच सातशें जखमी, घोडे सवाशें ठार व शिवाय जखमी झाले." रट्टेहळ्ळीच्या लढाईनंतरही अनेक चकमकी होत होत्या.*

हैदर नायकाचा पाडाव त्वरित करून आपण पर्जन्यकालीं परत जाऊं अशी पेशव्यास उत्कंठा होती, पण कार्यभाग लवकर पुरा होत नाहीं, लांबत जाणार असें दिसतांच त्यानें परत न जातां कर्नाटकांतच वर्षाकाल काढण्याचें ठरविलें. नाहीं तर केलेले श्रमही फुकट गेले असते. हैदर नायकाचा जोरही तसाच मोठा होता. "मराठे छावणीस राहिले ही मोठी मसलत झाली. या मनसुब्यानें दौलतीचा पाया घातला गेला. सावनूरकर व मुरारराव श्रीमंतांच्या पदरीं पडले,

---

† धा. रा. च. पृ. ३५; मा. रो. २०६, २०७; खरे ४७४.

* खरे. ४२७, ४३०; पे. द. ३७. ३१, ३२.

त्यांचा बचाव झाला. हैदर नायकाला सर्वांनीं मसलत सांगितली जे, श्रीमंत थोर, दिल्लीस बादशहा करावा यैसें यांचें प्राक्तन. दरसाल हेच मुलूख घेत गेले. गुदस्तां मोगल बुडविला," येणेंकरून हैदर नायकास धास्ती बसली. अतःपर पारिपत्य होईल किंवा निदानीं सल्ला करील. मराठे छावणी करीत नाहींत हा त्याचा भ्रम गेला.*

परंतु मराठे अंगावर आलेले पाहून हैदर नाईक डगमगला तर नाहींच, उलट त्यानें त्यांजवर मात करण्याचाच उद्योग कसून चालविला. तहाचीं पोकळ बोलणीं चालू ठेवून त्यानें मराठ्यांस गाफील ठेविलें, आणि गोपाळराव पटवर्धनाचा संहार करावा अशी मसलत योजिली. सावनुरापासून तीन कोसांवर बंकापूर येथें हैदरची छावणी असून तेथील बंदोबस्तास लालमियां म्हणून होता, त्यास हैदरानें सावनूरवर रवाना केलें. सावनूरचा बचाव करण्याची कामगिरी गोपाळरावाकडे होती. आपणांस अडचणींत गांठून दगा देणार हा नायकाचा डाव ओळखून गोपाळरावानें जुलईच्या पावसांतच पेशव्याकडे जास्त मदतीची याचना केली. लगेंच पेशव्यानें त्यास उत्तरीं कळविलें, "कसा समय येतो न कळे. सबब लांब लांब मजली करून येऊन पोंचतों. बातमी वरचेवर पाठवीत जावी. * विठ्ठल शिवदेव व आनंदराव रास्तेही येतील." पटवर्धनांची फौज रोज सावनुरांतून बाहेर पडून बंकापुरापर्यंत दौडत जाई व शत्रूचे लोक सापडतील त्यांस लुटून मारून टाकी. त्यामुळें सावनूरचें तर रक्षण झालेंच, शिवाय त्या भागांत मराठ्यांचीच दहशत बसली. गोपाळराव पवटर्धनास हैदर पूर्णपणें ओळखून होता. त्यास दग्यानें मारावें असा घाट रचून हैदरअली जुलैमध्यें पंधरा हजार गारदी, सहा हजार स्वार व कांहीं तोफा घेऊन सावनूरच्या जवळ दहा कोसांवर हनगळ येथें आला. पटवर्धनांची फौज दररोज सकाळीं बंकापुरचे रानांत ओढ्यावर जात असे, त्याची खबर राखून अकस्मात् छापा घालून त्यांस कापून काढावें असा हैदरचा डाव होता. पण ही गुप्त बातमी गोपाळरावास वेळेवर कळली, त्यामुळें हैदरची मसलत फसली आणि तो जास्तच चिडून गेला. पटवर्धनांचें सैन्य आतां येईल मग येईल अशा अपेक्षेंत आपण त्यावर तुटून पडून त्याचा फन्ना करूं अशा विचारांत हैदरअली उन्हातान्हांत, सर्व सैन्यासह मोठ्या आशेंत होता, परंतु संध्याकाळपर्यंत ओढ्यावर कोणीच न आल्यानें हैदर

* खरे. ४४७. * खरे. ४६४.

खजील होऊन बंकापुरास परतला. तो कोणाशींही बोलला नाहीं कीं रात्रीं त्यानें भोजनही केलें नाहीं. अंतःकरणांत नरमाई प्राप्त होऊन तो उद्विग्न झाला. वरदा नदीच्या कांठीं हावेरीचें ठाणें मराठ्यांचें होतें, त्यावर एके दिवशीं मोठ्या पहांटे हैदरकडील मीर फैजुल्ला व व्यंकटराव बार्की ह्यांनीं हल्ला केला, त्यांत मराठ्यांची फारच धांदल उडाली. विठ्ठलराव विंचूरकर मोठ्या हुरुपानें शत्रूवर चालून गेला, पण त्याचा निभाव लागेना. अशा समयीं ऐन वेळीं रात्रीं घोरपडे, शहाजी भोसले असे सरदार मदतीला धावून आले. त्यांनीं शत्रूस माघारा पिटून लाविलें. अशीं त्या एकंदर प्रसंगांचीं वर्णनें मन थरारून सोडणारीं आहेत. हावेरी घेऊन पुढें धारवाडच्या आपल्या लोकांस मदत करण्याचा बेत हैदरनें केला होता. पण तोही मराठ्यांनीं मोठ्या शौर्यानें हाणून पाडला. ह्याच सुमारास मराठ्यांच्या आरमाराचा सरदार धुळप यास पश्चिम किनाऱ्यावरून हैदरचा उच्छेद करण्याची पेशव्याची ताकीद होती, "तुम्ही फिरंगी, सावंत एकत्र होऊन जलमार्गें व खुशकीनें साधेल तिकडून हैदराचा प्रांत सर करणें, विसाजी केशवासही तुमचे साहित्यानिशी आज्ञा केली आहे." त्याप्रमाणें धुळपानें येऊन हैदरास हैराण केलें. $ त्यामुळें धारवाडच्या उद्योगास पेशव्यास जोर आला.

धारवाडचा मजबूद किल्ला हैदराचे कबजांत असल्यामुळें पेशव्यास पुढील मुलखावर चढाई करतां येईना. त्यावरून तें ठाणें कसेंही करून काबीज करण्याचा निश्चय पेशव्यानें ठरविला. तेथें मीर फैजुल्लाचा भाऊ फाजलअलीखान मोठ्या शिकस्तीनें टिकाव धरून होता. सेप्टेंबरचे आरंभीं पेशव्यानें किल्ल्यास वेढा घातला. दोन महिने निकराचा संग्रम झाला तो लिहितां पुरवत नाहीं. शेवटीं ता. ६ नोव्हेंबर १७६४ ला मराठ्यांचें निशाण धारवाडच्या किल्ल्यावर चढलें. "किल्ला मातबर, दुहेरी कोट, दोन खंदक, आंत दारू व गोळी नाहींशी झाली, त्यामुळें हयास आले व सलुखावर घातलें. अबरूनें पार करून देणें, म्हणून गोपाळराव पटवर्धनास आणून त्याच्या मार्फत किल्ला खालीं करविला. हत्यार व वस्त्रभाव सुद्धां बाहेर काढून दिले. नारो त्रिंबक एकबोटे यानें या कामीं विशेष पराक्रम केल्यावरून त्यास श्रीमतांनीं पालखी दिली. श्रीमंत दैववान. हैदराचे चित्तांत धारवाडची कुमक करण्याचें पुष्कळ होतें. पण विठ्ठल शिवदेव व गोपाळराव यांनीं सावनुरास राहून हैदरनायकाची कुमक धारवाडास येऊं दिली नाहीं." §

$ पे. द. ३७. ५१, ५२, ५८. § खरे ५०५; पे. द. ३७. ५१.

धारवाड घेतल्यावर माधवराव पेशवा हनगळास आला व तेथून त्यानें ता. १ डिसेंबर १७६४ रोजीं हैदरच्या अनवडी येथील छावणीवर जोरांत मारगिरी केली. " मराठ्यांनीं बेजरब घोडीं चालवून झाडींत शिरून गाडद्यांचे बुरूज फोडून हजार बाराशें कापून काढिले. पांच सातशें धरून आणिले. चहूंकडून सारे उठले. पांचसातशें तोफा होत्या त्याही आणिल्या. थोडेसें मैदान असतें तर खासा हैदरदेखील धरला गेला असता, झाडीनें त्याला वांचविलें. आमचे फौजेंत २५ ते ४० माणूस व ७५ घोडें पडलें असेल. मुरारराव घोरपड्यांनीं मोठी मर्दुमकी केली. खुद्द श्रीमंतांनीं हुजरात बोलावून घोड्यावर बसून फौज सुद्धां नीट चालून घेतलें." पेशव्याच्या या हल्ल्यानें लढाईचा रंग पार पालटून गेला व हैदर हतवीर्य होऊन जीव बचावून पळून गेला. ही अनवडीची लढाई म्हणजे या स्वारींतील मराठ्यांचा मोठा विजय होय. या वेळेपासून तरुण पेशव्याच्या कर्तृत्वाचा व पराक्रमाचा हैदरावर असा कांहीं पगडा बसला कीं कितीही सैन्य असलें तरी स्वतः माधवराव हजर असेल त्या प्रसंगांत झुंजण्याचें धाडस हैदरनें पुनः कधीं केलें नाहीं; वीस पंचवीस कोसांच्या टापूंत तो कधीं फिरकला नाहीं. हें आनंदाचें वर्तमान पेशव्यानें मुद्दाम निजामास लिहून कळविलें. ‡

हैदरास कसा नमवावयाचा याची आतां मराठे सरदारांनीं भरपूर चर्चा चालविली. त्याच्या छावणींतच त्यास कोंडून उपासमारीनें जेरीस आणण्याचा प्रयत्न करण्यांत आला. बिदनूरकडून त्यास येणारी रसद मराठ्यांनीं बंद केली. त्याच्या छावणींत येणाऱ्या बाहेरच्या वाटा झाडें तोडून व तीं वेडींवाकडीं पसरून दुर्गम केल्या. मराठ्यांचा हा डाव हैदरानें ओळखला आणि सन १७६५ च्या जानेवारींत थोड्या लोकांनिशीं छावणीबाहेर निसटून तो बिदनुरास पोंचला. मात्र त्या साहसांत त्याचे पुष्कळ लोक मारले गेले. त्याचें सामान मराठ्यांनीं लुटून घेतलें. अशा प्रकारें तो जेरीस आल्यावर खुद्द बिनदुरांतच त्यास कायमचा बुडविण्याची तयारी पेशव्यानें केली असतां आयत्या वेळीं दादा साहेबानें येऊन त्याचा बचाव केला, हा उद्वेगकारक प्रकार आतां सांगितला पाहिजे. *

राक्षसभुवनापासून माधवरावाचें तेज स्वतंत्रपणें चमकून त्यापुढें दादा निष्प्रभ होत चालला हा प्रकार त्याच्या आख्यानांत स्वतंत्रपणें आला आहे.

‡ खरे, ५०९, ५१०; पे. द. ३७. ५४, ५५. * पे. द. ३७. ५१, ५७.

संसारांतून निवृत्त होण्याची त्याची भाषा केवळ वरपांगी होती. पराक्रमाची पोकळ घमेंड असणाऱ्या गृहस्थाची अशीच दुर्दशा होत जाते. कर्नाटकाच्या स्वारीस निघतांना माधवरावानें त्यास आग्रहानें बरोबर बोलाविलें तें अमान्य करून तो स्नानसंध्येच्या निमित्तानें सन १७६४ चे चैत्रांत "त्र्यंबकेश्वरीं राहण्यास गेला. नाशकाजवळ चांवडस म्हणून गांव आहे त्यांत घरवाडा बांधला. अग्निहोत्र घेणार होते. कुंडें घालून संकल्प करावा येथपर्यंत आल्यावर हे किरकिर आम्हांस पुरवणार नाहीं असें म्हणोन कुंडें गंगेंत टाकलीं. पालख्या घोडीं पाठवून भट आणले होते त्यांस निरोप दिला. दौलत बुडविल्यांतच जमा आहे. ईश्वर या उपरी रक्षील तर न कळे. दादांस संतोष वाटावा म्हणून गोपिकाबाई गंगातीरीं जलालपुरीं राहिली आहेत." नाशकाहून त्रिंबकराव पेठ्यानें ही हकीकत पेशव्यास कळविली. *

चुलत्याचे हे छंद निकरानें बंद पाडणें पेशव्यास कठिण नव्हतें, पण त्यास दुखवूं नये ही बुद्धि त्यानें कायम ठेवून मुद्दाम मनसोक्त वागूं दिलें. शेवटीं संग्रामावर प्रकरण येऊन अटक करावी लागली, तो प्रकार पूर्वीच होता तर राज्यास कल्याणप्रद झाला असता. गोविंदराव शिवराम खाजगीवाले व त्रिंबकराव पेठे हे दोघे दादाजवळ पेशव्यानें ठेवलेले कारभारी दादास नको होते. माधवराव् मात्र चुलत्यास गोड पत्रें लिहून स्वारीची हकीकत कळवी व सल्लामसलत विचारी. निजाम, भोसले इत्यादींचे व पुण्याचे व्यवहार दादाच पाहत असे. "दादा प्रस्तुत कोठें आहेत, मर्जी कशी आहे, बोलण्यांत भाव काय आहे, इकडील वर्तमानें तिकडे काय येतात, पुरंदरे वगैरे तिकडे काय प्रकार घाटित आहेत, मातुश्री व मामा यांचे बोलण्याचा प्रकार काय झाला?" अशा गोष्टींचा तपास माधवराव सारखा करीत होता. युद्धाचा व राज्याचा कारभार सांभाळून दादाच्या वृत्तीला बहकूं न देणें हें एक विलक्षण जोखीम माधवरावाला सारखें बोचत होतें.

दरम्यान पुरंधरच्या कोळ्यांचें प्रकरणें उद्भवलें, त्यामुळें दादा चिडून गेला. पुण्याचा कारभार आपण पाहणार असें ठरवून त्यानें नाना फडणिसास आपलेजवळ नाशकास बोलावून घेतलें. पण त्यांची बीत न बसतां नाना परत पुण्यास आला. मध्यंतरीं दादाची वृत्ति क्षुब्ध होऊन तो फौज जमवूं लागला.

* खरे, ४२८, ४२९.

म्हणून माधवरावानें त्यास मुद्दाम आपल्याजवळ कर्नाटकांत बोलावून घेतलें. त्यावर गोविंद शिवराममार्फत दादानें आपल्या अटी पुतण्यास कळविल्या, त्या माधवरावानें मान्य केल्यावर सन १७६४ च्या दसऱ्यास दादाची स्वारी नाशकांतून बाहेर पडली. आपल्याबरोबर नागपूरकर जानोजी भोसल्यानें यावें म्हणून त्यानें त्यास पत्रें लिहिलीं. पण कबूल करूनही तो आला नाहीं. त्रिंबकराव पेठेही त्याच्याबरोबर गेला नाहीं. नाशकाहून निघाल्यावर रस्त्यानें मिरवीत व अधिकार गाजवीत आल्यामुळें कर्नाटकांत पोंचण्यास त्याला तीन महिने लागले. ता. २७ जानेवारी १७६५ रोजीं चुलत्यापुतण्यांच्या हरपनहळ्ळीस भेटी झाल्या. नंतर बिदनुरावर चालले. हैदराच्या तहाचीं बोलणीं सारखीं घाटत असून उभयतांच्या वकिलांची जा ये चालू होती. सरदारांचें मानस होतें कीं हैदराचा पक्का निकाल एकदांचा करून त्याचें पुरतें पारिपत्य करावें व पूर्वी नानासाहेब पेशव्यानें ताब्यांत आणलेला श्रीरंगपट्टणपावतोंचा तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील सर्व प्रांत पूर्णपणें सोडवावा. परंतु आतां दादा आल्यानें हा प्रकार अशक्य झाला. तहाचा नेट धरून दादानें युद्ध थांबविलें. आग्रह धरावा तर वडिलांची मर्जी जाते म्हणून माधवरावानें दादास विरोध केला नाहीं. आणि ३० मार्च १७६५ रोजीं तह ठरून कर्नाटकची ही स्वारी आटोपली. बोलाचाली होऊन मीर फैजुल्लाच्या मार्फत जो तह ठरला त्याचा मजकूर ता. ३० मार्चच्या पत्रांत माधवरावानें रामशाशास्त्र्यास कळविला. "हैदर नायकाचें पारिपत्य करावें या अर्थी स्वारी बिदनूर प्रांतीं अनंतपुरास आली. तें ठाणें घेतल्यावर त्याशीं गांठ घालावी इतक्यांत त्यांनीं वकील पाठवून बहुत आर्जव केलें. तीर्थरूपांचे विचारें मसलत लांबवूं नये, त्याजवरून तह केला. (१) तीस लक्ष रुपये (२) बंकापूर वगैरे तुंगभद्रेच्या उत्तरेकडील सर्व मुलूख आणि (३) मुराराव घोरपडे आणि सावनूरकर यांचे तालुके देऊन तह करून घेतला." मेघश्यामराव पटवर्धन कैदेंत होते त्यांस सोडवून आणलें. या तहाला अनंतपूरचा तह असें म्हणतात. हैदराचा पूर्ण उच्छेद करण्याची संधि आली असतां दादासाहेबांच्या हट्टाग्रहानेंच ती गोष्ट घडली नाहीं. शेवटीं जो तह झाला त्यालाही माधवरावास मान्यता द्यावी लागली. दादा नसता तर बिदनूरचें राज्य व शिऱ्याचा सुभा घेतल्याशिवाय माधवराव राहिला नसता. तह झाल्यानें हा शत्रु कायम राहून इंग्रजांची सत्ता वाढण्यास सोय झाली. सावनूर व गुत्ती हीं

दोन संस्थानें मराठ्यांचे कबजांत आलीं हाच या स्वारीचा मुख्य फलितार्थ होय. त्या दोघांच्या बचावार्थ कर्नाटकांत गोपाळराव पटवर्धन, विठ्ठल शिवदेव व रास्ते ह्यांस ठेवून पेशवा परत फिरला व कार्तिकस्वामी व हंपी येथील देवदर्शनें करून पंचमहालांतील खंडण्या वसूल करीत ज्येष्ठ अखेर चुलते पुतणे पुण्यास पोंचले. ह्या स्वारींत पेशव्याचें निजामाशीं संगनमत असून बसालतजंगाचे बचावासाठीं माधवरावानें बाबूराव हरीस फौज देऊन पाठविलें. ×

**४. हैदर नायकाचा इंग्रजांस शह** — सन १७६५ त तुंगभद्रेपर्यंतचा मुलुख हस्तगत करून पेशवा परत फिरला. त्यानंतर हिंदुस्थानच्या राजकारणांत बंगालच्या दिवाणीसारख्या मोठ्या घडामोडी बनून आल्या. इंग्रजांचें पाऊल दिवसेंदिवस पुढें सरकूं लागलें तें एतद्देशीय सत्ताधीशांस जाचक होऊन त्यांस आपल्या बचावाची चिन्ता उत्पन्न झाली. त्यांतल्यात्यांत कर्नाटकीय क्षेत्रांत इंग्रज व हैदर नाईक यांजमध्यें वैर उत्पन्न होऊन त्याचा फायदा घेऊन तुंगभद्रेच्या दक्षिणकडील हैदरानें बळकावलेला प्रदेश सोडविण्याचा उद्योग पेशव्यानें योजिला. पण सन १७६६ च्या आरंभीं भोसले–निजामांच्या प्रकरणांत पेशवा गुंतून गेल्यामुळें त्यास हैदराकडे लक्ष देण्यास सवड झाली नाहीं. या सालीं दादा उत्तरेंत असून पावसाळा संपतांच पेशव्यानें दक्षिणचा मार्ग धरला. खरें म्हटलें तर सन १७६५ त क्लाइव्हनें बंगालची दिवाणी मिळविली तेव्हांपासून सन १७८२ च्या सालबाईच्या तहापर्यंत मराठे, इंग्रज, निजाम व हैदर यांचे एकमेकांत स्नेह, संग्राम, तह, करार इत्यादि इतकें कांहीं बनून आले, आणि प्रत्येकानें दुसऱ्यावर मात करण्याचे असे प्रयत्न केले, कीं त्यांतून फक्त मराठ्यांचा तेवढाच भाग वेगळा काढणें अशक्यप्राय आहे. या राजकारणाची ही गुंतागुंत सोडविणें कठिण असून, त्यासंबंधींचीं साधनें मराठे व हैदर नायकाचीं बहुतेक प्रकाशित झालीं, निजामाचीं त्याचे दफ्तरांत असतील; आणि इंग्रजांचीं बंगाल, मद्रास, मुंबई अशा तीन ठिकाणीं विभागलेलीं थोडीं बहुत तपासलीं गेलीं आहेत. † राजकारणाला आधार लष्करी सामर्थ्य असल्यामुळें या चतुर्विध चढाओढींत पाश्चात्य संग्रामपद्धतीचा अवलंब एतद्देशीयांनीं त्वरेनें करून

× खरे. ५६४, ५६५; पे. द. ३७. ६१, ६३, ७१. † अनिलचंद्र बानर्जीकृत 'माधवराव पेशवा' व नरेन्द्र कृष्ण सिन्हाकृत 'हैदर अली' या दोन १९४१ च्या ग्रंथांत इंग्रजी दफ्तरखान्यांतले अप्रकाशित कागद उपयोगांत आणलेले अभ्यासकांनीं पहावे.

भटक्या व स्वार्थी पाश्चात्य सैनिकांस पदरीं ठेविलें, त्यामुळें आणखी एक निराळाच रंग त्यावेळच्या इतिहासास चढला.

सन १७६६ च्या फेब्रुवारींत पेशव्यानें निजामाची भेट घेऊन त्याच्याशीं स्नेह जोडिला ही गोष्ट मद्रासकर इंग्रजांस दुःसह होऊन हैदरअलीचा पाडाव करण्यासाठीं त्यांनीं निजामअलीशीं तह ठरवून त्याचें साह्य मिळविण्याची सोय केली. हा तह ता. १२ नोव्हें० १७६६ चा आहे. त्यासंबंधानें २४ नोव्हेंबरास माधवराव मातोश्रीस लिहितो, " नबाबाचा व इंग्रजांचा सलूख झाला. नबाबानें आपले प्रांत इंग्रजांस इजाऱ्यानें दिल्हे. नबाब नाइलाज होऊन सलुखास कबूल जाहले. फिरंगी जबरदस्त. चैन पडूं देणार नाहींत सबब सलूख केला." * मात्र ह्या तहापासून इंग्रजांना निजामाचें साह्य कांहीं न होतां त्यांस हैदरअलीनें पुढील दोन वर्षींच्या युद्धांत चांगलें नरम केलें. मद्रासकर इंग्रज एवढे रडकुंडीस आले कीं त्यांनीं माधवरावाच्या पायधरण्या चालविल्या. सन १७६७ त त्यांनीं आपला वकील ले० टॉड कर्नाटकांत माधवरावाचे भेटीस पाठविला, तो लिहितो, " इंग्रजांच्या वकिलाला मराठ्यांकडून अशी अप्रतिष्ठा सहन करण्याचा अनुभव यावा हें लिहिण्याची सुद्धां मला शरम वाटते. मुकाट्यानें मला हें सर्व सहन करणें भाग पडलें. मनांत एवढा त्वेष वाटत होता, पण तो सर्व गिळून बसलों." ( बानर्जी, पृष्ठ १०० ). निजाम – मराठे – हैदर ह्या सर्वांनीं संगनमत करून मद्रासकरांची अशी त्रेधा उडविली कीं तिला तोड मिळणार नाहीं. त्यांचा हस्तक आरकाटकर नबाब महंमदअली याचें संरक्षण इंग्रजांकडून होईना. अर्थात् यावेळीं चहूंकडे माधवरावाची प्रतिष्ठा विशेष वाढल्यानें त्यास आपापल्या बाजूस ओढण्याचे सर्वांचे प्रयत्न चालू झाले. मद्रासकर व मुंबईकर इग्रंज दोघांनाही भीषण परिस्थिति निर्माण झाली म्हणूनच माधवरावाचा लोभ संपादण्यासाठीं मुंबईकरांनीं मॉस्टिन या आपल्या वकिलास सन १७६७ अखेरीस पुण्यास पाठविलें तो प्रकार अन्यत्र सांगितला आहे. हे राजकारणाचे धागे होत.

**५. हैदर नायकावर तिसरी स्वारी** — अनंतपुरच्या तहांत माधवरावाची महत्त्वाकांक्षा दादाच्या हट्टामुळें अपुरी राहिलेली होती. शिवाय तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील स्वराज्याचा प्रदेश अद्याप हैदरापासून परत मिळवावयाचा राहिला होता. सन १७६५ – ६६ चीं दोन सालें पेशव्याचीं इतर कामांत गेल्यामुळें

* ख. ६३० व चंद्रचूड द. १·११८.

त्याला हैदरकडे लक्ष देण्यास सवड झाली नाहीं. या काळांत हैदर गप बसलेला नव्हता. कर्नाटकांतील संस्थानांपासून खंडणी वसूल करण्याचा त्यानें सपाटा चालविला. तेव्हां आपला राहिलेला उद्योग पुरा करण्याच्या हेतूनें सन १७६६ च्या दसऱ्यास पेशव्यानें गोपाळराव पटवर्धनास कर्नाटकांत पुढें रवाना करून पुण्यास कर्नाटकच्या स्वारीची तयारी जारीनें सुरू केली. ता. २६ ऑक्टोबर रोजीं पेशवा पुण्याहून निघाला. "नोव्हेंबरांत सुरापुरच्या संस्थानिकास जरबेंत आणून व त्याच्याकडून खंडणी वसूल करून डिसेंबरमध्यें तुंगभद्रेच्या रोखें चालला. पुढें पंचमहालांत अंमल बसवून अदवानी, बळ्ळारी, कर्नूल, कनकगिरि, चित्रदुर्ग, देवदुर्ग, रायदुर्ग इत्यादि संस्थानांतून त्यानें खंडण्या वसूल केल्या आणि पुढें तो श्रीरंगपट्टणकडे वळला. गोपाळराव पटवर्धन, सखारामबापू, कृष्णराव काळे, हरिपंत फडके, मोरोबा फडणीस, इत्यादि त्याच्या बरोबरीची मंडळी त्याच्या तडफेस अपुरीच पडूं लागली." देवदुर्गच्या मुक्कामीं पेशव्यानें तमाम सरदारांचे गोट तपासून लष्कराच्या गणत्या घेतल्या, तेणें करून सरदारांस मोठी दहशत उत्पन्न झाली. "रामचंद्र गणेश, गुरुजी, हरिपंत फडके असे मातबर गणतीस पाठविले. स्वतःचे खिजमतदार पाठवून चोरबातमी आणून चौकशी केली. शिस्त सुधारली." § लहान मोठे लोक सर्व पेशव्यापुढें कांपूं लागले.

पेशव्याची स्वारी आपल्यावर होणार ह्याची हैदरास बातमी होतीच. तेव्हां त्याच्या वकिलानें पुण्यास पेशव्याची गांठ घेऊन तडजोडीचा उपक्रम मांडला. पेशव्यानें त्यास कळविलें कीं, "शिऱ्याचा सुभा व आमचा मुलुख घेतला आहे तो सोडावा, मुराररराव व सोंधेकर यांस उपद्रव देऊं नये, चित्रदुर्गकर, रायदुर्गकर वगैरे आमचे मांडलिक संस्थानिक आहेत त्यांपासून खंडण्या घेऊं नये व पाऊण कोट रुपये खंडणी द्यावी." परंतु पेशव्याला तहाच्या नादीं लावून कालहरण करण्याचाच हैदराचा उद्देश असल्यानें हा तहाचा उपक्रम निष्फळ ठरला. गोपाळराव पटवर्धनानें हैदरच्या वकिलास घालवून दिलें तें ऐकून श्रीमंत संतोषी झाले. मुरारराावानेंही आपला निष्ठेचा भाग कळविला कीं, "श्रीमंत इंगितज्ञ आहेत. आमचा विचार त्यांचे बाहेर नाहीं. सत्वर स्वार होऊन सामील होतों." फेब्रुवारींत निजामअलीखान व त्याचा पुत्र पंधरा हजार फौज, तोफखाना व गार्दी यांसह येऊन पेशव्यास सामील झाला. अशा प्रकारें

§ खरे, ६५९.

खंडण्या व जरब वगैरे बाबतींत पेशव्यानें केलेला खटाटोप मूळ कागदांतच वाचला पाहिजे. ×

ता. १२ फेब्रुवारी सन १७६७ रोजीं माधवराव शिऱ्यास पोचला. शिऱ्याचा किल्ला मोठा मजबूद गणला जात असून हैदराचा मेहुणा मीर रेझा तेथें सुभेदार म्हणून काम करीत होता. तेथें येतांच पेशव्यानें किल्ल्यावर चाल करून मोठ्या शिताफीनें दहा दिवसांत तें ठिकाण काबीज केलें, मीर रेझा शरण आला व किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण चढलें. मीर रेझास माधवरावानें आपल्या चाकरीस ठेवून घेऊन त्यास गुर्रमकोंड्याचा परगणा व किल्ला जागीर दिला. शिरें घेतल्यानें माधवरावाची मोठी ख्याति होऊन त्याचा दबाव बसला. + मुराररावाचें व मीर रेझा यांचें ठीक नव्हतें. मदगिरीजवळ मुक्काम असतां घोरपड्याचे लोकांनीं मीर रेझाचे गोटावर अचानक छापा घालून त्याची सर्व जिंदगी लुटली. त्याबद्दल पेशवानें अपराध्यांस कडक शासनें केलीं, तेणें करून प्रत्यक्ष मुराररावही पेशव्यास चळचळां कांपूं लागला. ह्यासंबंधाचे कागद खरे ६९२–७०६ अभ्यसनीय आहेत.

पुढें ता. ४ मार्चला पेशव्यानें मदगिरीचा बळकट किल्ला निकराचा हल्ला करून जिंकून घेतला. 'पहाडी किल्ला फार बिलंदर. ईश्वर इच्छेनें एका दिवसांत काबीज झाला.' बिदनूरची राणी व तोतया समजला जाणारा तिचा पुत्र तेथें हैदराच्या कैदेंत होते, त्यांस बहुमानपूर्वक सोडवून पेशव्यानें पुण्यास पाठवून दिलें. यानंतर चेनरायदुर्ग, मडकशिरें, दोड्ड बाळापूर, चिक्क बाळापूर, मिडगेसी, देवनहळ्ळी, होसकोटें, कोलार वगैरे महत्त्वाचीं व दुसरींही अनेक ठाणीं मराठ्यांनीं घेऊन सर्वत्र आपला अंमल बसविला व सुमारें तीस लाख उत्पन्नाचा मुलुख दोन महिन्यांत मराठ्यांनीं जिंकून घेतला. अशा रीतीनें मनांत योजलेला मुख्य हेतु साध्य झाल्यासारखाच होता. आतां फक्त श्रीरंगपट्टण व बिदनूर हीं दोन स्थळें हैदरअलीच्या कबजांत राहिलीं. ह्याच वेळीं निजामअलीही मराठ्यांस येऊन मिळण्यासाठीं निघाला. हें ऐकतांच हैदराचें धाबें दणाणलें व मराठ्यांशीं तह व्हावा म्हणून तो फारच आतुर झाला. आपाजीराम व करीमखान हे हैदरचे वकील गोपाळराव पटवर्धनाच्या मध्यस्थीनें तहाच्या वाटाघाटी करूं लागले. अखेर नानासाहेब पेशव्याच्या वेळीं जितका मुलूख

× खरे ६७७. + पे. द. ३७. १३०–१४१ व खरे ६७७.

मराठ्यांच्या ताब्यांत होता तो त्यांस हैदरनें द्यावा, मराठ्यांनीं जिंकलेला मुलूख परत द्यावा, तेहतीस लक्ष रुपये हैदरानें खंडणी द्यावी व मराठ्यांच्या मांडलिकांस त्यानें उपद्रव देऊं नये अशा अटी ठरून तह कायम झाला. ( ता. ७ मे, १७६७ ). या वेळीं मराठ्यांची "छावणी कर्नाटकांत होती तर मोठीं कामें सहजांत झालीं असतीं. हैदरनायकानें आजपावेंतों दुराचरण केलें त्याचें प्रायश्चित्त बरेवजेनें व्हावें असा समय होता, परंतु देशाचा पायबंद जबरदस्त आहे, * यामुळें छावणी होणें दुरापास्त" झालें. या वेळीं निजामास कांहीं खंडणी हैदरानें द्यावी असें ठरलें होतें, परंतु मराठ्यांस मिळालेली खंडणी, लूट व मुलूख यांचा निमा भाग, कांहींही कामगिरी न करतां निजामाला पाहिजे होता ! त्या त्याच्या मागणीस मराठ्यांनीं मान्यता दिली नाहीं. पुण्यास दादा बिघाड करणार असें वर्तमान आल्यानें पेशव्यानें कर्नाटकांत छावणी न करतां परत जाण्याचें ठरविलें आणि ता. ७ मेला रामशास्त्री यास लिहिलें, "हैदरखानाचा ठराव तेहतीस लाखांवर जाला. मोगलांचे चौदा लाख घेतले. कांहीं ठाणीं ठेविलीं, कांहीं दिलीं." मे महिन्यांत गोपाळराव व रास्ते यांस बंदोबस्तास ठेवून पेशव्यास चुलत्याचे उपद्व्यापामुळें कर्नाटकाचा विषय आटोपता घेऊन परत फिरणें भाग पडलें. ज्येष्ठाचे आरंभीं तो पुण्यास पोंचला, ( ता. २८ जून १७६७ ). त्याबरोबर चुलत्याशीं त्याचा जो द्वेष उद्भवला त्याचें वर्णन अन्यत्र दिलें आहे. पण हैदरासंबंधीं याच वेळीं मद्रासकर इंग्रजांशीं जो युद्धप्रसंग निर्माण झाला त्याचें स्वरूप विषयानुरोधास्तव येथेंच समजून घेणें अवश्य आहे.

सन १७६७ मध्यें हैदरानें आपण होऊन पेशव्याशीं मिटतें घेतलें, याचें कारणही तसेंच घडून आलें. मद्रासकर इंग्रजांनीं हैदरावर आक्रमण चालविलें तें त्यास दुःसह होऊन उभयतांत युद्धप्रसंग घडून आला, त्यास हैदरइंग्रजांचें पहिलें युद्ध असें नांव इतिहासांत मिळालें आहे. हें युद्ध सन १७६७ च्या ऑगस्टांत सुरू होऊन ४ एप्रिल १७६९ च्या तहानें संपलें. त्यांत अनेक तीव्र संग्राम घडून आले. निजामाचें साह्य घेऊन हैदरानें इंग्रजांस सडकून रगडून काढिलें. हैदरावर इंग्रजांचा एवढा रोष या वेळेपासून बनला कीं सन १७९९ त टिपूचा समूळ नाश करीपर्यंत इंग्रजांस कधीं चैन म्हणून पडलें नाहीं. या पहिल्या म्हैसूर-इंग्रज युद्धकाळांत हिंदी सत्ताधीश इंग्रजांवर चहूंकडून उठले होते.

* पे. द. ३७. १४७–१६९.

प्रत्यक्ष बादशहा देखील इंग्रजांच्या नांवानें खडे फोडून मराठ्यांचे आश्रयास गेला. इंग्रजांना आळा घालण्याचें सामर्थ्य एतद्देशीय सत्ताधीशांत नव्हतें असें नाहीं. या पहिल्या म्हैसूर युद्धांतच हैदराकडे तहाची याचना करितांना इंग्रजांची पुरेवाट झाली. युद्धसमाप्तीनंतर हैदरअलीनें एक भलें मोठें चित्र तयार करविलें, त्यांत मद्रासचा गव्हर्नर व कौन्सिल त्याजपुढें गुडघे टेकून शरणागति व्यक्त करीत आहेत, त्यांचा सेनापति कर्नल स्मिथ एका हातांत तहाचा कागद व दुसऱ्यांत मोडक्या तरवारीचे तुकडे धरून आर्जवें करीत आहे, इंग्रज वकील डुप्रे याचें नाक धरून त्यांतून हैदरअली मोहरा बाहेर काढीत आहे, असा देखावा चितारलेला आहे. पाश्चात्य युद्धकला हैदरानें हस्तगत केली म्हणूनच युद्धांत इंग्रजांचा गर्व त्यानें उतरविला. त्याच्या घोडेस्वारांच्या दौडीपुढें इंग्रजांस टिकाव धरवेना. याचा निष्कर्ष असा निघतो, कीं इकडचा गनिमी कावा व पाश्चात्यांचा तोफखाना यांचें यथोचित मिश्रण हिंदुस्थानांत प्रथम हैदरानेंच जमवून आणलें. या युद्धांत इंग्रजांची अत्यंत नाचक्की झाली. लंडनच्या अधिकाऱ्यांकडून मद्रासकरांना जबरदस्त ठपका आला. त्या वेळीं मद्रासचा कारभार इतका बिघडला होता कीं तो सुधारण्यास पुढें पुष्कळ काळ लागला. मद्रासच्या गव्हर्नरास अटक, बडतर्फी असे भीषण उपचार सहन करावे लागले, ते प्रकार जगजाहीर आहेत.

६. **पेशव्याची चौथी स्वारी**—सन १७६९ त सर्व विरोधक ठिकाणीं बसवून पेशव्याला आपले कार्यभाग निर्वेध चालविण्याची शक्ति प्राप्त झाली. लगेच त्यानें उत्तरेंत व दक्षिणेंत दोहींकडे एकदम मोहिमा चालू केल्या. कर्नाटकांतील ही त्याची चौथी स्वारी होय. या स्वारींत त्याजबरोबर नागपूरकर साबाजी भोसले व बडोदेकर गोविंदराव गायकवाड, दोघेही सामान्यतः पेशव्याशीं फटकून वागणारे, राज्याच्या कामगिरीवर दाखल झाले. शिवाय पत्नी रमाबाई व बंधु नारायणराव दोघेंही बरोबर होतीं. पूर्वीच्या स्वारींत मीर रेजा मराठ्यांचे चाकरीस आला होता, तो पुनः हैदराकडे जाऊन मराठ्यांचीं ठाणीं घेऊं लागला. बाळापूर येथें महिमाजी शिंदे म्हणून मराठ्यांचा सुभेदार होता. त्याजवर मीर रेजानें छापा घालून त्यास तेथून घालवून दिलें. त्या बाजूस दुसरा मोठा मराठ्यांचा सरदार मुरारराव घोरपडे, तो आज तीन वर्षें अनेक विरोधकांशीं झगडून मोठ्या धैर्यानें आपला बचाव करीत होता.

म्हैसूरच्या पूर्व प्रदेशांत हैदरनायकाला पायबंद देणारा हा मुराररावच मुख्य असल्यानें त्याजवर हैदराचा अतिशय राग झाला होता. त्यालाही मीर रेजानें सतावून सोडलें. चित्रदुर्ग, हरपनहळ्ळी इत्यादि ठिकाणच्या मराठ्यांच्या मांडलिकांपासून मीर रेजानें खंडण्या घेतल्या. म्हणजे पर्यायानें पेशव्यानें पूर्वी केलेला उद्योग सर्व फुकट गेल्यासारखें झालें. हैदर पुनः सावनूरवर चालून आल्यानें पूर्वींच्या स्वारींतले पेच पुनरपि उद्भवले. पेशव्यानें गोपाळरावास सावनूरचे बचावास ठेवून दिलें होतें. त्यानें हैदराकडे अनेक तक्रारी केल्या, परंतु त्यानें त्यांकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. एवढेंच नव्हे तर पेशव्याला तहाच्या वाटाघाटींत गुंतविण्यासाठीं त्यानें आपाजीराम या आपल्या वकिलास पुण्यास पाठविलें होतें. पेशव्यानें त्याला आपल्या अटी स्पष्टपणें सांगितल्या, पण हैदरास त्या पटल्या नाहींत. अखेर युद्धाची तयारी करून पेशवा ता. ७ नोव्हेंबर १७६९ रोजीं पुण्याहून कर्नाटकाच्या स्वारीस निघाला. त्याच्याबरोबर सुमारें पाऊण लक्ष फौज व पन्नास तोफा होत्या. कर्नाटकांत पोचल्यावर अनेक बारीक सारीक ठाणीं मराठ्यांनीं जिंकून घेतलीं. मराठ्यांशीं खुल्या मैदानावर लढणें म्हणजे आत्मनाश करून घेणें होय असें हैदरचें ठाम मत असल्यानें तो समोरासमोर युद्धास येईना. श्रीरंगपट्टण व बंगरूळ या दोन ठाण्यांची त्यानें चांगली मजबुदी केली. या स्वारीचें उद्दिष्ट हरिपंत फडक्यानें ता. १२ फेब्रुवारीच्या पत्रांत स्पष्ट केलें तें असें. "आवंदां श्रीमंतांचें मानस आहे कीं हैदरनाइकासीं सलोक न करितां तमाम इकडील पालेगार वगैरे मेलवून पारपत्ये कराव यैसे आहे. चित्रदुर्गकर पांच हजार प्यादा व दीड हजार फौज चांगली व बाण दारुगोली जंगी सामान आहे. चाकरी करावयाची उमेद आहे. कित्येक ठाणीं घेत घेत नागमंगलपावेतो खासा स्वारी आली. पांच सा लक्षाचा मुलुक सुटला आणिक पांचसात ठाणीं चिकबालापूरपावेतो आहेत तीं सुटलीं म्हणजे चौदा पंधरा लक्षांचा मुलूख सुटेल. बेंगरूल व पटण मात्र राहील. हैदरनाइकाकडील सलुखाचे राजकारण आहे."§ हैदराचें पक्कें व पुरें पारिपत्य करावें असा पेशव्याचा मुख्य हेतु असल्याचें कलकत्तेकर इंग्रजांनाही ठाऊक होतें.† उलट पक्षीं म्हैसूरचें प्राचीन राज्य आपण घ्यावें असा माधवरावाचा बिलकूल विचार नव्हता; वास्तविक हैदरनें तें राज्य बळकावलें आहे सबब त्यास

§ पे. द. ३७. १९४. † Haidar Ali, N. K. Sinha, P. 157.

# मोती तलावाची लढाई ८-३-१७७१

## लष्करी डावपेच

७६ ७७
१४ १४
० कडूर
दोडबाळापूर ०
० देवरायदुर्ग
बाणावर ०
० तुमकूर
कडबा
तुरुविकिरें ०
० हेबूर
० भैरवदुर्ग
१३ १३
० उत्तरदुर्ग
बंगळूर ०
चेन्नरायपट्टण ०
० बेलूर
० सेव्हनरायदुर्ग
० नागमंगल
० मागडी
नरसिंगपूर ०
० चेनापट्टण
मेलकोटे ०
० मोतीतलाव (चिंकुर्ली)
० श्रीरंगपट्टण
त्रिंबकराव मामाचा मार्ग ··············→
हैदरअलीचा मार्ग ————→
मराठ्यांचे बिनीचे हल्ले +++++++++++++
१२ १२
७६ ७७

राज्यांतून काढून तें पुरातन हिंदुवंशास परत द्यावें असा प्रयत्न पेशव्यानें चालविला.

माधवराव कर्नाटकांत आल्यापासून हैदर घाबरून झाडींत शिरून बसला होता. त्याच्या तोंडावर गोपाळरावास ठेवून पेशवा श्रीरंगपट्टण प्रांतीं आला. मुलुख मारावा, ठाणीं घ्यावीं असा क्रम चालवून पेशवा एकसारखा पुढें चालला. ता. ११ फेब्रु० १७७० रोजीं बेंगरूळचा भैरव किल्ला हल्ला करून पेशव्यानें घेतला. ता. २७ फेब्रुवारीस हैदरानें बुधहाळजवळील गोपाळराव पटवर्धनाचे छावणीवर अचानक हल्ला केला. त्यासंबंधीं गोपाळराव लिहितो, "हैदरअली छ. २८ सवालीं रविवारीं अमावास्येस सडें सामान बारा तेरा हजार गाडदी व चार हजार फौजेचा अजमास व पंचवीस तोफा येणेंप्रमाणें छाप्यास आम्हांकडे आला. पहांटेच्या पांच घटका रात्रीस गोटाबाहेर उभा राहून गोळे व बाणांचा मार करूं लागला. अंबाऱ्या व नौबद मात्र लादलेली होती व वरकड घोड्यांवर जीन देखील नाहीं. आमच्या घोड्यांवर एक दुसऱ्यावर जीन होतें. त्याचा गोळा वाजतांच घोड्यावर बसोन मागें नौबत याप्रमाणें आघाडीस येऊन उभे राहिलों. चार साडेचार घटका तोफांचा व बाणांचा मार खाऊन उभे राहिलों. दिशा प्रकाश व्हावयाचे वेळेपर्यंत तसेच उभे राहिलों." या हल्ल्याचे वेळीं पटवर्धन मंडळींनीं विलक्षण शौर्य व चिकाटी प्रकट केली. यानंतर देवरायदुर्ग कोलार वगैरे ठाणीं पेशव्यानें घेतलीं. पुढें मराठ्यांनीं निजगलच्या किल्ल्यास वेढा दिला. ता. २९ एप्रिलच्या दिवशीं निजगलचे किल्ल्यावर हल्ला चढवीत असतां, "थोरले श्रीमंतांचे मागें नारायणराव उभे होते, त्यांच्या उजव्या मनगटास गोळी लागून जखम जाली. हाड व शिरा जायां जाल्या नाहींत. भगवंतें खैर केली." पुढें तो किल्ला पेशव्यानें जिंकला. इतकें होत आहे तों पर्जन्यकाळची चिंता उत्पन्न झाली. मुख्य ठिकाण बेंगरूळचा किल्ला काबीज केल्याशिवाय हैदराचा पाडाव होणार नव्हता. या स्वारींत तें काम झालेंच नाहीं.

आजपर्यंतचा या स्वारीचा आढावा घेणें झाल्यास म्हणावें लागतें, कीं या स्वारींत बहुतेक लढणें तुंगभद्रेच्या दक्षिणेस झालें. मराठ्यांनीं हैदरच्या राज्यापैकीं एक कोट उत्पन्नाचा मुलूख लुटून फस्त केला, कित्येक प्रांत ओसाड पाडले, किल्ले व शहरें काबीज केलीं व कांहीं खणून काढिलीं. हैदरची लाखों रयत नागवली, पुष्कळ लोक प्राणांस मुकले, परंतु हैदर तहास अनुकूल होईना.

या स्वारींत पेशव्यास अति दगदग पडली व पुण्यास परतावें असें त्यास वाटूं लागलें. पावसाळ्यांत कर्नाटकांतच छावणीस राहावें किंवा नाहीं याचा पेशव्यानें समस्त सरदारांशीं खल केला. त्या वेळीं मुराररावानें साफच सांगितलें कीं कर्नाटकांत छावणी केल्याशिवाय हैदराचा पाडाव होणार नाहीं. एखाद्या मातबर सरदाराच्या हाताखालीं छावणीस फौज ठेवून पेशव्यानें परत जावें व दसरा झाल्यावर मोठ्या तयारीसह पुनः कर्नाटकांत यावें, असा विचार पेशव्यास मान्य झाला. पुण्यास रघुनाथराव तुरुंगांत असला तरी हैदराशीं त्याचा पत्रव्यवहार चालू असून तो आणखी कोणतें लचांड उत्पन्न करील याचा नेम नव्हता. शिवाय पुण्याबाहेर अनेक दिवस काढल्यानें तेथें कारस्थानें होण्याचीही भीति उत्पन्न झाली. या सर्व गोष्टींचा विचार करून कर्नाटकांत लष्कर कायम ठेवावें आणि आपण पुण्यास जाऊन पावसाळ्यानंतर परत यावें हा बेत सर्वानुमतें कायम झाला. मात्र कर्नाटकचें काम नेटानें पुढें चालवील असा कोण नेमावा याची पुष्कळ भवति न भवति झाली. गोपाळराव पटवर्धन व त्रिंबकराव पेठे दोघेही आपापल्यापरी कर्ते होते, पण आपसांत त्यांची चुरस असून एक दुसऱ्याचे हुकमतींत वागण्यास खुषी नव्हता. त्रिंबकरावास विचारतां त्यानें कळविलें, "पोख्ती बेगमी करून द्यावी म्हणजे राहावयाचें अगाध तें काय आहे ! हैदराच्या पारिपत्यास मजला ठेवितां त्यापक्षीं सामान चांगलें असल्यास स्वरूप राहील." शेवटीं त्रिंबकरावाकडे पेशव्यानें सर्व कारभार सोंपिला आणि गोपाळराव व मुरारराव यांनीं त्याचे आज्ञेंत वागावें असें पेशव्यानें ठरवून दिलें. तेणेंकरून गोपाळराव थोडासा नाराज झाला असतां, त्याचा बाप गोविंदराव हरि यानें त्यास उपदेशपर पत्रें लिहून त्याची समजूत घातली. स्वभावभेदामुळें असे प्रकार सदैव घडणार. अशी सर्व व्यवस्था करून पेशवा १३ मे स. १७७० रोजीं स्वारींतून परत निघाला. ता. २५ ला सूर्यग्रहण पडलें त्या पर्वणीस कोप्पलजवळ निवृत्तिसंगमीं सुवर्णतुला झाली. पुढें ता. १३ जूनला तो पुण्यास पोंचला.*

जून १७७० पासून सन १७७२ च्या जून पावेतों दोन वर्षें कर्नाटकचा अपुरा कार्यभाग पुरा करण्यांत त्रिंबकराव पेठ्यानें शिकस्तीचा प्रयत्न केला. पेशवा परत गेला तेव्हां पर्जन्यकाल संपल्यावर पुनः आपण स्वतः येऊन हें काम

* पे. द. ३७. १७०, १९८, २००, २०५, २०७, २०९.

संपवावें असा त्याचा विचार होता. तदनुसार दसऱ्यासच बाहेर पडून उस्तवारी करीत तो निघाला व मिरजेपर्यंत आल्यावर त्याची प्रकृति इतकी बिघडली कीं तेथूनच परत जाणें त्याला भाग पडलें. त्यामुळें त्यापुढें कर्नाटकांतील मोहिमेची सर्व जबाबदारी त्रिंबकरावावर पडून त्यानें दीर्घकाल पावेतों पूर्ववत् हैदरशीं जोरांत युद्ध चालविलें. उभयपक्षीं एकमेकांवर प्रहार करण्याचे डावपेच इतके झाले कीं त्यांची हकीकत लिहिण्यास स्वतंत्र ग्रंथ पाहिजे. समस्त म्हैसूर राज्यांत हंगामा चालला. श्रीरंगपट्टणापासून उत्तरेस बिदनूर, तेथून पूर्वेस थेट शिरें व त्यापुढ गुर्रमकोंडा व पूर्वबाजूनें परत वर्तुळाकार मर्यादेनें श्रीरंगपट्टण असा हा विस्तृत प्रदेश दोन वर्षांच्या धिंगाण्यांत उच्छिन्न झाला. त्याचप्रमाणें अनेक भीषण संग्रामही त्यांत घडून आले. सुरुवातीसच सन १७७० च्या जून महिन्यांत गोपाळरावानें चिक्कबाळापुरजवळ हैदराशीं गांठ घातली व श्रीमंतांच्या पुण्यें-करून मोठें यश मिळविलें.

हैदरचा मुख्य तळ श्रीरंगपट्टणावर होता, तेथून तो आपल्या ठिकठिकाणच्या हस्तकांचा पाठपुरावा करून जिकडे मराठ्यांचा जोर दिसे तिकडे त्यांजवर चढाई करी. मराठ्यांच्या फौजा भारी असल्यामुळें त्यांच्याशीं मैदानांत उघड सामना करण्याचें टाळून स्वतः तो तसाच प्रसंग आला तर बिदनूरच्या झाडींत लपून बचाव करी. म्हणजे तेथून त्यास हुसकून काढल्याशिवाय युद्धाचा पार येईना. तहाचें बोलणें तर त्यानें सारखें चालू ठेवलें आणि पुढें जेव्हां पेशवा मिरजेहून परत पुण्यास गेल्याची बातमी आली, तेव्हां तर त्यास आणखी धीर येऊन तो नुसता कालहरण करीत राहिला. या कारणास्तव तडकाफडकी युद्धाचा निकाल लावणें त्रिंबकरावास शक्य झालें नाहीं. त्याजजवळ मुख्य सहाय्यक गोपाळराव पटवर्धन व मुरारराव घोरपडे असून शिवाय आनंदराव रास्ते, आनंदराव गोपाळ सुपेकर, बाबूराव हरि व सखाराम हरि गुप्ते, महंमद इसफ गार्दी असे अनेक कल्पक योद्धे मनापासून झटणारे होते. युद्ध चालू असतांच आपल्या या सहायकांच्या मदतीनें त्रिंबकरावानें हैदरास मोतीतलावाच्या लढाईंत इतका मार दिला कीं जीव घेऊन त्याला पळून जाण्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. त्रिंबकरावानें आपली छावणी शिऱ्याजवळ ठेविली. त्या ठिकाणीं मुकुंद श्रीपत अधिकारी होता. पेशव्यानें परत जातांना ह्याच्या जागीं महिमाजी शिंदे याची नेमणूक केली. पुढें हा महिमाजी हैदरशीं लढतांना मारला गेला. अशा प्रकारें

त्रिंबकरावमामानें म्हैसूरकरांशीं युद्ध जोमानें चालवून आपल्या धन्यास यश व कीर्ति मिळवून दिली. त्या प्रसंगांचीं वर्णनें आतां सांगूं.

**७. गुर्रमकोंड्यावर चढाई** — त्रिंबकराव मामानें प्रसंग ओळखून प्रथमच परिस्थितीचा विचार करण्यासाठीं गोपाळराव पटवर्धन, मुरारराव घोरपडे, आनंदराव गोपाळ, आनंदराव रास्ते वगैरे मंडळीशीं एकत्र चर्चा केली व युद्धाचें धोरण ठरविलें. शिऱ्याचा बंदोबस्त नीट केल्यावर त्रिंबकरावानें आपला मोर्चा गुर्रमकोंड्याकडे वळविला. पूर्वेच्या बाजूस कडप्याजवळ हा गुर्रमकोंड्याचा बळकट किल्ला असून हैदरचा शूर सरदार मीर रेझा ह्याची तेथें जागीर होती. सैदू मिया हा त्याचा भाऊ त्या जागिरीच्या संरक्षणास होता. हा मीर रेझा प्रसंग पडेल तसें वागून हैदरचें साह्य करी. कपट व हिकमत ह्यांत तो निपुण होता. पूर्वी तो पेशव्याचे नोकरींत होताच, आतां पुनः परत हैदरच्या बाजूनें तो मराठ्यांचा उच्छेद करूं लागला. गुर्रमकोंड्यावर त्रिंबकराव स्वारी करणार हें ऐकून तो मीर मोठ्या फिकिरींत पडला. सन १७७० च्या ऑगस्टांत त्रिंबकरावानें गुर्रमकोंड्यावर भर पावसाळ्यांत चाल केली. त्यामुळें सैदू मिया घाबरून गेला. हैदरअली दूर श्रीरंगपट्टणास असल्यानें व मराठ्यांनीं सर्व वाटा रोखून धरल्यानें त्यास धन्याकडून मदत मिळण्याची शक्यता नव्हती. किल्ल्यावर तीनचार हजार गारदी, दोनतीन हत्ती व अन्न, गवत व दारूगोळा यांचा थोडाबहुत साठा होता. एवढ्यावर सैदू मियानें शेवटपर्यंत नेटानें किल्ला लढविण्याचें ठरविलें. त्रिंबकरावानें प्रथमतः पेठ जिंकून खंदकापर्यंत आपला मोर्चा नेऊन किल्ल्यास वेढा दिला. निरनिराळ्या जागीं सुरुंग लावून किल्ल्याचे तट फोडण्याचेंही प्रयत्न त्यानें चालविले. उत्तरोत्तर किल्ल्यावरील परिस्थिति फारच बिकट होत गेली. आंतील लोक गडबडले, गुरें व घोडीं कापून खाऊं लागले. ता. २ ऑक्टोबर १७७० रोजीं किल्ल्याच्या एका बुरुजाला लावलेलें सुरुंग उडालें व मोठें भगदाड पडून मराठे एकदम आंत शिरले. इतरही कांहीं सुरुंग उडाले. तेव्हां आंतील लोक टेकीस येऊन तहाच्या योजनेस लागले. मुरारराव घोरपडे याचे मार्फतीनें करार ठरला कीं, "सर्व वस्त्रभावासुद्धां सांगूं ते स्थलीं पोंहचाहून द्यावें." या अटी मान्य झाल्यावर ता. १९ ऑक्टोबर रोजीं गुर्रमकोंडा मराठ्यांचे कबजांत येऊन त्यांचें निशाण वर फडकूं लागलें. गुर्रमकोंड्याचा हा भीषण संग्राम सुमारें दोन महिने चालला. या परिणामानें अखेर हैदरला मोठा धसका बसला.

गुर्रमकोंड्याचा वेढा चालू असतांच त्रिंबकराव मामानें गोपाळराव पटवर्धनास श्रीरंगपट्टणहून येणारी मदत मारून ती वाट बंद करण्याच्या कामगिरीवर नेमलें होतें. कोलार जिल्ह्यांत राहून गोपाळराव ही कामगिरी करीत असतां चंद्रोजी जाधव व बाळाजी भीमराव यांस पळ काढावा लागला. गोपाळरावानें त्यांचा पाठलाग केला व आग्रामजवळ संग्राम होऊन चंद्रोजी व बाळाजी पाडाव आले. 'तमाम गाडदी व प्यादे याणीं हत्यारें टाकून तोंडांत तृण धरिलें त्यांस मारलें नाहीं, हत्यारें कडब्याप्रमाणें भारे बांधून त्यांचेच डोईवर देऊन लोकांनीं आणले.' गोपाळरावास मोठें यश मिळालें. त्यानतर गोपाळरावानें कोलार प्रांतांतलीं अनेक ठाणीं कावीज केलीं.

अशा या विजयांनीं मराठ्यांची प्रतिष्ठा वाढली व त्रिंबकराव पेठ्याची वाहवा होऊं लागली. मामा वृद्ध व अनुभवी मुत्सद्दी असून राज्यहिताविषयीं सदैव दक्ष होता. त्याची हिंमतही अलोट होती. गुर्रमकोंड्याचा विजय हें सर्वांच्या मदतीनें झालेल्या कार्याचेंच फळ होय असें तो मानीत असे. परंतु पटवर्धनमंडळी म्हणत कीं 'गुर्रमकोंडा सर केल्यानें मामा फारच हावभरी झाले आहेत. कोणी माणूस खातरेंत नाहीं. गुर्रमकोंडा फत्ते झाला त्यामुळें मामास गर्व होऊन मनुष्य तृणप्राय झालें आहे.' या पटवर्धनी वर्णनांत पुष्कळसा मत्सर दिसतो. त्रिंबकराव कडक शिस्तीचा माणूस होता म्हणून तो लोकांस कडक वाटे. वस्तुतः तो स्वतः निःस्वार्थी, प्रामाणिक, निष्ठावंत व कर्तव्यतत्पर होता. त्याच्या वर्तनाचा अर्थ निराळ्या तऱ्हेनें लावून स्वार्थी लोक त्यास तुसडा व करडा म्हणत. सर्वांनीं एकजुटीनें कार्य करून हातीं घेतलेलें काम यशस्वी करून धन्याची शाबासकी मिळवावी असें त्याचें वर्तन होतें. परंतु फुटीच्या भावनेनें व स्वार्थी वृत्तीनें वागणारे लोक त्यास मनोमय मदत करीत नसत. त्यामुळें उद्वेगानें तो म्हणे, "कसेंही संकट असो, परंतु सर्वांनीं अधिकोत्तर मेहनत एक-दिल होऊन करावी. इंग्रजांची मदत न झाल्यास खांद्यावर भाला घालून तमाम मुलख उलथा पालथा घालूं. घांटाखालींही फौजा उतरून तोही प्रांत मारून ताराज करूं. हैदर कोणीकडे म्हणून धावेल! हाच विचार आम्हां सर्वांस या कालीं उत्तम," (खरे १०७५). माधवराव पेशव्यानें मात्र त्याच्या कष्टमेहनतीचें कौतुक करतांना लिहिलें, "यंदां माझे प्रकृतीस स्वस्थ नाहीं याजमुळें मनुष्यांस फार हिसका बसला यास माझा इलाज काय? त्याहीमध्यें मामा (कर्नाटकांत

छावणीस ) राहिले येणेंकरून फार सांभाळलें. त्यांच्या एक दोन गोष्टी फारच चांगल्या आहेत व पुढेंही त्यांवरच काम आहे." यावरून पेशव्याचा त्रिंबकरावावर केवढा इतबार होता हें लक्षांत येतें.

गुर्रमकोंड्याच्या विजयानंतर कोणतें काम हातीं घ्यावें या विचारांत त्रिंबकराव असतां पुण्यास माधवराव स्वस्थ नव्हता. परत आल्यापासूनच हैदरच्या संपूर्ण पारिपत्याचा विचार त्याच्या मनांत घोळत होता. पावसाळा संपल्यावर आपल्याला कर्नाटकांत जावयाचें आहे असें तो म्हणत होता. मोठ्या तोफा ओतण्याचा कारखाना त्यानें बागलकोटास चालू केला, पुण्यास बंदुका तयार करण्यास सुरुवात केली, सैन्यांत नवे नवे लोक घेतले, परकीय गोरे तोफची व गारदी नेमले, बिदनूरच्या झाडींत हैदर नेहमीं लपून बसतो म्हणून ती झाडी तोडून सर्व मोकळें मैदान करण्याच्या इच्छेनें रानतोडे लोकांच्या जमाती मुद्दाम चाकरीस ठेविल्या, विजयदुर्गचे धुळप, वाडीकर सावंत, त्रिंबक सूर्याजी यांजला सौंध्याच्या बाजूनें हैदरावर रवाना केलें. यावरून हैदरचें पारिपत्य करण्याचा त्याला ध्यासच एकसारखा लागला होता यांत संशय नाहीं. 'यवनास जरबेंत आणून पुरतें पारिपत्य करून देवब्राह्मणांची स्थापना करावी, संस्थानें सोडवावीं हाच भाव आहे. दुसरा प्रकार सर्वथैव नाहीं,' असें तो लिही. 'हैदरखानाचा मनसबा सरळ रीतीनें लवकर करावा तर हैदरखान सरळ माणूस नव्हे. तेव्हां चिंता काय ? चहू महिन्यांनीं मसलत शेवटास जाणें ते आठ महिन्यांत जाईल. हैदरखानाची मसलत दीर्घसूत्रानें केल्यास उत्तम परिणाम आहे.' 'या शत्रूचें पारिपत्य यथास्थित केल्याशिवाय चैन पडणार नाहीं.' असेंही तो त्रिंबकरावास कळवी. त्यावरून 'श्रीमंतांच्या मनांत मळमळित सल्ला करावयाचा नाहीं, पुरतें पारिपत्य करावें' असें त्रिंबकरावही सर्वांस परोपरीनें सांगे. हें उद्दिष्ट मनांत ठेवूनच माधवरावाची पुण्यास तयारी चालली होती. त्याची बित्तंबातमी काढण्यासाठीं, पण वरकरणी तहाचीं बोलणीं करण्यासाठीं, हैदरानें आप्पाजी-रामास पेशव्याकडे पाठविलें. तें ओळखून पेशव्यानें त्याला धुडकावून दिलें व दसरा झाल्यावर त्रिंबकराव मामानें गुर्रमकोंडा काबीज केला त्याच दिवशीं, कार्तिक शुद्ध प्रतिपदा, ता. १९ ऑक्टोबर १७७० रोजीं पुणें सोडून पेशव्यानें कर्नाटकांत जाण्यासाठीं मोठ्या सैन्यासह कूच केलें. मिरजेजवळ कमलपुरापर्यंत तो कसाबसा आला. परंतु आजारपणामुळें त्याला पुढें जाणें अशक्य होऊन तो

परत फिरला तो ता. २० जानेवारीस पुण्यास पोचला. मात्र आप्पा बळवंत मेहेंदळे यास दहा हजार फौजेसह त्रिंबकराव पेठ्याच्या मदतीस त्यानें पाठवून दिलें. पेशवा परत गेल्यानें त्रिंबकरावाची जबाबदारी वाढली.

**८. गोपाळराव पटवर्धनाचा मृत्यु**—गुर्रमकोंड्याची व्यवस्था लावून पेठे बाहेर निघाला तो कोलार मूळबागलच्या सीमेवर तळ देऊन बसला आणि हैदराच्या पाडावाकरितां इंग्रजांची मदत मिळविण्याच्या खटपटीस लागला. पण ती मदत मिळाली नाहीं तो प्रकार अन्यत्र सांगितला आहे. इंग्रजांचा नाद सोडून तो बिदनूरच्या बाजूस हैदरावर जाण्याच्या मार्गाला निघाला. वाटेंत देवलहळ्ळी, चिक्कबाळापूर, नंदीगड, गणेशगड वगैरे ठाणीं त्यानें तपासलीं. तों त्याला बातमी आली कीं हैदरअली श्रीरंगपट्टण सोडून होसकोट्याच्या दिशेनें चालून येत आहे. लगेच त्यानें गोपाळरावास कळविलें, "तुम्ही दुसरा विचार न करितां रायदुर्गास जावें. वेळ नाजूक आहे. हा प्रसंग चुकल्यास आजपर्यंतचे श्रम व्यर्थ होऊन सर्वांचे पदरीं वेडेपण येणार. हें पत्र दहा पत्रांचे जागीं मानावें." परंतु या वेळीं गोपाळरावाची परिस्थिति बिकट बनली होती. पैशाची अडचण भागविण्यासाठीं तो पेठ्याचा हुकूम न मानतां अदवानी प्रांतांत गेला, आणि त्याच वेळीं प्रकृति बिघडल्यामुळें त्यास लगोलग परत मिरजेस जाणें भाग पडलें. आपण आतां वांचत नाहीं असें वाटून त्यानें बंधु वामनराव यास पत्र लिहून लष्करचे व्यवस्थेस बोलावलें, पण वामनराव येण्यापूर्वीच गोपाळराव परत निघालां तो मिरजेस घरीं पोंचतांच तिसरे दिवशीं ता. ११ जानेवारी १७७१ रोजीं मरण पावला. या बनावानें त्रिंबकराव, मुरारराव वगैरे स्वारींतले सरदार व पेशव्या सुद्धां सर्व पुण्याची मंडळी अत्यंत श्रमी झाली. पटवर्धन घराण्यांतला मोठा कर्ता पुरुष गेला. वृद्ध वडील मातुश्रींच्या दुःखास पारावार नाहीं. तेही पुढें अल्पावकाशांत गेले. सर्व ब्राह्मणांमध्यें गोपाळराव मुकुटमणि होते. गोपाळरावाचा स्वभाव आनंदी व मनमोकळा परंतु मानी व तल्लख होता. हाताखालच्या लोकांचें मनोधारण तो उत्कृष्ट करीत असे. सर्वांना त्याचा धाक वाटे. पेशव्याचा तर तो पूर्ण विश्वासांतला नाजूक प्रसंगांत शरीर सांभाळणारा होता. बातमी समजतांच पेशव्यानें चार दिवस चौघडे व दरबार मना केले. वय त्याचें पन्नाशीच्या जवळ होतें. हा मृत्यु म्हणजे एक राष्ट्रीय हानि होय असेंच सर्वांस वाटलें. त्याचा भाऊ वामनराव लगेच स्वारींत

येऊन कामावर दाखल झाला, पण दम्याच्या व्यथेमुळें तो प्रकृतीनें नाजूक असून गोपाळरावाची तडफ त्याला नव्हती. त्रिंबकरावाचा हा एक मोठा साह्यकर्ता गेल्यानें कर्नाटकच्या कामगिरीस वैगुण्य प्राप्त झालें यांत संशय नाहीं.

९. **परस्परांचे डावपेच** — माधवराव पेशवा परत पुण्यास गेला व आप्पा बळवंताच्या नेतृत्वाखालीं दहा हजार फौज त्रिंबकरावास मिळण्यास येत आहे अशी बातमी हैदरास कळल्यावरून, तो पट्टणाहून निघाला व दोन्ही फौजा मिळण्यापूर्वींच आप्पा बळवंताच्या सैन्यास गांठून त्याचा फन्ना उडवावा असा त्यानें बेत केला. परंतु त्याचा हा बेत पार न पडतां टुमकूर येथें सन १७७१ च्या फाल्गुनांत दोनही फौजा एकत्र मिळाल्या. त्यानंतर बिदनूरच्या रोखानें मराठी फौजा निघाल्या. बिदनुरावर स्वारी करून तो प्रांत जिंकून घ्यावा असा पेशव्यानें त्रिंबकरावास अनेक वेळां सल्ला दिला होता. तो प्रांत म्हणजे हैदरचा अत्यंत आवडता. बिदनूरला तो आपलें 'स्वराज्य' मानीत असे. बिदनूरच्या जंगलाच्या आश्रयानें त्याला स्वतःचा बचाव करतां येई. मराठे बिदनुरावर चालून येतात हें कळल्यावर त्याच्यानें स्वस्थ बसवेना. श्रीरंगपट्टण सोडून देऊन तो मराठ्यांना अडविण्यासाठीं बाहेर पडला. त्या वेळीं त्याच्याजवळ पंचवीस हजार गारदी, आठ हजार घोडेस्वार व पंचेचाळीस लहान मोठ्या तोफा होत्या. टुमकूरहून त्रिंबकराव निघाल्यानंतर त्यानें बेलूर, बाणावर, गर्दनगड वगैरे ठाणीं जिंकून घेतलीं व तो बिदनूरच्या रोखानें वाट चालूं लागला. त्याच वेळीं त्याला कळलें कीं मोठ्या फौजेसह हैदरअली मराठ्यांचा मार्ग अडविण्याच्या हेतूनें चेनापट्टणच्या रोखानें येत आहे. बिदनूरच्या झाडींत टोळ्या टोळ्यांनीं जाणाऱ्या मराठ्यांच्या सैनिकांस छापे घालून हैराण करण्याचा त्याचा पहिला बेत होता; पण तो आतां बदलून त्यानें त्रिंबकरावाशीं उघड्या मैदानावरच दोन हात करण्याचा घाट घातला. बिदनूरचा आपला मार्ग अडविण्यासाटीं हैदर बाहेर पडल्याचें वृत्त त्रिंबकरावाला समजतांच, सर्वांचा सल्ला घेऊन त्यानें बिदनूरची चाल रद्द केली व हैदरअलीला उघड्यावर गांठून त्याचा फन्ना उडविण्याचें ठरविलें. हैदरअलीचा ठावठिकाणा काढण्याच्या हेतूनें मामानें सखाराम हरि गुप्ते या धाडशी सरदारास हजार दोन हजार लोकांसह पाठविलें. लगेच मेलकोट्याजवळ असलेल्या हैदरच्या छावणीवर मोठ्या धिटाईनें तीनशें लोकांसह गुप्ते चालून गेला. तेथें त्यानें 'हैदरखानाच्या लष्करापर्यंत जाऊन

कही लुटली, उंटें व तट्टें व पांच सात हजार बकरीं वळवून गोटाच्या आसपास कोसाच्या अंतरें भाल्यांस पासोड्या बांधोन मातबर फौज आली अशी दिखाई देऊन, आनंदराव तोफखाने व भवानजी जाधव यांस वाट तीट पहावयास पाठविलें.' सखाराम हरीच्या या अद्भुत पराक्रमाची हकीकत अजरामर बनली आहे. लगेच नागमंडळास जाऊन तें ठाणें त्यानें लुटून फस्त केलें. ही बातमी हैदरास कळतांच त्यानें त्याचा प्रतिकार करण्याची शिकस्त केली. त्याला चुकवून सखाराम हरि विद्युद्गतीनें बेलुरास पोंचला आणि हैदराच्या हालचालींची बातमी पेशव्यास पोंचवून त्यास त्वरेनें मेलकोट्यावर बोलाविलें. दरम्यान वामनराव पटवर्धनानें हैदरची कही मारून अनेक घोडे, उंट व बैल पळविले.

सखाराम हरीचा निरोप येतांच टुमकुराहून मामानें आपला मुक्काम हलविला व तो हेब्बूरला आला. त्याच वेळीं हैदर मेलकोट्याहून मागडीस गेला. त्रिंबकराव व हैदर यांच्यामध्यें त्या वेळीं फक्त सोळा मैलांचें अंतर होतें. आपल्या हालचाली मामास न कळवितां त्याच्यावर अचानक हल्ला करून त्याचा गोट लुटावा असा हैदरचा बेत होता. परंतु त्रिंबकरावाच्या सावधगिरीमुळें त्याचा तो बेत साध्य झाला नाहीं. तेव्हां हैदरनें एक निराळाच प्रयोग करण्याचें ठरविलें. एके दिवशीं त्रिंबकरावाच्या छावणीच्या रोखानें सहा मैल हैदर चालून गेला व दोन हजार बैलांच्या शिंगांस जळते पोत बांधून त्यांस त्यानें मराठ्यांच्या सैन्याच्या दिशेनें पिटाळलें. हें हैदरचें सैन्य आहे असें समजून मराठ्यांच्या फौजा त्याच्या मागें लागतील व त्यामुळें त्यांच्या छावणीवर छापा घालण्यास संधि सांपडेल असा हैदरचा बेत होता. परंतु हेरांकरवीं हा बेत त्रिंबकरावाला आधींच समजल्यानें हैदरचा हाही डाव फसला. तेव्हां त्यानें मागडीच्या रानाचा आश्रय घेतला. त्याच वेळीं मामानें हेब्बूर सोडलें व तो तुरुविकिरे येथें आला. हें समजतांच हैदरही मागडीच्या रानांतून बाहेर पडला व मेलकोट्याच्या डोंगरांचा आश्रय घेऊन बसला. यासंबंधानें त्रिंबकराव लिहितो, "मातबर फौज व तोफखाना जमा झाला आहे तर अतःपर मातबर कार्य करावें. बिदनूर प्रांतीं फौज सुद्धां जाऊन महसरा घ्यावा. दर्यांतून आरमार रवाना केलें आहे, खुष्कीनें विसाजी केशव गेले आहेत, दुरोख शह पडल्यास बिदनूर हस्तगत होईल. हैदराची कंबर मोडल्या अर्थें स्वामींची आज्ञा येत आहे. आज्ञेप्रमाणें

टुमकुराहून हेब्बुरावर आलों, तों हैदरखान सात आठ हजार फौज, पंचेचाळीस तोफा, पंधरा हजार गाडदी, फिरंगी, शिवाय कर्नाटकी प्यादे घेऊन चोरीछापीनें सरकारच्या फौजेवर तयार होऊन तीन कोस मागडीवर आला. मायावी कर्तृत्व केलें. बातमी पोचतांच आम्ही गोटाबाहेर उभे राहिलों. हें त्यास कळतांच तो (मागडीच्या) रानांत आवळून राहिला. तो बिदनूरच्या झाडींत शिरल्यावर इलाज चालणार नाहीं म्हणून आम्ही बिदनूरचा रोख सोडून तुरुविकिऱ्यावर आलों. तों हैदर मेलकोटें देवाचें स्थल चौफेर बिकट जागा त्याच्या आश्रयास येऊन राहिला." यावरून मराठ्यांस बिदनूरच्या प्रांतांत जाऊं द्यावयाचें नाहीं या हेतूनें श्रीरंगपट्टणाहून हैदर बाहेर पडला, तो त्याचा हेतु अखेरीस साध्य झाला असें म्हणावेंच लागतें. उलट तो बाहेर पडावा व उघड्या मैदानांत त्याला गांठावा अशी जी त्रिंबकरावाची इच्छा होती तीही सफल झाली असें म्हणतां येईल.

**१०. मोती तलावची लढाई**—मेलकोट्याच्या आजूबाजूस सर्वत्र उंचच उंच डोंगर असल्यानें ती जागा अत्यंत बिकट होती. पूर्व व दक्षिण दिशांच्या बाजूनें तेथें प्रवेश मिळणें दुरापास्त होतें. फक्त पश्चिमेच्या बाजूनें एक अत्यंत अरुंद अशी खिंड असून तेथून मोठ्या कष्टानें जातां येणें शक्य होतें. येथून दक्षिणेस श्रीरंगपट्टण वीस मैलांवर होतें. पूर्वेकडून आपल्यावर हल्ला होणें अशक्य आहे अशी हैदरची कल्पना होती. त्यामुळें अशा अवघड व बिकट जागीं आपण आलों कीं मराठ्यांची फौजही आपला माग काढीत तेथें येईल व आपल्या फौजा मराठ्यांचा संपूर्ण उच्छेद करतील, म्हणजे आपल्याला मोठ्या विजयानंदानें श्रीरंगपट्टणला जातां येईल असा मनाशीं बेत करीत हैदर मेलकोट्याच्या डोंगरी आश्रयास येऊन राहिला. खरें पाहतां हैदरच्या दृष्टीनेंही ही जागा अत्यंत धोक्याची होती. बाहेर पडावयास एकच खिंड असल्यानें शत्रूनें ती अडविली तर हैदर आंतल्या आंत अडकून त्याच्या सैन्याचा फन्ना होण्यास फारसा अवसर नव्हता; आणि झालेंही तसेंच. हैदरच्या कल्पनेप्रमाणें त्रिंबकरावानें पश्चिमेच्या बाजूच्या खिंडीनें न येतां पूर्वेच्या बाजूनें तो आंत घुसला. त्याच्यापूर्वीच पेठ्यानें कृष्णराव बळवंत, सखाराम हरि, भवानजी वाघ वगैरे आपल्या भरवशाच्या सरदारांस शत्रूवर हल्ला करण्यास पाठविलें. त्यांनीं म्हैसुरी लष्कराच्या पाठीमागच्या भागावर हल्ला करून त्यांस आपल्या गोटांत पिटाळलें. त्याच वेळीं हैदरच्या लष्करानेंही उलट

हल्ला केला ; तेव्हां मराठ्यांनीं त्याचे तीनशें घोडे पकडले. मात्र या झटापटींत त्यांचे तीसचाळीस घोडे हैदरनें काबीज केले, त्यांचे पन्नास ते शंभर लोक जखमी अगर मृत झाले व सखाराम हरीच्या डोक्यास जखम लागली.

लगेच त्रिंबकराव पूर्वबाजूच्या खिंडींतून लढाईच्या जागीं आला. त्यानें सर्व बाजूंचें बारकाईनें निरीक्षण केलें, त्या वेळीं एकंदर क्षेत्राचा बिकटपणा त्याच्या नजरेंत भरला. लगेच त्यानें पश्चिमेच्या खिंडीच्या तोंडावर वामनराव पटवर्धन, आनंदराव गोपाळ सुपेकर, नरसिंगराव धायगुडे यांस सैन्यासह ठेवून त्या बाजूनें हैदरनें श्रीरंगपट्टणला पळून जाऊं नये अशी दक्षता घेतली. तो स्वतः पूर्वबाजूस होताच. त्यानें तेथील एका अलग व उंच अशा टेकाडावर आपला तोफखाना ठेवून दिला. दक्षिण व उत्तर या दिशांस उंच डोंगर व अरण्य असल्यामुळें तेथून पलीकडे जाणें अगदींच अशक्य होतें. मराठ्यांच्या लष्कराच्या मांडणीमुळें हैदरअली त्या अवघड जागीं कोंडला गेला व त्याला त्या कोंडींतून बाहेर पडणें अशक्य झालें. ता. ६ मार्चला सकाळीं मराठ्यांच्या तोफांनीं हैदरच्या लष्करावर आग सोडण्यास सुरुवात केली. हैदराचा तोफखानाही सुरू झाला ; परंतु त्याच्या तोफा लहान असल्यानें त्यांचा मारा लांब पोचेना, त्यामुळें त्याचेंच जास्त नुकसान होऊं लागलें. ही गोष्ट लक्षांत येतांच हैदरानें आपल्या लष्करास डोंगराळ भागांत जाण्यास सांगितलें. तेव्हां त्रिंबकरावानेंही त्यांच्यावर बाण व जेजाला यांचा हल्ला करण्यास सुरुवात केली, त्यामुळें हैदराच्या लष्कराची अतीव हानि झाली, त्यास उलट हल्लाही करतां येणें अशक्य होऊन मराठ्यांच्या अग्निवर्षावास मुकाट्यानें तोंड देऊन तो सहन करावा लागला. ता. ६ मार्चच्या रात्रीपर्यंत ही स्थिति होती. त्या स्थितींत आपण राहिलों तर आपला व आपल्या लष्कराचा संहार झाल्याशिवाय राहाणार नाहीं अशी भीति वाटून त्या रात्रीं ९ नंतर तेथून कृष्णपक्षांतील रात्रीच्या अंधाराचा फायदा घेण्याचें ठरवून अत्यंत गुप्तपणें तो पट्टणच्या दिशेनें दक्षिणेकडील खिंडींतून बाहेर पडूं लागला.

या प्रसंगाचें त्रिंबकरावाचें वर्णन मार्मिक आहे. "तों आम्हाकडे बातमी नाहीं. वामनराव वगैरे सरदार पश्चिमेकडे होते ती वाट चुकाऊन दक्षिणेकडे खिंड होती त्या मार्गें हैदर पटणास चालिला. डोंगरावर सरकारच्या चौक्या होत्या त्यांस हैदरखानाचे तलावर सामसूम पाहून हैदरखान गेला हे बातमी घेऊन सरकारचीं माणसें आलीं. परंतु खरें लटकें न कले. कड्डूर बाणावरचे वाटेनें बिदनूरच्या रोखे गेला किंवा पटणच्यामागें गेला हे तथ्य न कले. तेव्हां मेलकोटे डावे टाकून

कडूरबाणावरच्या मार्गाकडे काही फौज व पटणचे मार्गे कृष्णराव ( मेहेंदळे ) फौजसुद्धां पुढें मध्यरात्रीस रवाना केले. इतक्यांत हैदरखान तळ सोडून कोस दीड कोस चालिला. त्यांतून त्याचे लष्कराचे दोघे तुरक स्वार पलोन आले, त्यांणीं बातमी सांगितली कीं हैदरखान पटणाच्या मार्गे चालिला. त्याजवरून आम्ही तेच समई नगारा करून फौजसुधा तयार होऊन तोफा बराबर घ्यावयाची तयारी करऊन पटणच्या मार्गे चालिलो. त्यास पटणच्या वाटेवर छबिना होता त्याची हैदरखानाची गाठ पडिली. तेव्हा त्याणी आम्हाकडे व वामनराव गोविंद याजकडे बातमी पोहोचाविली. त्यांस वर्तमान कलतांच तेही तयार होऊन तिकडून येऊन पोहचले. कृष्णराव पुढें फौजसुधा रवाना केले तेही जाऊन पोहचले. चार घटका रात्र असता लढाई सुरू जाहाली, तो त्याणी तोफा चौफेर पसरून गाडदी, फिरंगी, बारवाले याचे बुरुज बांधून मोठे कवायेतीने लढत लढत पटणच्या मार्गे चालि़ला. तोफा व बाण व फिरंगी यांची मारगिरी येकसतत होत होती ते लिहितां येत नाहीं. तों आम्ही सूर्योदई छ. १९ जिलकादी ( ता. ७ मार्च १७७१ ) फौजसुधा पोहचलो. चौफेर फौजा घातल्या, परंतु त्याचे मारगिरीपुढें घोडे हत्ती पुढें तोंड न करीत. ते समई तोफा येऊन पोहचल्या नाहींत, याजमुळें काही उपाये न चाले. पटणापासून तीन कोसांवर अलीकडे मोतीतले आहे याजवर ( हैदर ) आला, तों आम्ही त्याचे डावे बाजूस पाणी धरून चालत होतां. हैदरखान माथ्यावरून चालत होता. पिछाडीस काही हुजरात व उभयेता रास्ते व हिंदुराव सेनापति यांची फौज व दौलतराव घोरपडे याचे पुत्र आनंदराव ऐसे होते. उजवे बाजूस वामनराव गोविंद व आनंदराव गोपाळ व धायेगुडे व गाईकवाडाचें पथक होतें. इतक्यांत कृष्णराव माधव याणी कस्त करून जिलेबीच्या दोन तोफा घेऊन येऊन पोहचले. त्या तोफा सुरू केल्या तों मागाहून दुसऱ्या दोन तोफा येऊन पोहचल्या. त्यानंतर तोफांची व बाणांची मारगिरी केली. गोले त्याच्या लस्करांत पडतांच लस्कर जमून चालत होते ते गलबलून कांहीं अंतर पडिले. थोडेसे तोंड लाविलें इतका अवसर पाहून स्वामींचें नांव घेऊन निशाण चालविलें. तों हुजरात पथके जलद निशाणाजवळ येऊन पोहचले. ते समई वामनराव गोविंद व आनंदराव व गणपतराव रास्ते व आनंदराव गोपाळ व धायेगुडे व गायकवाडाचे पथक व हिंदुराव सेनापति यांजकडील खंडेराव घोरपडे व मालोजीराव घोरपडे व दौलतराव घोरपडे यांचे पुत्र आनंदराव घोरपडे व कडपेकर याजकडील महिपतराव मल्हार सारे

निकड करून घोडे चालविले. त्यास हैदरखान पुढे आघाडीस चालिला होता, पिछाडीस तोफा व गाडदी फिरंग्यांचे बुरुज बांधून चालत होता; ते उधळून मारीत मारीत, हैदरखानानी मोतीतल्यासमीप डोंगर होता त्याचा आश्रये करून डोंगरावर पाच सात हजार माणसानिशी सडा जीव घेऊन चढला. तमाम त्याची फौज मारून गारत केली. मोठी लढाई जाहाली. राव सेनापति यांजकडे तोफा आल्या त्यासुधा चालीस पंचेतालीस तोफा व बीस पंचवीस हती, सात आठ हजार घोडे व खजाना जवाहीर व जरी निशाणे हौदे व अंबारी, साहेब नौबत पाडाव आली. सारी सलतनत लुटून फौज मारून ताराज केली. हजार दोन हजार मारून कापून टाकले. हैदरखान जीव मात्र घेऊन डोंगरावर चढला. तेथूनही येक वख्त चालून आला. तेव्हां मारीत मारीत डोंगरावर लाविला. उपाये न चाले तेव्हां डोंगरावर चढला. त्याजवर आम्ही इकडील बंदोबस्त राखून दोन हजार फौज घेऊन जलद डोंगराखालीं जाऊन पोहचलो. इतक्यास च्यार घटकाचा आवकाश पडिला, त्याजमुले हैदरखांनीं कलरूचें(?) सोंग घेऊन पाई उतारा अथवा येक घोड्यानीं अगोधर पटणास गेला. डोंगरावर लोक व सरदार होते त्यानी नामुरादीनें कौल मागितला, त्याजवरून कौल देऊन हातेर वगैरे घेऊन जिवानसीमात्र सोडून दिल्हे. लालामिया व मीर रेजा व लाला बक्षी वगैरे मोठे मोठे पाच सात सरदार पाडाव करून आणिले व कितेक लढाईत ठार जाले. वरकड लोकांत हैदरखान पाहावा तो वोलखी माणसे घालून चौकसी केली, परंतु न सापडला. हजारो माणूस दाती तृण धरीत असता त्यास आपले लोक मारीत नाही या अर्थे सोडून दिल्हे. मीर फैजुलाचे ठिकाण लागले नाही, लढाईत पडले किंवा कोण्हास सापडले हे ठिकाण लावीत असो. स्वामीचे पुण्यप्रतापे स्वामीची आजीम अस्मानी फते जाहाली. सरकारच्या फौजेंतील माणूस घोडे फार जखमी व ठार जालें. आम्हास गोलीची जखम उजवे कानास लागली. गोली निघोन गेली. खैर जाहाली. लौकरच जखम बरी होइल. निळकंठराव त्रिंबक, गोपालराव गोविंद यांचे भाऊ व अंतोजी माने पागेकडील कामास आले. कृष्णराव बलवंत यांचे घोड्यास जखम गोलीची लागली. आनंदराव गोपाल याचा गेंद घोडा पडला. मोठे शर्तीची लढाई जाली. हुजरात व सरंजामी सरदार लोक याणी निकड केली. लोकानी चाकरी मोटे तऱ्हेनें केली. सरकारचे निशाणाचे हतीच्या पायास गोला लागला तो कापून काढिला. खैर जाली. लस्करचे घोडे ठार फार जाले व मातबर

लोक जायाजखमी फार जाले व कितेक ठारही जाले. स्वामीची फते जाली याजमुले इतकीही क्षित जालीसीं सर्वांस वाटली नाहीं. "§

या पराभवामुळें हैदरअली दिङ्मूढ होऊन गेला. मराठ्यांच्या हल्ल्यामुळें जी रणधुमाळी माजली तींत हैदर घोड्यावरून उतरला व काय करावें हें न समजल्यानें क्षणभर थांबला. तेवढ्यांत गाजीखान बीड नामक त्याच्या एका विश्वासू नोकरानें त्याला डोंगराच्या शिखरावर नेलें, तेथें त्याला एका उमद्या घोड्यावर बसविलें व जखमी स्थितींत त्याला श्रीरंगपट्टणास पोचविलें. हंसराज नामक घोड्यावर आरूढ झालेला हैदर भरधांव चालला असतां चार हजार मराठे स्वारांनीं त्याचा पाठलाग केला, परंतु त्यांस झुकांडी देऊन तो निसटला आणि पटणास गेला. वेशांतर केल्यानेंच त्यास असें जातां आलें. एका भिकाऱ्याच्या वेशांत त्याचा मुलगा टिपूही सय्यद महंमद याच्या मदतीनें रणांगणांतून पळून गेल्यानें वांचला. आपला मुलगा सुखरूप परत यावा म्हणून हैदर एका मशिदींत प्रार्थना करीत होता, ती त्याची प्रार्थना अल्लानें ऐकली व त्या पितापुत्रांची भेट झाली.

मोतीतलावाच्या ह्या मगरमिठीच्या प्रसंगीं हैदराची हिकमत व मराठ्यांची मगरमिठी हे गुण प्रामुख्यानें व्यक्त झाले. मराठे लोकांनीं बहादुरी चांगली केली. त्यांच्या इतिहासांत या लढाईला 'मोतितलावाची लढाई' असें म्हणतात; कांहीं इतिहासकार तिला 'चिनकुर्लीची लढाई' असें संबोधितात. ही मोठी चुरशीची लढाई झाली व मराठ्यांस जय मिळाला, असें असलें तरी विल्कस्-सारखे युरोपियन लेखक ही एक लढाई नसून साधी चकमक झडली असें म्हणतात याचें आश्चर्य वाटतें! दुसरें असें कीं या लढाईत हैदराचा पराभव झाला असला तरीही मराठ्यांस जय मिळाला हें म्हणणें खोटें आहे असेंही तो म्हणतो. कसेंही असलें तरी मोठी लढाई झाली व तीमध्यें मराठ्यांस जय मिळून हैदरला पळतां भुई थोडी होऊन त्याचा पराभव झाला हें निर्विवाद आहे.

**११. हैदरची सर्वत्र दाणादाण**—मोतीतलावाच्या लढाईनंतर दुसऱ्याच दिवशीं मराठ्यांनीं मेलकोट्याचें ठाणें काबीज करून पुष्कळ लूट पैदा केली व मग ता. १० मार्च रोजीं ते श्रीरंगपट्टणला पोचले. लगेच त्यांनीं

§ पे. द. ३७· २२६; खरे ११०२, ११२१; पेंठे द. १· ६०.

त्या किल्ल्यास वेढा दिला. श्रीरंगपट्टणचा किल्ला मोठा बळकट असून त्याच्या सभोवती कावेरी नदी वाहात असल्यानें तो जिंकून घेणें अवघड होतें. ता. १७ मार्च, १७७१ रोजीं वर्षप्रतिपदेच्या दिवशीं त्रिंबकराव पेठ्यानें त्या किल्ल्यावर तोफांचा मारा सुरू केला. हैदरचा पराभव झालेला असल्यानें तो लौकरच शरण येईल अशी अपेक्षा होती; परंतु हैदर अलोट धैर्याचा हिकमती पुरुष. लगोलग त्यानें लढाईची पुनः तयारी केली व मराठ्यांना नेटानें तोंड देऊन त्यांच्या वेढ्याचें काम रेंगाळत ठेविलें. श्रीरंगपट्टणच्या आजूबाजूचा सर्व प्रदेश हैदरनें उध्वस्त केलेला असल्यामुळें मराठ्यांस हा आपला वेढा लौकरच उठवावा लागेल असें त्यानें ताडलें, तेंच अखेर खरें ठरलें. पावसाळा सुरू झाल्यावर वेढा चालविणेंही धोक्याचें होतें. अशाही स्थितींत मराठ्यांनीं वेढ्याचें काम जोरांत चालविलें व उपासमारीनें हैदर शरण येईल अशी अटकळ बाळगिली. हैदरचे लोक लढाईस कंटाळलेले, उपासमारीचें भयही त्यांस भेडसावीत होतें. तरीही स्वतः हैदरनें बचावाचें काम अत्यंत शिताफीनें केलें. तशा स्थितींत तहाच्या पोकळ लटपटी करून मराठ्यांचा वेढा शिथिल करण्याची खटपटही हैदरनें चालविली. तथापि तहाचीं बोलणीं फोल ठरलीं. अन्न व वैरण मराठ्यांस मिळेनाशी झाली. पर्जन्यकाल समीप, वेढा रेंगाळला तर नद्यांस पाणी येऊन मराठ्यांचें नुकसान होणार. अशा या नानाविध अडचणींचा विचार करून त्रिंबकरावानें अक्षय्य तृतीयेच्या दिवशीं ता. १८ एप्रिल १७७१ रोजीं पट्टणचा वेढा उठविला व तो मेलकोट्यास छावणी करून बसला.

श्रीरंगपट्टणचा वेढा उठविल्यावर कावेरी नदीच्या तीरानें जाऊन त्या प्रांताच्या आजूबाजूचा प्रदेश उध्वस्त व लुटून फस्त करावा व बिदनूर जिंकून घ्यावें असा त्रिंबकरावानें बेत केला. त्याप्रमाणें त्यानें कडूर-बाणावरच्या बाजूनें चाल करून चेन्नरायपटण, शंकरपट्टण, नरसिंहपूर वगैरे ठाणीं जिंकून घेतलीं. याच सुमारास शिऱ्याचा ठाणेदार महिमाजी शिंदे यानें चेल्लूरबिद्रीवर हल्ला केला पण तेथें त्याचा पराभव झाला. मराठ्यांपासून आपल्या प्रदेशाचें संरक्षण करण्यासाठीं हैदरानेंही शिकस्त केली. टिपूच्या नेतृत्वाखालीं त्यानें एक फौज बिदनूरच्या बाजूस पाठविली. महंमद कुमेदानखान याच्या हाताखालीं दुसरी फौज देऊन हैदरनें त्याला पिरेपटण काबीज करण्यास पाठविलें. ती बातमी कळतांच त्रिंबकरावानें कुमेदानवर जोराचा हल्ला करून त्याला पळवून

लाविलें; त्या लढाईत कुमेदानाचे अनेक लोक मेले व पुष्कळ जखमी झाले. तो स्वतः मराठ्यांकडून पूर्णपणें वेढला गेला. तेव्हां त्या वेढ्यांतून निसटून जाण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. आपल्याला सोडून कुमेदान रात्रींच्या रात्रीं पळून जाणार हें वृत्त कळतांच त्याचे जखमी लोक आक्रोश करूं लागले. तेव्हां खानानें त्यांस समक्ष आश्वासन दिलें कीं, 'मी तुमची सर्व व्यवस्था लावतों.' असें सांगून त्यानें त्यांस शांत केलें. परंतु आपल्या पलायनाची सर्व सिद्धता झाल्यावर त्या सर्वांची निर्दयपणें कत्तल करून तो स्वतः मात्र जीव घेऊन म्हैसूरला पळून गेला! (म्हैसूर गॅझेटियर, भाग १, पृ. ३८४). हैदराचा सर्वच कारभार अशा गळेकापू वृत्तीचा निदर्शक आहे.

याच सुमारास जुलै महिन्यांत वामनराव पटवर्धनाच्या सैन्यानें बाणावरपासून तीन कोसांवर असलेल्या गर्दनगड नांवाच्या बळकट किल्ल्यास वेढा दिला. किल्ल्यांतील लोकांनीं आपला बचाव करण्याची शिकस्त केली. अखेर निभाव न लागल्यानें त्यांना तो किल्ला मराठ्यांच्या स्वाधीन करावा लागला. याच वेळीं त्रिंबकराव पेठ्यानेंही देवरायदुर्ग, भैरवदुर्ग, उत्तरदुर्ग वगैरे किल्ले व नागमंगल, देवलपूर, किकेरी इत्यादि ठाणीं जिंकून घेतलीं. मराठ्यांच्या या विजयांनीं हैदरचें धाबें दणाणून गेलें व तो तहास उत्सुक झाला. मात्र मनाची तयारी नव्हती. मराठ्यांस तहाचे नादांत गुंतवून मग त्यांचा सूड घ्यावा हा त्याचा उद्देश होता. अखेरीच्या अटी म्हणून त्रिंबकरावानें हैदरचा वकील आपाजीराम यास स्वच्छ सांगितलें, कीं (१) साठ लक्ष रुपये खंडणी द्यावी, (२) मोगलाकडील अठ्ठावीस लक्षांचा फडशा परभारें करून पावती आणून द्यावी, (३) हैदरनें त्रिंबकरावास जातीनें भेटावें, (४) पाईन घाटाखालीं जावयाचा मराठ्यांनीं मनसुबा केल्यास हैदरानें सैन्यासह त्यांस मदत करावी, (५) हें सर्व मान्य झाल्यास मराठ्यांनीं श्रीरंगपट्टणच्या आसमंतांतील काबीज केलेला प्रदेश हैदरला परत द्यावा; मात्र चिकबाळापूर व नंदीगड देण्याबद्दल पेशव्याची परवानगी मिळवावी. तहाच्या या अटी हैदरास मान्य होण्यासारख्या नव्हत्या व त्यामुळें तहाचीं बोलणीं रेंगाळलीं. दरम्यान पुण्यास पेशव्याची प्रकृति फारच बिघडल्याच्या बातम्या हैदराला मिळाल्या होत्या. त्यामुळें तो तहास उत्सुक नव्हता. कदाचित् पेशवा कालवशही होईल, पुण्याच्या कारभारांत घोटाळे माजतील, रघुनाथराव पेशवा होईल असेंही त्याला वाटत होतें. त्यामुळें

मराठ्यांचा जोर आतां ओसरत जाणार हें ताडून तो तहाच्या शुष्क वाटाघाटींत केवळ कालहरण करूं लागला. तरीही त्रिंबकरावाचा दम मुळींच खचला नाहीं आणि हैदराला आपण गिळून टाकणार अशा नेटानें त्यानें आपले प्रयत्न शिकस्तीचे चालविले.

तहाच्या या वाटाघाटी चालू असतांच तंजावरचा राजा तुळजाजी भोसले यानें त्रिंबकरावास कळकळीचें पत्र लिहून इंग्रजांविरुद्ध मदतीची याचना केली. इंग्रज सेनानी स्मिथ याच्या मदतीनें कर्नाटकचा नबाब महंमदअली यानें तंजावरला वेढा दिला होता. त्याच्या मगरमिठींतून आपली सुटका करावी म्हणून त्यानें त्रिंबकरावास मदतीस बोलाविलें. तेव्हां सन १७७१ च्या नोव्हेंबरांत पाईन घाट ओलांडून त्रिंबकराव त्याच्या मदतीस गेला. ती बातमी कळतांच महंमद अलीनें तंजावरचा वेढा उठविला व तेथील राजाशीं कसाबसा तह करून आपली वाट सुधारली. पाईन घाट ओलांडण्यांत त्रिंबकरावाचे मुख्यतः तीन उद्देश होते. ( १ ) तंजावरकरांस मदत करणें ( २ ) त्या बाजूचा हैदराचा प्रदेश लुटून फस्त करणें व ( ३ ) शक्य झाल्यास इंग्रज व कर्नाटकचा नबाब यांची हैदराविरुद्ध मदत मिळविणें. यांपैकीं पहिला उद्देश सफल झाला व तिसरा फसला. पाईन घाटाखालीं आपण उतरलों म्हणजे हैदर आपला मार्ग रोखून धरून आपल्याला कोंडींत पकडील याची त्रिंबकरावाला पूर्णपणें जाणीव होती व म्हणूनच त्यानें वामनराव पटवर्धनास घाटाच्या संरक्षणास राहाण्यास सांगितलें. त्याचा हा कयास अगदीं बरोबर होता. त्रिंबकराव घाटाखालीं उतरला हें कळताच हैदरानें टिपूला मोठ्या सैन्यासह तिकडे पाठविलें. पण वामनराव पटवर्धन टिपूचें अंगावर चालून आल्यामुळें टिपू लगेच श्रीरंगपट्टणास परत गेला.

पाईन घाट ओलांडल्यावर त्रिंबकरावानें बारामहाल प्रांतांत लुटालूट करून हैदरचीं ठाणीं हस्तगत करण्याचा सपाटा चालविला. त्यानें कडप्याच्या नबाबास आपला मंडलिक बनविलें व कृष्णराव बळवंत मेहेंदळे, सखाराम हरि वगैरे मंडळीस कोईमतूरच्या रोखानें पाठवून दिलें. ता. १३ जानेवारी १७७२ रोजीं कृष्णराव मेहेंदळ्याच्या सैन्याची टिपूशीं सालेमच्या बारीमध्यें गांठ पडून मोठी लढाई होऊन टिपूचा पराभव झाला. यानंतर त्रिंबकराव पुनः घाटाअलीकडे आला व बंगलूरवरून तो सन १७७२ च्या फेब्रुवारींत दोड्डबाळापुरास वामनराव पटवर्धनास मिळाला. पुढें आतां बिदनूरवर स्वारी करून तो देश

जिंकण्याची त्रिंबकरावाची इच्छा होती व त्या दृष्टीनें त्याचे बेतही चालले होते. जरूर पडल्यास येत्या पावसाळ्यांतही म्हैसूरच्या प्रदेशांत छावणी करावी व हैदरचा कायमचा निकाल लावावा असा त्याचा निश्चय होता. परंतु बरोबरचे सरदार व लोक सर्व छावणीस राहाण्यास नाखूष झाले. घरें दारें सोडून आज तीन वर्षे ते बाहेर होते. पटवर्धन मंडळीही स्वारीच्या दगदगीस कंटाळून गेली. सर्वांनीं पेशव्याकडे विनंती करून मोहीम आटपण्याची खटपट चालविली. परशुराम भाऊ पटवर्धनानें स्वारींतून कळविलेल्या या हकीकती हृदयद्रावक आहेत. †

**१२. निराशेचा तह, इत्यर्थ**—हैदरही इतक्या वर्षांच्या युद्धानें व दगदगीनें कंटाळून तह करण्यास उत्सुक झाला. आतां बंगलूर, श्रीरंगपट्टण व बिदनूर हे फक्त तीनच जिल्हे त्याच्या ताब्यांत राहिले. त्रिंबकराव पावसाळ्यांत छावणी करणार हें वर्तमान येऊन त्याचा धीर सुटला. त्याचा आशातंतु एक पेशव्याचा मृत्यु, पण तो मृत्यु तरी कधीं होतो कोणीं सांगावें. पुण्यास तर लोकांचे डोळे पेशव्याच्या मृत्युनंतर काय प्रकार घडणार या विवंचनेकडे लागले. रघुनाथरावाचीं कारस्थानेंही सारखीं चहूंकडे खेळतच होतीं. हैदरचा सर्व इतबार त्याचा विश्वासु वकील आपाजीराम याजवर होता. हा ब्राह्मण वकील मोठा पाताळयंत्री हैदराची सेवा निष्ठेनें बजावीत होता. त्रिंबकरावानें परत यावें अशी त्वरा खुद्द पेशव्यानें चालविली. "हिंदुस्थान व कर्नाटक अशा दोन लष्करांस मबलग खर्च होतो, हिंदुस्थानचा पैका येत नाहीं तर निदान पक्षीं पंचवीस लक्ष रोख घेऊन कित्येक किल्ले व ठाणीं सोडून हैदरचा सलूख करावा," असा पेशव्याचा आदेश पेठ्यास आला. पेशव्याची मोठी इच्छा, मरणापूर्वी कर्जमुक्त व्हावें. तहाच्या वाटाघाटी सारख्या चालूच होत्या, पण पेशव्याची सूचना त्रिंबकरावास मान्य नव्हती. कबजांत आलेलीं स्थळें सोडून देणें त्याच्या जिवावर आलें. शेवटीं त्यानें पेशव्याची आज्ञा कबूल करून प्रकरण उरकलें. २१ जून स. १७७२ रोजीं किकेरीच्या मुकामीं तहपत्रावर दोहों पक्षांच्या सह्या झाल्या, त्यांतील कलमें :—(१) हैदरनें पन्नास लाख रुपये द्यावे, पंचवीस रोख, सहा लक्षांचें जवाहीर व बाकीची सावकारी निशा ; (२) शिरें, मदगिरी, गुर्रमकोंडा, दोड्डबाळापुर, चेनरायदुर्ग, कोलार, होसकोटे हीं ठाणीं त्यांखालच्या

† ख. ११६५, ११६६, ११६९, ११९०.

प्रदेशासुद्धां मराठ्यांकडे आणि नंदीदुर्ग, चिक्कबाळापुर, देवनरायदुर्ग हीं ठाणीं व प्रदेश हैदराकडे राहावा ; ( ३ ) इतउत्तर मराठी राज्यावर हैदरानें आक्रमण करूं नये. रास्ते व घोरपडे वरील कलमांच्या बजवणीस मध्यस्थ झाले. हैदरानें रोख रक्कम ताबडतोब दिली. आपाजीराम वकील याजकडून करारांत अंतर पडलें, म्हणून त्याला कैदेंत बसविलें. ×

यासंबंधानें त्रिंबकरावानें पेशव्यास लिहिलें, " सेनापति व रास्ते मध्यस्थ खरे पण तेही खट्टेच कीं स्वामींचे शरीरीं आरोग्य असतें तर छावणी करून किल्ले न देतां हैदरनायकाचें पारिपत्यही करितों, परंतु उपाय नाहीं. ईश्वरें सर्वांस काळजींत घातलें. लाचार जालों. बाकीची रक्कम येणें ते विना फौज आल्याखेरीज हैदर देणार नाहीं. परंतु स्वामींस आरोग्य होईल तर सर्व घडेल. हैदर तर तिकडील वर्तमानावर फिरोन लबाडीच्या गोष्टी बोलतो. " †

तह उरकून त्रिंबकराव जून अखेरीस परत निघाला तो १० सेप्टेंबरला थेऊर येथें पेशव्यास भेटला. त्यावेळीं त्यानें ३० लाख रुपये सरकारांत भरले. त्याची स्वारी दोन वर्षें चालली, तिचा खर्च एक कोटी ३९ लक्ष झाला. हैदराचें आक्रमण थोडें बहुत वारलें. मराठी राज्यांत नवीन भर अशी पडली नाहीं. शिवाजीनें पैदा केलेले स्वराज्याचे प्रदेश मराठ्यांचे कबजांत आले. मुख्य म्हणजे मराठी राज्य जिवंत आहे, मराठे वीर राज्याचें संरक्षण करूं शकतात हा प्रत्यय या उद्योगानें सर्वांस पटला. अनेक लहान मोठीं कुटुंबें युद्धानुभव मिळवून राष्ट्रोद्योगांत सामील झालीं. पटवर्धन कुटुंबाची जमात संकटें सोसून समर्थ बनली. माधवरावाच्या मृत्युमुळें हैदराचा कांटा कायम राहिला आणि पुढील इतिहासही बदलून गेला.



× पे. द. ३७. २३३ ; ख. ११७१, ११७४. † पे. द. ३७-२३३.

## ३. कालसूची, पेशवा व उत्तर हिंद

| | | | |
|---|---|---|---|
| स. १७२८ | जून | १४ | शहाआलम जन्म. |
| ,, | अखेर | | ,, दिल्लींतून निसटला. |
| १७५९ | जानेवारी | २ | ,, शुजाचे आश्रयास. |
| ,, | ऑक्टोबर | २९ | आलमगीर बादशहाचा खून. |
| ,, | डिसेंबर | २५ | शहाआलमनें बादशाहीपद स्वीकारलें. |
| १७६० | फेब्रुवारी | | क्लाइव्हचें स्वदेशीं प्रयाण हिंदुस्थान राज्याकरितां. |
| ,, | ऑक्टोबर | २० | मीरकासीमची नबाबीवर स्थापना. |
| स. १७६१ | जानेवारी | १४ | पानिपतावर मराठ्यांचा संहार. |
| ,, | ,, | १५ | पाटणाजवळ त्रिवर्गांचा पराभव. |
| ,, | ,, | १६ | इंग्रजांनीं पांदिचेरी घेतली. |
| ,, | मार्च | १२ | पाटणा येथें शहाआलम तख्तनशीन. |
| ,, | एप्रिल | १२ | शहाआलमचें परत प्रयाण अयोध्येंत. |
| ,, | ,, | ,, | जवानबख्त व नजीबखान दिल्लींत प्रवेश. |
| ,, | सेप्टेंबर | २९ | गौतमाबाईचा मृत्यु. |
| ,, | नोव्हेंबर | ३० | मांगरोळ येथें माधोसिंगाचा पराभव. |
| स. १७६२ | | | मीरकासीमचा इंग्रजांशीं तंटा. |
| स. १७६३ | ऑक्टोबर | ५ | मीरकासीमनें इंग्रजांची कत्तल केली. |
| ,, | डिसेंबर | २५ | सुरजमल्ल जाठाचा खून, जवाहीरसिंग पदापन्न. |
| स. १७६४ | | | मीरकासीमचा पाडाव. |
| ,, | मे | ३ | पाटणाची लढाई. |
| ,, | ऑक्टोबर | २३ | बक्सारची लढाई, त्रिवर्गांचा पाडाव. |
| स. १७६५ | फेब्रुवारी | | जवाहीरसिंग व नजीबखान तह. |
| ,, | ,, | ११ | अलाहबादचा कबजा इंग्रजांस, बादशहाचें वास्तव्य. |
| ,, | मे | ३ | कुराचे मैदानावर इंग्रजांनीं होळकरास मोडलें. |
| ,, | ,, | | गव्हर्नर होऊन क्लाइव्ह कलकत्त्यास दाखल. |
| ,, | ऑगस्ट | २ | शुजाचा इंग्रजांशीं दोस्तीचा करार. |
| ,, | ,, | १२ | बादशहानें इंग्रजांस दिवाणी करार केली. |
| स. १७६६ | मे | २० | मल्हारराव होळकर मृत्यु ; गोहदचा वेढा सुरू. |
| ,, | डिसेंबर | ८ | गोहदकराशीं दादाचा तह, वेढा संपला. |
| स. १७६७ | जानेवारी | २२ | क्लाइव्ह स्वदेशीं परत गेला. |
| ,, | फेब्रुवारी | | दादा चमेलीवरून परत फिरला. |
| ,, | मार्च | २० | दादानें भेलसा काबीज केलें. |

| | | | |
|---|---|---|---|
| स. १७६७ | जून | ४ | दादा आनंदवल्लीस दाखल. |
| ,, | ऑगस्ट | २० | विठ्ठल शिवदेव मृत्यु. |
| ,, | डिसेंबर | १४ | मावंदाची लढाई, जवाहीरसिंगचा पराभव. |
| ,, | | | वर्षभर बुंदेलखंडांत जाठांची चढाई, तिला त्रिंबकराव पेठेचा प्रतिकार. |
| ,, | डिसेंबर | २१ | माधोसिंग मृत्यु. |
| स. १७६८ | जून | १० | धोडपवर दादाची शरणागति. |
| ,, | जुलई | | जवाहीरसिंगाचा खून. |
| ,, | नोव्हेंबर | | महादजी शिंद्याचें दिल्लीवर प्रयाण. |
| ,, | डिसेंबर | | ,, चें युद्ध, राघोराम पागे मृत्यु. |
| स. १७६९ | मे | | रामचंद्र गणेशाचें उत्तरेंत प्रयाण. |
| स. १७७० | एप्रिल | ५ | गोवर्धनची लढाई, मराठ्यांचा विजय. |
| ,, | मे–नोव्हेंबर | | दुआबांत पठाणांवर मराठ्यांची चढाई. |
| ,, | ऑगस्ट | २३ | काशीच्या बळवंतसिंगाचा मृत्यु. |
| ,, | ऑक्टोबर | ३१ | नजीबखान मृत्यु, झाबेतास कैद. |
| ,, | डिसेंबर | | इटावा काबीज मराठ्यांकडून. |
| स. १७७१ | जानेवारी | १७ | बंगसाचा पाडाव व तह. |
| ,, | फेब्रुवारी | १० | महादजीनें दिल्ली घेऊन तेथें शहाआलमची द्वाही फिरविली. |
| ,, | मार्च | २९ | शहाआलमचा मराठ्यांच्या आश्रयाचा तह. |
| ,, | एप्रिल | ४ | ,, चें प्रयाण अलाहबादेहून दिल्लीवर. |
| ,, | जुलई | ११ | अहमदखान बंगश मृत्यु. |
| ,, | ,, | २६ | बादशहाचा मुक्काम फर्रुखाबादेवर. |
| ,, | नोव्हेंबर | १६ | बादशहामहादजी भेट अनूपशहरावर. |
| ,, | डिसेंबर | २५ | बादशहाचा दिल्लींत प्रवेश. |
| स. १७७२ | फेब्रुवारी | | बादशहा मराठ्यांची रोहिल्यांवर स्वारी. |
| ,, | मार्च | ४ | फत्तरगड काबीज, पानिपतचा सूड. |
| ,, | एप्रिल | १४ | अहंमदशहा अब्दालीचा मृत्यु. |
| ,, | जुलई | २२ | पेशव्याकडून सरदारांचें अभिनंदन. |
| ,, | नोव्हेंबर | १८ | पेशव्याचा मृत्यु. |
| स. १७७३ | आरंभ | | गाजीउद्दीन पुण्यांत. |
| ,, | मार्च | ६ | गाजीउद्दिनास काल्पीची जागीर. |
| स. १८०२ | मे | २८ | गाजीउद्दीन मृत्यु. |

— ३ —

# पेशवा व उत्तर हिंद

**१. परिस्थिति. २. उत्तर हिंदची अनवस्था. ३. इंग्रजांचा आक्रम. ४. बादशहाचें आसन प्रयाग. ५. मराठ्यांचें मागें पाऊल. ६. क्लाइव्हची दिवाणी. ७. दादाचें अपयश. ८. जाठांचें पारिपत्य. ९. रोहिल्यांचा पाडाव. १०. दिल्लीचा कबजा. ११. नजीबखानाची फिटाफीट.**

**१. परिस्थिति** — पूर्वी सांगितलेंच आहे कीं चुलत्याच्या विरोधामुळें माधवराव पेशव्याची अडवणूक सारखी अखेर पावेंतों होत होती. पेशव्यानें कोणतेंही काम हातीं घ्यावें, त्यांत चुलत्यानें भलतेंच खुसपट काढून फाटे फोडावे असा प्रकार होऊं लागल्यामुळें पेशव्याला मोकळा हात कधीं मिळालाच नाहीं. मी वडील, मी अनुभवी, मी कर्तबगार, माझ्या आज्ञेंत पुतण्यानें चालावें, मला वाटेल तें करण्यास स्वतंत्रता असावी, ही भावना चुलत्याची, तर त्याचे उलट मी मालक, मी पेशवा, मलाच सर्वांचें नियंत्रण केलें पाहिजे, हा भाव पुतण्याचा, या विरोधी प्रवाहांच्या परिस्थितींत राज्यकारभाराचा मेळ म्हणून कधीं बसला नाहीं. त्यांतल्या त्यांत माधवराव मोकळेपणानें सर्व बोलून दाखवी, समजुतीच्या वाटेनें चौघांची सल्ला मान्य करी, याचे उलट चुलत्याची मनांतली इच्छा एक, आणि बाहेर ढोंग संसारनिवृत्तीचें, काय हवें तें उघड बोलून दाखविण्याची चोरी, यामुळें कोणतेंही काम पेशव्यानें हातीं घेतलें कीं त्याला चुलत्याकडून भलताच ताण पडावयाचा. पेशव्यानें निकालावर आणण्याचा प्रयत्न करावा, तों दादानें दुसरीच पळवाट काढून नुसटून जावें, असा हा लपवाछपवीचा खेळ कैक वर्षें सारखा चालला. शेवटीं युद्धानें निकाल लागला, तो आरंभींच सिद्ध झाला असता तर पेशव्याला जास्त करामत करून दाखवितां आली असती असें आतां परिणामावरून म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. ही दृष्टि लक्षांत बाळगून आपण उत्तर हिंदच्या कारभाराचा परामर्ष घेऊं. त्यांत प्रत्यक्ष दादाचे खेळ तेवढे निराळ्या स्वतंत्र प्रकरणांत सांगितले आहेत.

माधवरावाची दृष्टि राज्याच्या सर्व बाजूंस अगदीं कोनाकोपऱ्यांकडे सुद्धां वळत होती. प्रत्येक प्रकरण तो आपल्याकडून त्वरेनें संपवून लगेच नवीन हातांत

घेई. मधून मधून शरीरप्रकृति त्यास त्रास देत असे. दादाला सांभाळून त्यास गुंतवून ठेवणें हें एक पेशव्याला कायमचें व्यवधान होतें. नागपुरकर भोसले, गायकवाड, होळकर यांचा ओढा स्वार्थापायीं दादाकडे वळलेला असे. दोन मालकांच्या विरोधाचा फायदा घेऊन आपला मतलब साधणारेच लोक पुष्कळ होते. घरच्या घरांत पाहातां पेशव्याचा आप्त बाबूजी नाईक नेहमीं असंतुष्ट व छिद्रान्वेषी होता. बाहेरच्या देशांत निजाम, हैदर व इंग्रज हे तिघे मराठ्यांच्या सत्तेला अडथळा आणणारे होते. त्यांतूनही मराठ्यांचा जम पूर्वीपासून बसलेला असल्यामुळें घरांत दुही नसती तर माधवरावानें या विरोधकांस लगेच ठिकाणावर बसविलें असतें. निजामाला त्यानें नरम केलाच होता. हैदर नाईकही वचकून होता. शिवाय हैदराचा इंग्रजांशीं कलह लागल्यामुळें, तो परभारें क्षीण बनतो याचा संतोष मराठ्यांना वाटे. एवंच मराठे व इंग्रज हे दोनच मुख्य प्रतिस्पर्धी हिंदी क्षितिजावर यावेळीं अवतरलेले असून, पैकीं मराठ्यांना बसलेला जम टिकवायचा तर इंग्रजांना तो बसवायचा अशी परिस्थिति होती. त्यांत प्रथम-पासून पेशव्याला मोठी विवंचना उत्तर हिंदची वाटत होती. निजामाशीं त्याचा झगडा चालू असतांच म्हणजे स. १७६३ च्या पावसाळ्यांत इंग्रजांनीं मीर कासीमचा पाडाव करून बंगाल-बिहारचा प्रदेश काबूंत आणिला. कायदेशीर मालक मोगल बादशहा शहाआलम सारखा दिल्लीस आपली सत्ता उजविण्याच्या उद्योगांत होता. या बाबतींत शहाआलमनें शुजाउद्दौलाचा आश्रय करून पांच वर्षे पावेतों समस्त पूर्व हिंदचा प्रदेश सोडविण्याचा प्रयत्न केला. तो विफल झाल्यावर त्यानें स. १७६५ त इंग्रजांचा आश्रय करून त्यांस पूर्व प्रदेशाची दिवाणी लिहून दिली. इंग्रजी सत्ता भारतभूमींत कायम बनली.

हिंदी क्षितिजावर इंग्रजांचा उदय स. १७५७ च्या प्लासीपासून झाला. पुढील चार वर्षांत हिंदचे दोन मुख्य सत्ताधीश मुसलमान व मराठे आपसांत लढून कमकुवत झाले हा प्रकार इंग्रजांचे पथ्यावर पडला. हिंदची भावी सत्ता आपल्या हातीं येणार हें स्वप्न क्लाइव्हला स्पष्ट दिसत होतें. इकडे प्लासीची क्रान्ति झाली तोंच दिल्लीचा बादशहा देशोधडीस लागला. त्यालाही इंग्रजांपुढें हात टेकावे लागले. पानिपतानंतर मराठे हळूहळू आपला जम उत्तरेंत बसवूं लागले, त्यांत सिंद्यांचे घरांत कोणीच कर्ता पुरुष राहिला नाहीं. होळकरही उत्तर पंथांतच होता. बुंदेल-खंडांत गोविंदपंताचे पुत्र बाळाजी व गंगाधर निराधार बनले, ते लगोलग

पुण्यास पेशव्याचे भेटीस आले. § पण त्यांचीं गाऱ्हाणीं ऐकण्यास तेथें कोणी मालक पेशवाच ठिकाणावर नव्हता. बुंदेल्यांप्रमाणें इतर अनेक मराठे सरदार, हिंगणे वकील वगैरे कळकळीनें पुण्याकडे डोळे लावून होते. पण स. १७६८ पर्यंत पेशव्याला उत्तरेकडे लक्ष देण्याची सवडच आली नाहीं. त्यामुळें इंग्रज यशस्वी झाले.

ही क्रांति घडवून आणणारा इंग्रज बहाद्दर क्लाइव्ह होय. त्याच्याच तोडीचा दुसरा इंग्रज वॉरन हेस्टिंग्स या प्रयोगांत तूर्त प्रत्यक्ष भाग घेणारा नसला तरी तोही अंतस्थ सूत्रें हालवून इंग्रजी सत्तेचा पाया घालीत होता. या क्रांतीचें यशःसाधन लष्करी सत्ता. मराठ्यांनीं गनिमी काव्याच्या बळावर आपलें साम्राज्य थाटलें. तो गनिमी कावा बुसीच्या आगमनापर्यंत काम देत होता. पण आतां पाश्चात्यांच्या शास्त्रीय युद्धनियंत्रणापुढें तो निरुपयोगी बनला, हा प्रकार याच उत्तरहिंदच्या प्रकरणांत व्यक्त होणार आहे. हें राज्य करण्याचें इंगित एकच तरुण मराठा सूक्ष्म दृष्टीनें अवलोकित होता, तो महादजी सिंदे होय. पण त्यासही त्या नवीन पद्धतीचा अवलंब करण्यास दहा वीस वर्षे लागलीं. फ्लेचर, लॉ, समरू, रीन माडेक, इत्यादि पाश्चात्य सेनानी निरनिराळ्या एतद्देशीयांचे पदरीं राहून ही लष्करी योजना सिद्ध करीत होते. ती पुढें पूर्णतया स्वीकारल्यामुळेंच महादजीला उत्तर हिंदच्या कारभारांत प्रमुखपण प्राप्त झालें.

स्वतः माधवरावाला हा नूतन प्रयोग स्वीकारण्याची संधि आली नाहीं, किंवा बुद्धि झाली नाहीं. निजाम हैदरावरील किंवा भोसल्यावरील मोहिमा बहुधा जुन्या गनिमी पद्धतीनेंच बनून आल्या, त्यांत त्रिंबकराव पेठे, विसाजीपंत बिनीवाले, रामचंद्र गणेश कानडे व गोपाळराव पटवर्धन हे प्रमुख चालक होते. तोफा-बंदुकांचे कांहीं कारखाने माधवरावानें तयार केले, पण आमूलाग्र बदल त्याला युद्धप्रयोगाचा करतां आला नाहीं. तथापि माधवरावाच्या अमदानीचा हा काल हिंदच्या लष्करी परिवर्तनाचा होय यांत संशय नाहीं. याच परिवर्तनानुसार येथचा भावी इतिहास बनत गेला हा प्रकार स्पष्ट दिसतो.

बादशहा इंग्रजांस सोडून मराठ्यांकडे आला आणि दिल्ली पुनः कबजांत घेऊन मराठ्यांनीं आपला उत्तरेचा पूर्व उद्योग सिद्धीस नेल्याचा आनंद पेशव्यास अनुभवायला मिळाला हा प्रकार सत्य असला, तरी या वेळेपासून हिंदचें

§ पारसनीस बुं. प्र. पृ० १५३; भा. व. १ बुं. कै० पृ. १९.

राजकारण पुण्याचें केंद्र सोडून कलकत्त्याकडे जाऊं लागलें यांत संशय नाहीं. अशा व्यापक दृष्टीनें या समग्र क्रान्तीचा अभ्यास करतां यावा म्हणून उत्तर हिंदच्या या एकंदर घडामोडी आतां कालक्रमानें तपशीलवार सांगूं.

**२. उत्तर हिंदची अनवस्था** — पानिपतावर मराठ्यांचा संहार उडाला त्यामुळें तिकडील त्यांचा अंमल उखडून काढण्याचे प्रयत्न त्यांच्या शत्रूंनीं लगोलग सुरू केले. राजपूत, जाठ, रोहिले, बुंदेले इत्यादींनीं उठाव चालू केला असतां, ठिकठिकाणच्या मराठे सरदारांनीं आपापल्या क्षेत्रांत शक्य तितका टिकाव धरला. अंतर्वेदींत प्रयागपासून वर इटाव्यापर्यंतचीं मराठ्यांचीं ठाणीं शुजाउद्दौल्यानें घेतलीं. इटाव्यापासून हरद्वारपर्यंतचा प्रदेश रोहिल्यांनीं दाबला. खुद्द अब्दालीनें पंजाबवर नेट धरला, परंतु तिकडे त्यास शीखांनीं शह देऊन सरहिंदच्या पुढें येऊं दिलें नाहीं. पंजाबांतच त्याचा थारा होईना, मग दिल्लीची तर गोष्टच नको. स. १७६० पासून तो प्रकृतीनें क्षीण होत जाऊन अंथरुणास खिळला आणि त्याचें माहात्म्य संपलें. तो पुढें काबूल येथें ता. १४ एप्रिल स. १७७२ या दिवशीं मरण पावला. दरम्यान नारो शंकर व त्याचा पुतण्या विश्वासराव लक्ष्मण, विठ्ठल शिवदेव, गोविंदपंताचे दोघे कर्तबगार पुत्र बाळाजी व गंगाधर, मल्हारराव होळकर, महादजी सिंदे, पवार, बहिरो अनंत अशी अनेक मंडळी आपापल्या परी उत्तरेंत मराठी सत्ता टिकविण्याची शिकस्त करीत होती. बुंदेलखंडांत आपला ताबा त्यांनीं लगोलग बसविला.

अब्दालीनें परत जातांना बादशहाच्या व्यवस्थेंत नवीन फेरफार कांहीं केला नाहीं. दिल्लीचा उपद्व्याप त्याला मुळींच नको होता. नजीबखानाकडे मीरबक्षीचें काम त्यानें सोपलें. मुख्य मालक शहाआलम बाहेर वनवासांत असून गाजीउद्दीन नांवानें वजीर असला तरी पुनः दिल्लींत पाऊल ठेवण्याची छाती त्यास झाली नाहीं. तो इतउत्तर बाहेर जाठाचे आश्रयास राहिला. शहा-आलमचा पुत्र जवानबख्त बापाच्या जागीं वलीअहद म्हणून होता, त्यानें नजीबखानास बोलावून दिल्लीचा कारभार त्याचे हवालीं केला. ता. १२ एप्रिल १७६१ रोजीं जवानबख्त व नजीबखान या उभयतांनीं एका हत्तीवर बसून समारंभानें दिल्लींत प्रवेश केला. यामुळें गाजीउद्दीनला बोटें चावीत बाहेर बसणें भाग पडलें. नाहीं जवळ फौज, नाहीं हातीं पैसा. नजीबला मात्र सर्व क्षेत्र मोकळें सांपडलें. पुढें दहा वर्षें पावेतों त्यानें कसाबसा बादशाही कारभार

संभाळिला. मात्र आतां त्याला अब्दालीचा पाठिंबा उरला नाहीं, म्हणून कोणतीही विशिष्ट सुधारणा त्यास करतां आली नाहीं. पेशव्याच्या गृहकलहामुळें मराठ्यांनाही कैक वर्षे प्रत्यक्ष दिल्लीवर येण्याची सवड झाली नाहीं. तथापि नजीबखानही उघडपणें या दहा वर्षांत मराठ्यांविरुद्ध वागला नाहीं. त्याची कर्तबगारीच बेताची होती.

सिंदे-होळकरांनीं दिल्लीचा विषय हातीं घ्यावा तर तेही यावेळीं स्थिर नव्हते. महादजीला दौलत मिळण्यास वर्षोंगणती प्रयास पडले, ती त्याची कहाणी स्वतंत्र कलमांत सांगितली आहे. त्यांतल्या त्यांत मल्हारराव होळकरानें आपलें सामर्थ्य दाखविण्यास सुरुवात केली, तोंच दक्षिणेंत निजामाचें युद्ध चालू होऊन त्यासाठीं स. १७६२–६३ त सिंदे-होळकरांना उत्तरेचा व्याप सोडून पेशव्याचे साह्यास दक्षिणेंत जावें लागलें. मल्हारराव होळकर व दमाजी गायकवाड पानिपतच्या अरिष्टांतून वांचून परत आले त्यामुळें अल्प काळ त्यांजवर पेशव्यांची अवकृपा झाली, आणि उभयतांना पेशव्यांनीं जाब विचारण्यासाठीं पुण्यास बोलाविलें. त्यांनीं एकमेकांशीं विचार करून ठरविलें, कीं गायकवाडानें गुजरातेंतून व होळकरानें माळव्यांतून स. १७६१ च्या विजयादशमीस निघून तापीनदीवर भेटावें आणि तेथून पुढें बरोबर पुण्यास जावें. हा विचार अंमलांत येण्यापूर्वीच पेशवा नानासाहेब पुण्यास मृत्यु पावला, माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं, आणि होळकर गायकवाड यांचा जाब विचारण्याचें सामर्थ्य पेशव्यांत उरलें नाहीं. उलट त्यांचेंच साह्य पेशव्यांना मागावें लागलें. तथापि मल्हारराव इंदुराहून निघणार इतक्यांत त्याची बायको गौतमाबाई २९ सेप्टेंबर १७६१ रोजीं मरण पावली. त्यानें दमाजीस कळविलें, " श्रीमंतांकडे सत्वर जाण्याची तयारी जाहली होती, तों मधीं विपरीत प्रकार जाला त्यामुळें पंधरा दिवस गुंता आला. हिंदुस्थानचा बैदा मिटला नाहीं. सबब दक्षिणेस जावयाचा कूच नक्की होईल तो दिवस लिहून पाठवूं, त्याप्रमाणें आपण स्वार होऊन तापी आधीं व गंगातीरीं गांठ पडून समागमेंच श्रीमंतांचे भेटीचा योग घडेल तें करावें. "*

होळकर पुण्यास जाण्याची त्वरा करतो इतक्यांत त्यास दुसरी निकडीची कामगिरी उत्पन्न झाली. " माधोसिंगानें राजपुतान्यांतील मराठ्यांचीं ठाणीं उठविलीं. त्यावरून सुभेदारांनीं चालून जाऊन कोटा परगण्यांत मांगरोळ

* बडोदा सिलेक्शन्स १. ८१.

येथें त्याच्याशीं गांठ घातली. छ २ जमादिलावल इंदुवारीं ( ३० नोव्हें. १७६१ ) अस्तमान होईपर्यंत झुंज झालें. त्यांचे फौजेचा मोड झाला, थोरथोर पटाईत कामास आले. बुनगे व तोफखाना लुटला. दहाबारा हजारांतून फक्त तीनचारशें पळोन गेले. मोठा नक्ष जाला. जयपुरकर कछवे जोरानें भारी जमाव करून आले होते, ते पळोन गेले. मल्हारजीबावाच्या डावे हातास हलकी जखम लागली. शत्रूचें पारिपत्य जालें. " * या विजयानें राजपुतान्याची मराठी सत्ता कायम राहिली आणि त्यांचा जोर पानिपतावर संपला नाहीं अशी लोकांची तिकडे खात्री पटली. पुढें सिंदे, होळकर, गायकवाड दक्षिणेंत निजामाच्या युद्धांत पेशव्याबरोबर हजर होते, त्यामुळें उत्तरेंत स. १७६३ – ६४ सालांत मराठ्यांचा जोर हलका पडून इंग्रजांचे राजकारणास जोर आला. माधवराव हें सर्व जाणून होता, पण दादाचा उपद्व्याप व हैदराची चढाई यांजमुळें त्याला उत्तरेंत लक्ष घालण्याची सवड झाली नाहीं. राघोबा पुण्यांतून रुसून गेला त्या सुमारास म्हणजे ता. १२ ऑगस्ट १७६२ रोजीं माधवरावानें बाबूराव कोन्हेर यास लिहिलें, " प्रस्तुत तुम्ही शुजाउद्दौल्याजवळ आहां हें उत्तम केलें. सरकारचीं ठाणीं गेलीं आहेत तीं हस्तगत करावीं. रजवाड्यांस साहित्यपत्र पाठविलें जाईल. "†

राक्षसभुवनचा प्रसंग आटोपल्याबरोबर माधवरावाचा विचार उत्तरेचा कारभार हातीं घ्यावा असा होता, पण पैशाच्या अडचणीमुळें प्रथम त्याला कर्नाटकांत जाणें जरूर भासलें. त्यानें सिंदे-होळकरांचें सख्य जुळवून तेच उत्तरेचे माहीतगार म्हणून त्यांस त्या कामगिरीवर रवाना केलें. 'महादजी सिंदे हिंदुस्थानांत गेले, मल्हारराव व ते एक झाले, तिकडे त्यांची जबरदस्ती पडावी या उद्देशें सरदार तिकडे गेले.' ‡ पण त्यांच्या उद्योगास दादानें व्यत्यय आणिला. उत्तरेंतील माहीतगार दादा व त्याचा मुख्य हस्तक चिंतो विठ्ठल नाशकास होते, त्यांजकडे पेशव्यानें तो व्यवहार तूर्त सुप्रत केला. याच वेळीं दादानें महादजीला बंडखोर ठरवून त्याचा उच्छेद केला, त्यास उत्तेजन दिलें नाहीं, यावरून या दोन तीन वर्षांत महादजीला कांहींच कार्यभाग करून दाखवितां आला नाहीं. तूर्त उत्तरेंत हिंदभूमीला आळा घालील अशी निर्णायक सत्ता या वेळीं उपस्थित नव्हती. या बाबतींत मोगल बादशहाचे प्रयत्न काय होते तें प्रथम पाहूं.

---

* पे. द. २१. ९३, ९४. † रा. खं. १०. ४. ‡ रा. खं. १४·१६.

**३. इंग्रजांचा आक्रम** — मोगल बादशहा परंपरेनें हिंदुस्थानचे मालक ते दुर्बल बनले, तेव्हा मराठ्यांनीं दिल्ली येथें त्यांचें संरक्षण करण्याची जबाबदारी स्वीकारली. ती पार पाडण्यांत त्यांनीं प्रथम वजीर गाजीउद्दीन इमादुल्मुल्क यास हाताशीं घेतलें. या वजीराचें व बादशहा दुसरा आलमगीर यांचें वैमनस्य आलें. आलमगीरचा सर्वांत वडील पुत्र अलीगौहर याचा जन्म ता० १४ जून सन १७२८ रोजीं झाला, तो यावेळीं तरुण व बाणेदार होता. वजीर त्याच्याहून दहा वर्षांनीं लहान. वजिरानें कुटुंबाची अवहेलना चालविली, ती त्या शहाजाद्याला पाहवेना. उभयतांचें सडकून वाकडें येऊन कित्येक संग्रामही झाले. स.१७५८ त रघुनाथरावदादा बादशहाची व्यवस्था लावण्यासाठीं दिल्लीकडे होता आणि त्याच्याच पाठिंब्यावर वजिरानें आपला जुलूम चालविला. त्यायोगें संतापून तो शहाजादा वजिरास चुकवून दिल्लींतून पळून शुजाउद्दौल्याचे आश्रयास गेला. अंतर्वेद, रोहिलखंड करीत अलीगौहर अयोध्येच्या हद्दींत आला, तेव्हां २ जानेवारी स. १७५९ रोजीं शुजानें त्यास सत्कारानें आपल्याजवळ घेतलें.

मागें दिल्लींत काय प्रकार झाले तें वाचक जाणतात. ता. २९ नोव्हेंबर रोजीं वजिरानें बादशहा आलमगीरचा खून करून दुसरे दिवशीं कामबक्षाचा नातू मूहिउस्सुन्नत म्हणून होता त्यास सिंहासनावर बसवून शहाजहान दुसरा असें नांव दिलें. पण पुढें सदाशिवरावभाऊ दिल्लीवर आला त्यानें अलीगौहरचा पुत्र जवानबख्त दिल्लींत होता त्यास वलीअहद म्हणून जाहीर केलें. तत्पूर्वीं अलीगौहर शुजाचे आश्रयास राहिला होता. हा बादशहाचा वारस आपल्या हातीं आला, त्याच्या बळावर आपण वजिरी मिळवून दिल्लीचा जम बसवूं अशी उमेद शुजाउद्दौल्यानें धरली. अलीगौहर व शुजा त्यासाठीं प्रथम बिहार प्रांत इंग्रजांचे हातून सोडविण्यासाठीं पटणावर चालून गेले. त्या प्रदेशाचा कारभार इंग्रजांचे तर्फेनें नबाब मीरजाफर मुर्शिदाबादेस राहून करीत असे. त्याचा हस्तक रामनारायण पटणा येथें मुख्य होता. रामनारायणानें अलीगौहर व शुजा यांचा पराभव करून त्यांस परत घालविलें. ते मागें शोण नदीवर येऊन राहिले असतां बातमी आली कीं दिल्लीस गाजीउद्दीननें ता. २९ नोव्हेंबर १७५९ रोजीं बादशहा आलमगीरचा खून करून दुसरा शहाजादा सिंहासनावर बसविला आहे. लगेच अलीगौहरनें लष्करांतच ता. २१ डिसेंबर रोजीं आपला सिंहासनारोहण समारंभ जाहीर करून शहाआलम हें नांव धारण केलें, शुजाउद्दौल्यास

वजिरी दिली आणि ह्या विषयाची खबर दिल्लीस अब्दालीकडे, मराठ्यांकडे व इतर सत्ताधीशांकडे पाठवून इतःपर आपण बादशाहीचे मालक आहों असा जाहिराणा केला.

पण शहाआलमजवळ नाहीं पैसा, नाहीं वजनदार सहायक आणि झगडा पडला इंग्रजांच्या कवाइती पलटणांशीं. कालिओ, नॉक्स वगैरे इंग्रज सेनानी रामनारायणचे साह्यास चालून आले. स. १७६० च्या तीन चार महिन्यांत पटणा काबीज करण्याचे शहाआलमनें अनेक प्रयत्न केले; ते सर्व निष्फळ होऊन त्या सालच्या ऑगस्ट महिन्यांत तो बिहार प्रांत सोडून परत यमुनेवर मुक्काम करून राहिला. ह्या वेळीं अब्दाली मराठ्यांचा झगडा दिल्लीवर ऐन रंगांत चालू होता. दरम्यान पावसाळा संपल्यावर शहाआलमनें फ्रेंचांची मदत घेऊन पुनः पटणावर चाल केली. इकडे पानपतावर ता. १४ जानेवारी स. १७६१ रोजीं मराठ्यांचा संहार उडाला, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं ता. १५ रोजीं पटणाचे पश्चिमेस पांच मैलांवर शहाआलम व इंग्रज यांचा संग्राम होऊन इंग्रज विजयी झाले, तेणेंकरून पूर्व प्रदेश काबीज करून पुनः आपला जम बसविण्याची शहाआलमची उमेद सर्व लयास गेली. याच समयांत मद्रास किनाऱ्यावर इंग्रज-फ्रेंचांचें युद्धही मोठ्या भरांत आलें. ता. १६ जानेवारी रोजीं फ्रेंच राजधानी पांदिचरी इंग्रजांचे हातीं पडली. एवंच जानेवारीचे हे तीन दिवस ता. १४–१६ हिंदच्या इतिहासांतील प्रचंड सत्तापालट दाखवितात. मराठे व मुसलमान हे दोन इंग्रजांचे विरोधी सत्ताधीश नाश पावले त्याबरोबर इंग्रज सत्ता कायम झाली.

पण इंग्रजांचाही हा पहिलाच अनुभव होता. बहुत काळ सारखें युद्ध चालविण्याची ताकद त्यांसही नव्हती. त्यांचा मुख्य चालक क्लाइव्ह स. १७६० त इंग्लंडला परत गेला. शहाआलमला युद्धाचा अनुभव मिळून खात्री झाली कीं इंग्रजांशीं वैर करून आपला निभाव लागणार नाहीं. मेजर कार्नॅक व कप्टिन नॉक्स हे दोन इंग्रज अधिकारी इंग्रजांचें राजकारण चालवीत होते. त्यांनींही या बादशहास भेटून त्याच्याशीं गोडी केली. त्यांनीं बादशहास पटणास नेऊन आपल्या वखारींत जेवणाच्या मेजांचें एक सिंहासन बनविलें, आणि राज्यारोहणाचा समारंभ करून त्याची मालकी प्रांतांत जाहीर केली ( १२ मार्च स. १७६१ ). आपणास दिल्लीस नेऊन तख्तावर बसवावें अशी शहा-

आलमनें इंग्रजांस विनंती केली, ती त्यांनीं तात्पुरती मान्य करून तेवढ्यापुरतें बादशहास खूष केलें. त्याच वेळीं त्यांनीं मीरजाफरास नबाबगिरीवरून काढून त्याचे जागीं मीरकासीमची स्थापना केली होती, त्या अनधिकारी नेमणुकीस त्यांनीं बादशहाची मंजुरी मिळविली. ही सर्व व्यवस्था करणारा इंग्रज मुत्सद्दी वॉरन्हेस्टिंग्स होय. तो तेव्हां पटणाच्या वखारींत इंग्रजांच्या व्यापाराची देखरेख करीत होता.

शहाआलमच्या या हालचाली अब्दालीस दिल्ली येथें कळल्या. त्यानें परत जातांना शहाआलम हाच बादशाहीचा मालक असें जाहीर करून त्यास दिल्लीस येऊन कारभार करण्याची सूचना दिली आणि आपण स्वदेशीं निघून गेला. शहाआलमला भेटण्याकरितां शुजाउद्दौला वजीर म्हणून पटणास आला. उभयतांनीं दिल्लीस जाण्यासाठीं इंग्रजांची मदत मागितली. पण एवढें मोठें जोखीम अंगावर घेण्याचें इंग्रजांनीं मान्य केलें नाहीं. बिहारच्या हद्दीपर्यंत उभयतांस पोंचवून इंग्रज पटणास परत आले. स. १७६१ च्या ता. १२ एप्रिल रोजीं शहाआलम बिहारमधून परत फिरला आणि शुजासह अयोध्या प्रांतांत येऊन छावणीस राहिला. तेथें उभयतांनीं निरनिराळे प्रदेश काबीज करण्याचे पुष्कळ मनोरथ बांधले. स. १७६२ चे आरंभीं त्यांनीं बुंदेलखंडांत प्रवेश केला, पण मराठ्यांनीं त्यांचा तेथें जम बसूं दिला नाहीं. जून महिन्यांत ते दोघे कानपूरजवळ छावणीस गेले. स. १७६३ त अंतर्वेदींत अंमल बसविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, पण रोहिल्यांनीं त्यांना पुढें येऊं दिलें नाहीं. दरम्यान मराठ्यांनीं उत्तरेंत येऊन हळूहळू पूर्वीचा अंमल कायम केला. स. १७६३ च्या ऑगस्टांत राक्षसभुवनावर निजामलीचा पराभव करून मराठे पुनः आपलें सामर्थ्य चहूंकडे प्रगट करूं लागले. हा एतद्देशीयांचा खेळ इंग्रज बारीक नजरेनें लक्षांत घेऊन तदनुसार आपला डाव खेळूं लागले.

मिळून बादशहा अलाहबादच्या आसमंतांत शुजाचे आश्रयास राहून आपणास दिल्लीच्या मसनदीवर कोण बसवितो या विवंचनेंत काळ कंठीत होता. बंगाल-बिहारचा प्रदेश इंग्रजांनीं आपल्या कबजांत आणून एतद्देशीय सत्तांवर शह बसविण्याची कारवाई चालविली. सिराज-उद्दौला, मीरजाफर, मीरकासीम यांची त्यांनीं वाट लावून नबाब ठेवणें किंवा काढून टाकणें हा आपल्या हातचा खेळ आहे हें त्यांचें कसब लोकांत तत्काळ स्पष्ट झालें. सुभेदारास काढतांना त्यांनीं

बादशहाचा उपयोग केला, पण तोच बादशहा आपली मालकी गाजवूं लागला तेव्हां त्यास त्यांनीं विरोध करून परत घालविलें. आपण व्यापारी, शांततेचे पुरस्कर्ते, राज्य कमावण्याच्या नादांत आपण पडत नाहीं, हा मंत्र तोंडानें जपत राहून त्यांनीं एक एक प्रांत हाताखालीं घातला. ईस्ट इंडिया कंपनीचें आद्य स्थान इंग्लंड, हिंदुस्थानांत आपण केवळ व्यापारी ही भावना त्यांना पथ्यकर वाटली. पाहिजे त्या सत्ताधीशांशीं त्यांना मतलबानें वागतां येई. जरूर व शक्य वाटलें तर एखादें राजकारण अंगावर घ्यावें, तें सिद्धीस गेलें तर ठीकच, न गेलें तर तितक्यापुरती माघार घेण्यांत नुकसान नाहीं ही वृत्ति परकीयत्वामुळें त्यांस स्वीकारतां आली ती इकडच्या सत्ताधीशांस शक्य नव्हती. कारण त्यांचे सर्व हितसंबंध येथेंच गुंतलेले असल्यामुळें त्यांस कोणता तरी निश्चित क्रम स्वीकारावा लागे. याच्या उलट वेळ पडेल तसें वागण्याची सोय इंग्रजांस शक्य असे. स. १७६० पासून १७६५ पर्यंत म्हणजे पानिपतपासून दिवाणीपर्यंत इंग्रजी राजकारणाचा हा रंग इतिहासांत नमुनेदार बनलेला आहे. त्यांत एतद्देशीयांच्या विस्कळित लष्करी पद्धति आणि इंग्रजांचें संघटित युद्धतंत्र यांचाही प्रत्यय या वेळीं व्यक्त झाला. याच काळांत सिंदे-होळकर व त्यांचे चालक पेशवे हे दक्षिणेंतील भानगडींत अडकून पडले. तेणेंकरून उत्तरेंत निर्नायकी माजली.

प्लासीच्या संग्रामानंतर इंग्रजांनीं मीरजाफरची नेमणूक नबाबगिरीवर केली. सुमारें तीन वर्षांनंतर क्लाइव्ह स्वदेशीं गेल्यावर त्याचे पश्चात् गव्हर्नर व्हॅन्सिटार्टनें मीरजाफरास नबाबगिरीवरून काढून त्याचे जागीं मीरकासीमची नेमणूक केली. हा प्रकार चार दोन महिने घाटला. ता. २० ऑक्टोबर १७६० रोजीं मीरकासीम स्थानापन्न झाला. तो मोठा बाणेदार असून आपले हक्क बजावूं लागला, तेणेंकरून इंग्रज अधिकाऱ्यांशीं त्याचें वैमनस्य चालू झालें. एतद्देशीयांचा व्यापार सर्व कंपनीनें बळकावला. प्रकरण वर्दळीवर येऊन युद्ध झालें त्यांत पाटणा येथें ता. ५ ऑक्टोबर स. १७६३ रोजीं सुमारें दीडशें इंग्रज कैद्यांची समरूकडून मीरकासीमनें कत्तल करविली. तेणेंकरून त्यांजमध्यें भीषण चीड निर्माण झाली. राजकारणाचा रंग त्वरेनें पालटत गेला. बादशहा व शुजाउद्दौला अंतःकरणानें मीरकासीमला पाठिंबा देत, पण समरांगणावर इंग्रजांच्या लष्करापुढें एतद्देशीयांचा निभाव लागला नाहीं. ता. ४ फेब्रुवारी १७६४ च्या पत्रांत मराठ्यांचा बातमीदार लिहितो, "बंगालचा सुभेदार

मीर कासीमअली खान पळोन शुजाउद्दौला व अलीगौहर यांजकडे आला. बरोबर पांच चार हजार फौज व दहा करोडीची मालियत आहे. वजीर पातशहा सिंदे-होळकर असे सर्व एकत्र होऊन बंगालच्या बंदोबस्त करावा हा इरादा चालला आहे. त्यांची फौज तीस चाळीस हजार जमली आहे. " *

इंग्रजांविरुद्ध एतद्देशीयांचा हा निकराचा सामना होय. तूर्त त्यांत मराठे सामील नव्हते. इंग्रजांनीं मात्र मीर कासीम व त्याचे साथीदार यांचा पुरा नाश करण्याची शिकस्त केली. शुजानें इंग्रजांस कळविलें, " आम्ही बादशहास सिंहासनावर बसविणार, तुम्ही बंगाल-बिहारचा ताबा सोडून द्या, नाहीं तर युद्धास सिद्ध व्हा. " स. १७६४ च्या मे महिन्यांत त्रिवर्गांच्या फौजा पटणावर चालून गेल्या, तेव्हां इंग्रज सेनापति मेजर कार्नॅक त्यांचे सामन्यास चालून आला. ता. ३ मे रोजीं पटणाजवळ पच्छापहाड येथें लढाई झाली तींत शुजा पराभव पावून पळून गेला आणि त्याच्या तोफा वगैरे इंग्रजांच्या हातास लागल्या. हा संग्राम जितका निकराचा झाला, तितकाच तो दोन विरोधी युद्धपद्धतींचा प्रत्यक्ष प्रयोग म्हटला जातो. पाश्चात्य शिस्त व एतद्देशीय अव्यवस्था यांचें प्रदर्शन त्यांत उत्कृष्ट घडून हिंदभूमीचें भवितव्य ठरून चुकलें. तथापि हा संग्राम निर्णायक बनला नाहीं. उत्तर बिहारमध्यें त्या त्रिवर्ग दोस्तांच्या फौजा पावसाळ्याचे चार पांच महिने पावेतों तयारी करून पुनः सामना करण्यास सिद्ध झाल्या. दरम्यान उभयपक्षांत तहाचीं बोलणींही चालू होतीं. इंग्रजांनीं निक्षून कळविलें, " मीर कासीम व त्याचा हस्तक समरू हे आमचे गुन्हेगार आहेत, ते आमच्या कबजांत द्या म्हणजे मग पुढें सलूखाचें बोलणें करूं. " अर्थात् ही मागणी त्या त्रिवर्गांस मान्य झाली नाहीं. पावसाळ्यांत काशीच्या पूर्वेस तीस कोसांवर भागीरथीच्या कांठीं बक्सारच्या मैदानावर हिंदी फौजांचा तळ संग्रामाच्या तयारीनें सिद्ध झाला होता. पर्जन्यकाळ ओसरतांच इंग्रज सेनापति मेजर मन्रो या जमावावर पटणाहून चालून गेला. २३ ऑक्टोबर स. १७६४ या दिवशीं तुंबळ संग्राम घडून शुजाच्या फौजेचा संहार उडाला. खुद्द त्यालाच जीव बचावणें मुष्किलीचें झालें. एका दुराणी घोड्यावर बसून तो जीव घेऊन पळाला. " लढाई मातबर झाली. तरवारी तरवार जाली. संध्याकाळ जाला. शुजाउद्दौल्याचे दोघे मोठे सरदार ठार झाले. सुवर्णभद्रांत (शोणनदींत

* पे. द. २९·५२.

बारा हजार माणूस बुडोन मेले. वस्तभाव गेली. राहिली फौज वाराणसीस आली. बुणगे व पातशहा मागून येत आहेत." ‡

बक्सारच्या या विजयाचा फायदा इंग्रजांनीं भरपूर घेतला. अंतस्थपणें निरनिराळ्या पक्षांची माहिती मिळवून त्यांनीं त्यांच्यांत कलहाचें बीज पेरलें. बादशहाचा सल्लागार मीर्झा नजफखान इंग्रजांनीं चांगला वश करून घेतला होता. काशीचा राजा बळवंतसिंग इंग्रजांचा पक्का दोस्त. अशा अनेक हस्तकांच्या मार्फत मोठा खर्च सोसूनही इंग्रजांनीं आपले मतलब साधून घेतले. मिळून प्लासीच्या लढाईनें इंग्रजी सत्तेची मुहूर्तमेढ बसविली गेली तिला नवीन खचावा या बक्सारच्या लढाईनें प्राप्त झाला, यास्तव हे दोन संग्राम हिंद भूमीची मोठी राजकारणी क्रान्ति दर्शवितात. शुजा तर इतका बेहिंमत झाला कीं इतःपर इंग्रजांशीं वैर न करितां त्यांच्याशीं स्नेह जोडण्याचा विचार त्यानें चालविला, आणि इंग्रजांस कळविलें, "माझ्या कमनशिबामुळें मीरकासीमच्या नादास लागण्याची बुद्धि मला झाली; आपला सल्ला मीं ऐकला नाहीं, आतां आपण उभयतांनीं असा स्नेह बनवूं या कीं तो सिकंदराच्या भिंतीप्रमाणें अभेद्य राहील." इकडे बादशहा तर सर्वथा पगडी फिरवून ज्या शुजानें त्याच्याकरितां एवढें युद्ध चालविलें, त्याच्याच वर त्यानें सर्व दोष लादला. त्यानें इंग्रजांस लिहिलें, "वजिराचा पराभव झाला तें ठीकच झालें. त्याच्या कर्माचें प्रायश्चित्त त्याला मिळालें. हा इंग्रजांचा विजय नसून तो मी माझाच समजतों. मी तूर्त दिल्लीचा विचार न करतां आपल्या कृपाछत्राखालीं बनारसलाच राहातों. मात्र भलें बलवान लष्कर बरोबर देऊन मला दिल्लीस पोंचवा म्हणजे झालें." *

**४. बादशहाचें आसन प्रयाग**—ह्या सर्व प्रकरणांत नागपूरकर भोसले पूर्णपणें निजून राहिले हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय. रघूजीच्या प्रभावानें व भास्कर-रामादि एकवीस वीरांच्या रक्तमोलानें पैदा केलेलें पूर्व हिंदचें हें क्षेत्र भोसल्यांनीं सहजासहजीं गमावणें ही राष्ट्रीय आपत्तिच गणली पाहिजे. मीरकासीमचें इंग्रजांशीं फाटत चाललें तेव्हांपासून तुम्ही आपल्या मालकीच्या प्रदेशाच्या बचावास धावून

‡ पे. द. २९. ५०; प० कॅ० १.२४१२, २४५३.

* प० कॅ० १. २४६७, २४६९, २४८५, २५१६.

या अशीं आर्जवें जानोजीकडे कर करून तो थकला. * पेशव्याचें साह्य संपादून बंगालचें रक्षण करण्यास धावण्याऐवजीं जानोजीला अवदशा आठवली निजामाच्या साह्यानें पुणें जाळण्याची. माधवरावानें त्याला ताळ्यावर आणण्याची शिकस्त केली. पण विहिरींतच नाहीं तें पोहऱ्यांत तरी कुठून येणार! नागपुरकरांना आपलें घर सांभाळवत नव्हतें ते राज्य काय सांभाळणार! पैशाशिवाय फौज नाहीं आणि बुद्धिशिवाय पैसा नाहीं. मिळून सर्वच अंधार. बक्सारच्या लढाईचें मर्म भोसल्यांस उमगलें नाहीं. पुढें जेव्हां इंग्रजांनीं बडगा दाखविला तेव्हां ते बोटें चावीत स्वस्थ बसले. पेशव्याला हीं स्वप्नें पूर्वींच पडलीं होतीं, म्हणून त्यानें जानोजीवर विसंबून न राहतां बक्सारच्या पूर्वींच सिंदे-होळकरांस उत्तरेंत रवाना केलें. पण त्याच संधींत रघुनाथराव दादानें सिंद्याचे दौलतीवर मानाजीस आणून महादजीस बंडखोर ठरविलें. तेणेंकरून महादजी आपला घरचाच जम बसविण्यांत गुंतून राहिला. मल्हाररावांत आतां पूर्वींचें तेज उरलें नव्हतें. शिवाय प्रभावी राजकारणापेक्षां नजीकच्या अल्पप्राप्तीवर होळकराची नजर खिळलेली असे. जाठाचें वैर त्याचे अंतःकरणांत सलत असल्यामुळें त्यानें पूर्वहिंदच्या राजकारणांत लक्ष घातलें नाहीं. बक्सारनंतर तो इंग्रजांचें नियंत्रण करण्यास चालून गेला तेव्हां फजीत पावून परत फिरला तो प्रकार पुढें कळेल.

बक्सारवर हिंदी सत्ताधीशांचा वरील अटीतटीचा झगडा चालू असतां पेशवा माधवराव हैदरखानाशीं धारवाडवर संग्राम चालवीत होता. दादा नाशकास स्नानसंध्येच्या व्यवसायांत निमग्न; उत्तर हिंदचा व्याप त्याचा होता, पण इंग्रजांचें आक्रमण त्यास उमगलें नाहीं. दिल्लीकडे नजीबखान व जवाहीरसिंग जाठ यांचें यावेळीं युद्ध जुंपलें असून उभयतांनीं मराठ्यांकडे साह्याची मागणी केली. ता. २८ सेप्टेंबर स. १७६४ रोजीं दादा होळकरास लिहितो, "जाठाची व नजीबखानाची अदावत पडोन कलह वाढला आहे. तुम्हांस सामील करून घ्यावयाचीं साधनें करतात. त्यास आपणास जो मनसबा युक्त व सरकारकामाचा दिसेल तोच करावा. नजीबखान कोणेप्रकारें सरकारांत रुजू आहे, तेंही तुम्ही जाणतां. सबब सर्वथैव जाठाचें साहित्य करणें त्यांत उपयोग व नफाही आहे." या पोकळ मोघम आज्ञा मालकास शोभत नाहींत. यावेळीं इंग्रजांच्या आक्रमणाचीं शहाआलम मीरकासीम यांच्या हालचालींचीं भरपूर वर्तमानें दादास पोंचलेलीं

* प० कॅ० १.२४२५.

होतीं. एक हितचिंतक दादास लिहितो, "तुम्हांस अब्दाली, अलीगौहर, नजीबखान यांच्या ज्या गोष्टी सांगितल्या, तदनुसार परिणाम घडोन आला. त्यांचीं दगाबाजीचीं कर्मे प्रसिद्ध आहेत. प्रस्तुत नजीबखानानें सुरजमल्लास कौल दिलासा देऊन बोलावून मारून टाकिलें ( ता. २५ डिसेंबर स. १७६३ ), त्याचा पुत्र जवाहरसिंग ( यास राणी किशोरीनें दत्तक घेतलें, ) तुमचे ठायीं निष्ठा ठेवतो. आपण सर्व एकत्र जाल्यास नजीबखान सुजाउद्दौला यांचें पारिपत्य होईल." † अशीं हीं सर्व ठिकाणचीं वर्तमानें कळत असतां दादाला उत्तरेची क्षिति वाटली नाहीं. बादशहाचे संरक्षणास धावून जाण्याचा, त्यास दिल्लीस आणून स्थापण्याचा हा योग होता. तें काम स्वतः हातीं न घेतां नुसते पोकळ हुकूम उत्तरेंत पाठवून स्वतः पुतण्याची कुरापत काढण्यास हा दादा जरूर नसतां कर्नाटकांत गेला.

दादाच्या धरसोडींत आणखी भर घालण्यास मल्हारराव होळकराचा कावा कारण झाला. नजीबखान त्याचा मानीव पुत्र आणि जाठाशीं त्याचें पूर्वीचें वैर, पण आतां प्रसंग आला जाठाचें साह्य करून नजीबखानाशीं संग्राम करण्याचा, अर्थात् अंतःकरण निराळें ठेवून त्यानें बाहेरचा देखावा उलट ठेवला. बहुधा दोन्ही पक्षांकडून पैदास करून त्यानें जाठाचेंही साह्य केलें आणि नजीबखानाचाही बचाव केला. बिचारा बादशहा बाहेर रानोमाळ भटकतो, त्याच्या संरक्षणाची हमी मराठ्यांनीं घेतलेली याची क्षिति कोणालाच नाहीं. स. १७६५ च्या फेब्रुवारींत जाठ व नजीबखान यांचा तह घडवून या अनिष्ट प्रकरणांतून होळकरानें आपलें अंग काढून घेतलें. *

मीरकासीम व समरू हे इंग्रजांचे प्रबळ विरोधी बाहेर नानाप्रकारच्या खटपटी व कारस्थानें करीत असल्यामुळें इंग्रजांस सारखी त्यांची दहशत वाटत होती. त्यांना हवालीं केल्याशिवाय शुजाशीं सलुखाच्या गोष्टी सुद्धां ते बोलेनात. शुजानें त्यांस जबाब दिला, "मीरकासीम आमचा पाहुणा, त्यास स्वाधीन करणें अधर्म होय." पण इंग्रजांना धर्माधर्माची क्षिति थोडीच होती. बक्सारच्या

---

† पे. द. २९, ७२, ७३, ७९.

* नजीबखान व जाठ यांच्या युद्धाचे तपशील पुष्कळ आहेत ते येथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. त्यासाठीं सर जदुनाथ यांचा फॉल २, पृ. ३३४ – ३४२ पाहा.

संग्रामानंतर लगेच इंग्रज सेनानी फ्लेचर शुजाचा पाठलाग करीत शोण नदीवरून चुनारगड बनारसला पोंचून अलाहबादेपर्यंतचा प्रदेश काबीज करीत आला. त्याजपुढें शुजाचा निभाव कसा लागावा ! ता. ११ फेब्रुवारी स. १७६५ रोजीं इंग्रजांनीं अलाहबादचा किल्ला काबीज केला. त्यांचे आश्रयास बादशहा होताच. हा किल्ला मूळ बादशहाचा, आम्ही तो बादशहाचे हवालीं करतों असें सांगून तेथेंच त्यांनीं त्याची राहाण्याची सर्व सोय लावून दिली, आणि बादशहाचे संरक्षणासाठीं म्हणून किल्ल्यांत आपलें लष्कर कायमचें ठेवून दिलें. परिणाम असा कीं अलाहबादेंत इंग्रजांचें ठाणें बसलें तें पुढें त्यांजकडे कायम राहिलें. कलकत्ता लांब पडला; मध्यें आपणास शत्रूंच्या बंदोबस्तासाठीं म्हणून नाक्यावरचें ठाणें चुनारगड त्यांनीं बादशहापासून मागून घेतलें आणि तेथें बांधकामें करून सर्व प्रदेशावर देखरेख राहील अशी तजवीज बनविली. ‡

एवंच प्रयागपासून बंगाल समुद्रापर्यंतचा प्रदेश इंग्रजांचे कबजांत गेला. मात्र हा सर्व कारभार त्यांनीं बादशहाचे नांवानें केला. या कामांत मीर्झा नजफखानानें इंग्रजांचें साह्य केलें आणि त्यांच्याच शिफारसीनें तो पुढें बादशहाचा मुख्य सल्लागार बनला. नजफखानाचे मार्फत इंग्रजांनीं जाहीरनामा प्रसिद्ध करून लोकांस कळविलें, " बादशहा राज्याचा मालक आहे. आम्ही केवळ त्याचे निष्ठावंत सेवक आहों. " §

**५. मराठ्यांचें मागें पाऊल**—चार दोन महिन्यांत बादशहा व वजीर असे कोसळून पडले, हा प्रकार शुजाचे जिव्हारीं लागला. संकटांत त्याला पूर्वपरिचित सिंदे-होळकरांचें स्मरण झालें. पंधरा वर्षांपूर्वी त्यांनीं धावून येऊन शुजाचे बापास संकटमुक्त केलें, तोच प्रकार पुनः उद्भवला. यावेळीं मल्हरराव स्वतः दुआबांत व सिंदे माळव्यांत होते. ता. ३० मार्च स. १७६५ रोजीं गंगोबा-तात्या लिहितो, " जाठाचा सलूख नजीबखानाशीं जाल्या उपरी अंतर्वेदच्या बंदोबस्ताकरितां अनूपशहरीं आलों. तेथें नबाब शुजाउद्दौला येऊन भेटले.

---

‡ प० कॅ० १, २५६९, २५७१, २५७६, २५८३, इत्यादि पत्रें इंग्रजांचीं व बादशहाचीं कारस्थानें स्पष्ट दाखवितात.

§ सेयर मुताखरीनचा कर्ता गुलाम हुसेन शुजाचे तर्फेनें चुनारगडचा किल्लेदार होता. त्यानें अल्पकाळ किल्ला लढविला. मदत न आल्यानें निरुपाय होऊन इंग्रजांना शरण जाणें त्याला भाग पाडलें. त्याचा तो ग्रंथ बहुमोल मानला जातो.

कित्येक निखालस भाव बोलून साह्य व्हावयाचा करार करून गेले. त्याउपर सुभेदार इटाव्यास आले. काम उरकोन गंगातीरीं मेहदीघाटास जाणार. " *

यावेळीं मल्हाररावाची मोठी तारांबळ उडाली होती. "अंतर्वेदच्या मुलखाचा बंदोबस्त जाल्यानंतर शुजाउद्दौल्याचे कुमकेस जावें आणि फिरंग्यांस प्रयाग घेऊं न द्यावा ऐसा मनसबा आहे." यावेळीं युद्धाचें साहित्य स्वतः अहल्याबाई करून पुरवीत होती. पुढें मे महिन्यांत होळकर-इंग्रजांचा सामना झाला त्याचें वृत्त सेयर–मुताखरीनमध्यें दाखल आहे, तें असें. "मल्हारराव होळकराची मदत संपादन करून त्याची व आपली फौज एकत्र जमल्यावर शुजाउद्दौलानें इंग्रजांशीं सामना करण्याचें ठरविलें. गाजीउद्दीनही कांहीं थोडी फौज घेऊन त्यास सामील झाला, पण त्याजमध्यें आतां पूर्वीची तडफ उरली नव्हती. बक्सारच्या प्रसंगानें सर्वांची हिंमत उडाली होती. इंग्रजांचा सेनानी फ्लेचर याची नजर एतद्देशीयांच्या हालचालींवर खिळलेली असून तो अलाहबादेहून वर या जमावावर चढाई करून गेला. मल्हाररावानें आपला गनिमी कावा लढवून इंग्रजांच्या सभोंवार घिरट्या घालून आजूबाजूचा प्रदेश उध्वस्त केला, त्यामुळें आपणांस दाणावैरणीची पंचाईत पडेल अशी धास्ती इंग्रजांना वाटूं लागली, म्हणून फ्लेचरनें एकदम ता. ३ मे रोजीं हिंदी फौजांना सोयीच्या ठिकाणीं गांठून बेधडक तोफांनीं सडकलें. कुराच्या मैदानावर हा सामना घडून आला. इंग्रजांच्या तोफांपुढें होळकराच्या गनिमी काव्याचा निभाव लागेना." याच संग्रामाचें वर्णन आप्पाजीरामानें पुरंदऱ्यास ता० २७ जूनच्या पत्रांत लिहून पाठविलेलें उपलब्ध आहे, तें असें. "तदनंतर फिरंगी चालोन आले, त्यांशीं झुंज मातबर झालें. चारपांचशें घोडे, चाळीस पन्नास उंटें व तीन तोफा आणल्या. तेंही दम धरून मुक्कामास आले. आम्ही घेरा घालोन होतों, तों बातमी आली, रोहिले पठाण एकत्र होऊन बुणग्यावर आले. मग तैसेच चालोन काल्पीस बुणगे उतरून पुनः गंगाधरतात्यास फौज देऊन रवाना केलें. तेथें एक लढाई जाली.

---

* रा. खं. १२-६८. यावेळीं अहल्याबाई होळकराचे स्वारींत होती. तिचा नाद तीर्थयात्रेचा. मथुरावृन्दावनकडे ती देवदर्शन करूं लागली हा प्रकार सासऱ्यास खपला नाहीं. त्यानें बहुत-रोषाचीं पत्रें बाईस लिहून ताबडतोब ग्वालेरकडे जाऊन लष्कराची तयारी करण्याची आज्ञा तिला केली. कौटुंबिक संबंधांत हे कागद वाचण्याजोगे आहेत. हो. इ. सा. १. मल्हाररावाची कारकीर्द २११–२१७ व २२०–२३०.

हरोळ तमाम बुडविला. फिरंग्यांचीं दोन पलटणें, हजार घोडे, चारशें उंटें, वाणांच्या कैच्या, वीस पंचवीस निशाणें आणलीं. ते गावचा आश्रय करून राहिले. तेथें चार सहा कोस पावेतों फौजांस पाणी नव्हतें, यामुळें उलटोन (तात्या) काल्पीस आले, नाकेबंदी केली. मग चारपांच नावा मेळऊन रातबा धरून (ते फिरंगी) यमुना उरतले, तोफाखालीं मोर्चे उधळले. चारपांच घडी युद्ध जालें. परंतु बेदड * भारी त्यामुळें घोड्यांचा नाइलाज झाला. म्हणून गनिमीकावा देऊन बेदड पुढें देऊन उभे राहिलों. इंग्रज काल्पींत ठाणें बसवून माघारे गेले. आम्ही उलटोन त्यांचें ठाणें काढून आपलें ठाणें बसविलें. तेथून उमरगडचा बंदोबस्त करून ग्वाल्हेर प्रांतें चाललों आहों."

याप्रमाणें होळकरास इंग्रजांपुढें माघार घ्यावी लागली. अलाहबादेंतून त्यांस हुसकून देणें तर दूरच, परंतु उलट त्यांनीं मल्हाररावास काल्पीवरही टिकूं दिलें नाहीं. ता० २२ मे रोजीं फ्लेचरनें दोन निवडक तुकड्यांनिशीं यमुना ओलांडून काल्पीवर होळकराचा तळ होता, तेथून त्यास हुसकून दिलें. मात्र आणखी मराठ्यांचा पाठलाग करीत पुढें जाणें धोक्याचें वाटून फ्लेचर मागें फिरून अलाहबादेस परत गेला. "इंग्रजांपाशीं तोफांचा मार फार तेव्हां लोकांनीं तन न दिल्हें. निघाले. मल्हारबा काल्पीवर आले. फार खट्टे आहेत. इंग्रजानें शुजाउद्दौल्याचें व गाजीउद्दीनचें लष्कर सर्व लुटून घेतलें." § एतद्देशीय सत्तांना इंग्रज भारी झाले. पाश्चात्य तोफांपुढें गनिमीकावा निरुपयोगी ठरला. पानपतावर याच बाबतींत मल्हाररावाचा भाऊसाहेबाशीं विरोध बनला. पण आतां कुराच्या मैदानावर त्याला प्रत्यक्ष प्रचीति येऊन आपलें जीवितसाफल्य संपल्याची त्याला जाणीव झाली. एक वर्षानें तो मृत्यु पावला.

"श्रीप्रयागीं किल्ल्यांत अंमल फिरंग्यांचा आहे. कुराजहानाबादचा मुलुख त्यांनीं बादशहास भक्षावयास दिला तो घेऊन बाहुल्याप्रमाणें पातशहा आहेत. दिल्लीकडे पुढें जाण्याचा जोर नाहीं" हा इत्यर्थ या संग्रामांतून निष्पन्न झाला. बादशहा केवळ उसाचें वाळलेलें चिपाड मात्र बनला. मल्हारराव होळकर हा एकच मराठ्यांचा मुख्य पुढारी प्रकाशमान असून तो खचल्यावरोवर उत्तरेंतील

---

* चिखलांत रुतलेलीं वनस्पतींचीं मुळें.

§ ख. ५७५; त्रै. ९. २ ले० ६ पृ. ३१; पु. द. ३·१२७. उमरगड हें ठिकाण काल्पी-ग्वाल्हेर रस्त्यावर सिमथर संस्थानचे हद्दींत भांदेर व मोट यांचे मध्यें आहे.

मराठ्यांची सत्ता इंग्रजांपुढें निष्प्रभ बनली. हा प्रत्यय येऊन खुद्द बादशहा व त्याची प्रभावळ शुजा, गाजीउद्दीन, नजीबखान वगैरे समान संकटानें जगायचें कीं मरायचें या विवंचनेंत चूर झाले. मराठे हिंदुस्थानास आळा घालतील हा समज फोल ठरला. तूर्त या अंधारमय क्षितिजावर फक्त एक तरुण पेशवा तेवढा अल्पकाळ चमकूं लागला, तों त्याला मृत्यूनें गांठलें. प्रश्न राहिला तो इतकाच कीं इंग्रजी सत्ता दृढ होण्यास कालावधि किती लागणार. या संबंधांत शुजा-उद्दौल्यानें अहंमदखान बंगसास उपाय विचारला. मल्हाररावाचा पाडाव झाल्याबरोबर पहिली प्रत्यक्ष गदा आली शुजावर. तो उघड इंग्रजांचा वैरी मीर-कासीमला जवळ घेऊन बसलेला. अलाहबाद हातचा गेला. आतां पाळी लखनौची. संपला कारभार. अशा अडचणींत शुजानें विचारल्यावरून अहंमदखान बंगसानें त्यास चक्क सांगितलें, "दुसरा कोणी तुमच्या साह्यास येईल ही अपेक्षा आतां सोडा. छाती असेल तर स्वतः इंग्रजांवर चालून जा. जय न मिळाला तर मरून जा. तशी हिंमत नसेल तर बिलकूल लाज न धरतां एकदम एकट्यानें जाऊन इंग्रज सेनापतीचे पाय धरा. ते सांगतील त्या अटी मान्य करून स्नेह जोडा." *

महादजी सिंद्याचें या घडामोडींकडे लक्ष होतें, पण अद्यापि त्याची व दौलतीची व्यवस्था लागलेली नसल्यामुळें त्याला जबाबदारीनें वागतां आलें नाहीं. स. १७६५ च्या जून महिन्यांत तो कोट्यानजीक असतां लिहितो, "येथील मामलत झाल्यावर होळकरांकडे जावें लागतें. तिकडील पत्रें आलीं आहेत कीं फिरंग्यांची व यांची लढाई झाली. होळकर माघारीं काल्पीस आले. तिकडील राजकारण भारी आहे त्यासाठीं त्वरेनें जावें लागतें." ता० १० ऑगस्ट १७६५ रोजीं त्यानें पुण्यास लिहिलें, "अतःपर होळकरांकडे जात आहों. त्यांचा मुक्काम दतियावर आहे. ते व आम्ही एकत्र होऊन मातबर कामें करावीं हाच अर्थ चित्तांत धरला आहे." "सांप्रत फिरंग्यांची आवई श्रवण होऊन प्राकृत जनांस अनेक कुतर्क होतात. पण सुभेदार व गंगाधरतात्या प्रतापमूर्ती आहेत, यशच घेतील म्हणून चिंता वाटत नाहीं" असें दुसरा एक गृहस्थ लिहितो. § उत्तरेंतील हे सर्व बनाव हैदराच्या स्वारीहून पेशवा स. १७६५ च्या पावसाळ्यांत पुण्यास आल्यावर त्याला कळले. तेव्हां विचार होऊन दादानें उत्तरेंत जावें

* आशीर्वादीलाल कृत शुजा० च०, भा. २, पृ. २ ; पे. द. २९.९८,१११.

§ रा. खं. १२.७९ ; रा. खं. १३. १५ ; चं. ९६.

असें ठरलें. प्रत्यक्ष निघण्यास दादाला विलंब लागला. त्याचा कारभारच ढिलाईचा.

**६. क्लाइव्हची दिवाणी** — स. १७६५ चा हा उन्हाळा हिंदी राजकारणांत एक प्रचंड उलथापालथ घडवून आणीत होता. बादशहा व शुजाउद्दौला हे दोन पूर्व हिंदचे मालक इंग्रजांचे ताबेदार बनले. नजीबखान रोहिला आतां अधोगतीस लागला. शीखांनीं नुसतें अब्दालीलाच अडवून धरलें असें नाहीं, तर दिल्ली सुद्धां गिळणार कीं काय इतके ते विक्रमशील होऊन नजीबखानास विरोधक बनले. महादजी सिंद्याचा उदय अद्यापि क्षितिजावर नव्हता. कलकत्त्यास क्लाइव्हचे पश्चात् व्हॅन्सिटार्ट कंपनीचा गव्हर्नर झाला, तो स. १७६४ च्या नोव्हेंबरांत निवृत्त होऊन त्याचे जागीं स्पेन्सर अधिकारावर आला. तो व दोन लष्करी अधिकारी कार्नॅक व फ्लेचर हे आतां पुढें आलेलें राजकारण हाताळीत होते. बादशहा आपल्या राजधानीस जाण्याची त्वरा करीत होता. चुनारगड, बनारस व प्रयाग हीं प्रमुख ठिकाणें इंग्रजांचे कबजांत होतीं. तेव्हां आतां बादशहास घेऊन दिल्लीस जायचें, कीं प्रयागावरच थांबायचें, अथवा राज्यस्थापनेचा नाद सोडून परत पाटणावर जाऊन पूर्ववत् व्यापार चालवायचा, हा कंपनीच्या चालकांपुढें प्रस्तुतचा प्रश्न होता. कार्नॅकनें नजीबउद्दौल्यास कळविलें, "आम्ही व्यापारी, आम्हांस राज्याच्या भानगडी नकोत. मीरकासीम व सुजाउद्दौला आमच्यावर चालून आले, त्यांस शासन करणें आम्हांस भाग पडलें. आतां आम्ही बादशहाचे बंदे सेवक आहों. जे कोणी बादशहाचे हित-चिंतक ते आमचे दोस्त, जे विरोध करतील ते शासन पावतील." ( ३० मार्च १७६५ ) *

दरम्यान हिंदुस्थानांतील हे प्रकार इंग्लंडांत कंपनीच्या चालकांस पोंचले. पाटणाची कत्तल, बक्सारच्यासारखे संग्राम, बादशहा वजीर इत्यादींच्या घालमेली हे अनर्थ ऐकून ते चालक काळजींत पडले. संकटकाळचा रामबाण उपाय म्हणजे क्लाइव्ह अशी तिकडे त्याची ख्याति होती. बंगाल प्रांतांत सर्वत्र अंदाधुंदी, लष्करी खर्च बेसुमार वाढलेला, व्यापाराची किफायत शून्य, असे हे उत्पात एकदम आवरले नाहींत तर भलतेंच अरिष्ट ओढवेल, या सर्वांचा बंदोबस्त करण्यासाठीं क्लाइव्हची नेमणूक होऊन तो इकडे आला. हिंदुस्थानचें स्वामित्व

---

* प० कॅ० १ · २६०९.

आपण एकदम स्वीकारावें, हें पिकलेलें फळ चोरापोरांच्या तोंडीं पडूं न देतां तें आपणच कां न घ्यावें ही भावना क्लाइव्हला पूर्वीच होती. ती संधि त्याला आतां प्राप्त झाली. त्याचा तळीराम अगोदर चांगला गार झालेला असल्यामुळें सहजीं त्याला कंपनीच्या खाबू बहादरांची दुर्नीति मोडण्याचा योग जमून आला. इंग्रजी सत्तेचा पाया हिंदुस्थानांत घालण्याचें भाग्य त्याला लाभलें. मात्र इकडच्या कंपनीच्या नोकरांना क्लाइव्हची ही नेमणूक पसंत पडली नाहीं. त्याचा घमेंड-खोर बेगुमान स्वभाव सर्वांच्या परिचयाचा होता. थोड्याच अवधींत तो अप्रिय होऊन इंग्रज फौजेनें बंड देखील केलें. ता. ४ जून १७६४ रोजीं लंडन सोडून क्लाइव्ह ३ मे १७६५ ला कलकत्त्यास अधिकारावर दाखल झाला आणि दीड वर्ष कारभार करून ता. २९ जानेवारी स. १७६७ रोजीं परत गेला. त्याच्या कृत्यांचा मराठी राजकारणावर काय परिणाम झाला तें आतां पाहूं. *

क्लाइव्हच्या येण्यानें एक नवीन तरतरीत व अकलुषित दृष्टि हिंदच्या राजकारणास प्राप्त झाली. जाग्यावर कुचंबणाऱ्यांना जे प्रकार दिसायचे नाहींत ते दूरच्या दृष्टीनें हाताळणारी एक जबरदस्त व्यक्ति यथे प्रगट झाली. स्वतः भरभक्कम रकमा गडप करणारा हा गडी लोकांस नागवणाऱ्या कंपनीच्या नोकरांस आळा घालायला निर्माण झाला. कंपनीच्या कारभारांतील घाण जशी त्याला चांगली माहीत होती, तशीच मराठे, रोहिले, जाठ, शीख वगैरे स्थानिक सत्ताधीश एकूण एक इंग्रजांच्या आक्रमणाचे द्वेष्टे असून ते सर्व विरोधी जूट बनविण्याच्या तयारींत आहेत हेंही त्याला कळून चुकलें. हे एक झाले तर केव्हांच आपला धुव्वा उडवितील हें त्यानें बरोबर ताडलें. त्याची मुख्य करामत ही कीं बादशहा, वजीर, बंगालकर नवाब हे मूळचे एका साखळीचे घट्ट बसलेले दुवे पुनः सांधले जाऊं नयेत, त्यांचें नांव व बडेजाव कायम राहावा, पण आर्थिक बळ त्यांचें खची व्हावें, अशी स्वतःची योजना त्यानें निर्माण केली. शुजाउद्दौल्याचा अयोध्या प्रांत इंग्रज फौजेच्या लष्करी धाकांत आलाच होता, तो घास एकदम गिळणार नाहीं हें ओळखून, येतांक्षणीं त्यानें प्रत्येकाशीं गोड पत्रव्यवहार करून त्यांच्या क्षुब्ध वृत्तींस शांति आणिली; † आणि विरोधी कारस्थानांचा बीमोड करण्याच्या

* ब्रि० रि० उत्तरार्ध, प्रकरण २ व ३ वरील संदर्भ पाहा.

† उदाहरणार्थ प. कॅ. १. २६५४, २६६२, २६७४, इ. भा. ले. २६८७ व २६८८ बादशहाच्या मागण्या सांगतात.

उद्देशानें लगोलग २५ जून रोजीं कलकत्ता सोडून भागीरथीच्या नौकामार्गानें तो बनारसला गेला. तेथें शुजा व बादशहा यांच्या भेटी घेऊन व बोलणीं करून त्यानें त्यांचा संतोष संपादिला. बादशहानें तगादा लावला कीं मला माझ्या राजधानींत पोंचवा. ती गोष्ट तत्काळ मान्य करून क्लाइव्हनें त्यास लेखी वचन दिलें कीं सवड होतांच तुम्हांस दिल्लीस पोंचवूं. बादशहाच्या निर्वाहास त्यानें शुजाचे कुरा व अलाहबाद हे दोन जिल्हे तोडून दिले. अयोध्येचा मुलूखही शुजाचा निर्वेध करून दिला. मात्र पुनः आपण इंग्रजांविरुद्ध उठणार नाहीं असे करार दोघांकडून लिहून घेतले. इंग्रजांस बादशहानें बंगाल-बिहार प्रांताची दिवाणी म्हणजे वसूल घेण्याचा हक्क कायमचा दिला आणि त्याचे बदल्यांत दरसाल बादशहाचे खर्चास २६ लक्ष रुपयांचा तनखा देण्याचें क्लाइव्हनें कबूल केलें. वजिराचा करार ता. २ ऑगस्टचा व बादशहाचा १२ ऑगस्टचा आहे.

प्राप्त परिस्थितींत शक्य असलेली योजना घडवून क्लाइव्हनें हिंदी राजकारणास स्थैर्य आणून येथें इंग्रज सत्ता कायम केली हा प्रकार स्पष्ट होतो. युद्धानें उद्भवलेली हिंदी सत्ताधीशांच्या मनांतील आग त्यानें विझविली आणि शुजा व बादशहा यांस कागदावर दोस्त पण वस्तुतः इंग्रजसत्तेचे दास बनविलें. एक महिन्यांत हा सर्व प्रयोग झटपट उरकून तो सेप्टेंबरांत परत कलकत्त्यास गेला. "बंगाल सारा इंग्रजांचे स्वाधीन, सर्व इकडे यांचें, मध्यें दुसरे कोणी नाहींत, जे आहेत ते यांचे स्थापित आहेत," असा क्लाइव्हच्या शिष्टाईचा इत्यर्थ पेशव्याच्या वकिलानें पुण्यास लिहून कळविला. * इंग्रज फौज शुजा व बादशहा यांचे संरक्षणास राहावयाची तिचा खर्च क्लाइव्हनें त्यांजपासून घेऊन त्यांस दोस्त बनविलें. बंगाल समुद्रापासून हिमालयपर्यंत इंग्रजसत्ता निर्वेध झाली. मराठ्यांच्या हातांतला डाव इंग्रजांनीं उपटला.

**७. दादाचें अपयश** — क्लाइव्हचा कारभार फार दिवस टिकला नाहीं आणि त्याचा मराठ्यांशीं तसा प्रत्यक्ष संबंधही आला नाहीं. बादशहानें मराठ्यांचा आश्रय सोडला याची दखल घेणें दादाचें काम होतें. स. १७६५ अखेर तो उत्तरेंत गेला, त्यावेळीं बादशहाला धास्ती पडली कीं मराठे दिल्लीचा कबजा घेतील म्हणून त्यानें इंग्रजांस टोचणी लाविली कीं मला प्रथम दिल्लीस पोंचवा. याचा अर्थ हा कीं ज्याच्या हातांत बादशहा तो या देशाचा स्वामी, असा

* पे. द. २९.९०, ११०, १११.

आतां राजकारणाचा रंग बनला. होळकरानें मार खाल्ल्यावर त्याला सिंद्याच्या साह्याची गरज भासून महादजीला त्यानें आपल्याकडे बोलावलें; आणि महादजीही दतियाकडे मल्हाररावास भेटण्यास गेला. दरम्यान दादाची स्वारी चाळीस हजार फौजेनिशीं दक्षिणेंतून निघून स. १७६६ च्या एप्रिलांत झांशी-जवळ आली, तों सिंदे-होळकरांनीं बुंदेलखंडचा अंमल बसवून गोहदच्या जाठावर चढाई सुरू केली होती. 'पातशहाचा शुका आला कीं जलद येऊन पोंचावें, पातशहातीचा बंदोबस्त करावा, त्या अन्वयें उत्तर प्रांतें जाण्याची बहुत त्वरा, एक दिवस महिन्याचे जागां आहे," अशा घमेंडींत दादा निघाला, पण अंगचा दीर्घसूत्रीपणा कसा जावा ! होळकराची व त्याची गांठ पडते तांच मल्हारराव ता. २० मे स. १७६६ रोजीं झाशी प्रांतांत आलमपुरजवळ मरण पावला. दादा व महादजी सिंदे त्या प्रसंगीं जवळ होते. दुसरे प्रमुख मराठे सरदारही तेथें होते. "मरणापूर्वी सुभेदारांनीं श्रीमंतांशीं महादजीची भेट करविली. वैशाख शु० ११ मंगळवारीं दोनप्रहरीं देवाज्ञा जाली. मातुश्री दारकाबाई व बजाबाई यांनीं सहगमन केलें. अहल्याबाई समीप होती तिनें पुत्र मालरावास इंदुरीं पत्र पाठवून धीर दिला. एकच पुत्र खंडेराव पूर्वी कुंभेरीवर वारला. दोघी मुली उदाबाई वाघमारे व सीताबाई हयात होत्या." जवळचा नातलग तुकोजी होळकर हाताखालीं वाढविलेला होता, त्यानें अहल्याबाईच्या हुकमतीखालीं पुढें होळकरशाहीचा कारभार चालविला. मल्हाररावाची स्त्री हरकूबाई म्हणून खांडाराणी होती, तिनेंही पुढील कारभारांत भाग घेतला. §

दादासाहेबाची स्वारी उत्तरेंत येतांच मराठ्यांच्या आकांक्षांना तेज चढलें. पुष्कळांकडून त्याजकडे मदतीच्या मागण्या आल्या. अल्पकाळ आशा उबद्धली कीं जाठ, शीख, रोहिले या सर्वांस मिळवून घेऊन दादा बादशहाची व्यवस्था दिल्लीस लावील. बादशहानेंही आपले वकील दादासाहेबाकडे पाठविले, त्याबद्दल क्लाइव्हला भारी राग आला. पण परिणामास कांहींच आलें नाहीं. गोहदकर जाठानें मराठ्यांस अडवून धरल्यामुळें त्याचा निकाल लावल्याशिवाय दादाला पुढें चंबळपलीकडे जातांच येईना. त्याची तारांबळ उडाली. कलकत्त्यास इंग्रजांकडे त्यानें आपला वकील पाठवून त्यांच्या साह्याची याचना केली आणि दोघांनीं मिळून बादशहाची व्यवस्था लावूं अशी सूचना केली, ती ते थोडीच

---

§ चं. १०४, १०५, १६६; हो० इ० सा० १. २५३–२५४.

मान्य करणार ! क्लाइव्हनें गोड पण ठासून जबाब पाठविला, त्यांत त्याचा द्वेषच व्यक्त झाला. *

बाजीराव पेशव्यानें छत्रसालाचें साह्य करून प्रथम बुंदेलखंडचा प्रदेश मिळविला, तेव्हां गोहदकर राण्यास त्यानें आपल्या आश्रयाखालीं घेऊन त्याची व्यवस्था ठरवून दिली. पानिपतानंतर जो मराठ्यांविरुद्ध उठावा झाला, त्यांत या गोहदकरानें भाग घेऊन मराठ्यांचा अंमल झुगारून दिला. जाठ व मराठे पुष्कळ दिवसांचे स्नेही. पानिपतच्या संहारांतून पळून आलेल्या मराठ्यांचा राणी किशोरीनें उत्कृष्ट परामर्श घेतला. तथापि प्रस्तुत मराठ्यांची खंडणी न देतां गोहदकरानें विरोध केला. युक्तीनें प्रकरण मिटवून बादशहास दिल्लीस आणण्याची बुद्धि रघुनाथरावास झाली नाहीं. दादाचें पाऊल पुढें पडेना. मल्हारराव मृत्यु पावला, त्याची निरवानिरव होतांच दादानें गोहदचे किल्ल्यास वेढा घातला. अनेक हरकती उत्पन्न होऊन प्रकरण लांबत गेलें. "या प्रांतचे दंडी तितके जवाहीरसिंगास जाऊन भेटले. तमाम प्रांतांत जाठांचा अंमल झाला. निरंकुश, गर्वारूढ उन्मत्तपणें या प्रांतांत वागतो." रघुनाथरावाची पैशाशिवाय कुचंबणा झाली. त्यानें पुण्यास पुतण्याकडे पैशाची मागणी केली, ती तो तरी कशी पुरविणार ! दादानें कळविलें, "जाठाचें राजकारण सलुखाचें लागलें आहे. बिघाड करावा तरी दुतर्फा खराबी. मसलतीमुळें वोढीचा प्रकार आहे." ‡

"दादासाहेब गोहदच्या शहास गुंतले. छावणी झाली. चमेली पलीकडे राजेरजवाडे एक झाले आहेत. लष्करांत महर्गता फार आहे. घोडीं, हत्ती मरतात." मराठ्यांचा जोर दिसतांच राणाही निकर करूं लागला. त्यानें मराठ्यांची रसद बंद केली. दादास पैशाची मोठी अडचण. फौजेस रोजमुरा नाहीं. ता० २४ नोव्हेंबर रोजीं नारोशंकर लिहितो, "दादांसमागमें आलीया नफा झाला तो लिहितां पुरवत नाहीं. इजतवांचून घरास आलों म्हणजे मिळवली. किल्ला जेर होत नाहीं. सिंदे नको म्हणत असतां दादांनीं हल्ला करविला. आपण खासा मोर्चांत जाऊन बसले. हरि भिडे याजकरवीं निशाण उपटून खांद्यावरी नेलें. आम्हांकडील नामी माणूस ठार झालें. निशाण जळालें.

* प० कं० २·७८, १४५, २०७; पे. द. २९·१०२.

‡ पे. द. २९·१५२, १५५.

तीन हल्ला एकामागें एक ऐशा केल्या. दादांचा हिरमोड फार झाला. वेढा उठविणें जिवावर आलें. जाठ शरण येईना. शेवटीं महादजी सिंद्याचे मध्यस्थीनें गोहदकरानें पंधरा लाख खंडणी करार केली. तेव्हां गोहदचे मोर्चे उठले. भेटी व्हावयाच्या ठरल्या. चमेली पलीकडे जवाहीरसिंग–अलीकडे दादासाहेब. जाठाचे चित्तांत दग्याचा संशय आला. त्यानें मध्यस्थ नारोशंकर व अनूपगीर उमरावगीर गोसावी यांजवर झुंज केलें. पांच सातशें माणूस पडलें." हा प्रकार मार्गशीर्ष शु. ७ ता. ८ डिसेंबर स. १७६६ चा होय. *

यावेळीं जाठांचा एक सरदार दानाशा नांवाचा भारी उपद्व्यापी होता. त्यानें मराठ्यांच्या विरुद्ध कारस्थानें रचून निरनिराळ्या जाठ धुरीणांचें ऐक्य बनविलें. गोहदचा छत्रसाल त्यांस सामील झाला. पारचे रोहिले सरदार त्या संघांत मिळाले. पंजाबचे शीख दिल्लीवर जोर करून आले होते तेही यांस येऊन मिळणार अशी भीषण परिस्थिति दादापुढें निर्माण झाली. पुढें दिल्लीकडे गेल्यास आपली धडगत नाहीं अशी खात्री होऊन अपेशाच्या वैतागांत तो इ. १७६७ च्या फेब्रुवारींत चमेलीवरून परत फिरला. कर्ज झालें. हातीं पैसा नाहीं. नवीन पैसा देणारें कूळ कोणी उत्तरेंत राहिलें नाहीं. दक्षिणेकडे येतांना ता. २७ मार्चला अहल्याबाईचा पुत्र मालराव मरण पावला. तेणेंकरून नवीन वारस नेमतांना पैसे उकळण्याची संधि दादास आली ती त्यानें कां फुकट घालवावी! सिंद्याचे दौलतीचा प्रश्न भिजत पडला होता, आतां होळकराचे कुटुंबावर तीच गदा आली. †

दादाचे मनोरथ ढासळून पडले. उत्तर हिंदचें राजकारण खेळवणें बाजूला राहून आतां घरीं जाऊन प्रत्यक्ष पुतण्यास तोंड काय दाखवावें याची त्यास शरम वाटूं लागली. पुतण्याचें तेज वाढत जाऊन कारभारांत त्याचा जम बसला आणि दादाची दुर्दशा जाहीर झाली. भेलशाचें ठाणें पानपतानंतर हातचें गेलें तें परत येतांना त्यानें भोपाळकरापासून २० मार्च रोजीं घेतलें. त्यांतही आंत एक व बाहेर एक असें दुटप्पी वर्तन दादास करावें लागलें. §

---

* ख. ५९४, ६१०, ६३३, ६३५; पे. द. २९. १६४–१६५.

† पे. द. २९· १६४, १६५, १६७; प. कॅ. २·१२ A व B (जाठ तह); पे. द. १९·४४ या गोहदस्वारीचा निष्कर्ष देतो.

§ पे. द. २९·१७२; ख. ७०४.

आतां नवीन विक्रम कोणता अंगावर घ्यावा याची दादास उमज पडेना. कोट्याकडे जावें, गुजरातेंत जावें असे विचार चालले. ता० २० एप्रिलला त्यानें गोपिकाबाईस कळविलें, " आम्ही कुरवाईकराचें पारिपत्य करून मुधोजी भोसले यासह उज्जनीचे रोखें आलों. पुढें गुजरात प्रांतें जाऊन गायकवाडास जरब देऊन ऐवज घेऊन देशास परत येतों. या सालीं मातबर कार्य होऊन आलें नाहीं, त्यामुळें पत्र पाठविण्यास अंतर पडलें. किरकोळ कार्ये जाल्याचा मजकूर काय यास्तव न लिहिलें. " यावरून दादाची मनःस्थिति व्यक्त होते. गायकवाडास जरब देण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. मागें पुढें पुतण्याशीं दोन हात करावे लागल्यास दमाजीच्या मनाचा अंतस्थ ओढा ठरवून घ्यावा एवढ्याचसाठीं तो गुजरातेंत जाणार होता. पण स्वतः तिकडे गेला नाहीं. बहुधा हस्तकांकरवीं त्यानें गायकवाडाशीं संधान बांधलें. जून महिन्यांत तो परत येऊन आनंदवल्लीस पोंचला. दरम्यान मागें गोहदेस बसलेला दादाचा सर्व जम जाठानें मोडून काढिला. बहिरो अनंत व विठ्ठल शिवदेव दादानें मागें गोहदच्या बंदोबस्तास ठेवले होते, त्यांजवर गोहदकरानें चढाई केली. भरतपुरकर जवाहीर मल्लानें गोहदकराचें साह्य केलें. तथापि जाठास मोडून विठ्ठल शिवदेवानें परत गोहदेंत घातलें. यानंतर विठ्ठल शिवदेव परत आला तो ता. २० ऑगस्ट स. १७६७ रोजीं मरण पावला. §

याप्रमाणें उत्तरेंत मराठ्याच्या सत्तेस कमीपणा येऊन जाठ बळावले. त्यांनीं बुंदेलखंडांतील मराठ्यांचा अंमल साफ उठवून दिला असता, पण त्यांच्या सुदैवानें भरतपुरकर जवाहीरासिंग व जयपुरकर माधोसिंग या दोघांत कलह उत्पन्न झाला. त्यांच्या राज्याच्या हद्दी एकमेकांस भिडलेल्या असून त्यांजवर आक्रमण सुरू होऊन ते आपसांत वैरी बनले. जवाहीरसिंगास पुष्करची यात्रा करावयाची, तिकडे जाऊन परत येतांना मोठ्या फौजेनिशीं तो जयपुरहद्दींत शिरला. त्यास माधोसिंगानें अटकाव केला. उभयतांचा सामना भिडला. जयपुरच्या उत्तरेस सुमारें आठ मैलांवर मावंदा – मौंदा म्हणून स्थळ आहे त्या ठिकाणीं १४ डिसेंबर स. १७६७ रोजीं उभयतांचा जंगी संग्राम घडून आला. दोनही पक्षाचे दहा दहा हजार लोक कापले गेले. जवाहीरचा नाश होऊन त्यास पराभव स्वीकारून परत फिरावें लागलें. जाठाची ही हानि मराठ्यांच्या पथ्यावर

§ गाडगीळकृत विठ्ठल शिवदेव चरित्र. पे. द. २९, ८४; ख. ७२०.

पडली आणि पुढें सवड होतांच मराठे जाठावर चालून गेले. मराठ्यांचा बुंदेलखंडचा अंमलही सुधारला.

वर प्रमाणें दादाची नाचक्की होऊन परत आल्यावर तो स्नानसंध्या करीत स्वस्थ बसता, तर त्यांत त्याचें व राज्याचें हित झालें असतें. पण राज्याची वांटणी मागून त्यानें पुतण्याचा छळ आरंभिला. उभयतांची तेढ वाढली. पुष्कळांनीं शिष्टाई केली. ती फुकट गेल्यावर उभयतांत रणसंग्राम बनून १० जून स. १७६८ रोजीं धोडपजवळ दादा पुतण्याचे कैदेंत पडला. सिंदे-होळकर वगैरे सर्व प्रमुख सरदार या संग्रामासाठीं दक्षिणेंत आले, यामुळें स. १७६७ व १७६८ हीं दोन सालें मराठ्यांचीं फुकट जाऊन उत्तरेचा मनसबा लांबणीवर पडला. दादा ठिकाणीं बसल्यावर स. १७६९ त पुनः मराठ्यांच्या फौजा उत्तरेंत गेल्या त्यांची कामगिरी आतां सांगितली पाहिजे.

**८. जाठांचें पारिपत्य** — पानिपतपूर्वीं मराठ्यांना अब्दालीचा विरोध होता. आतां पुढें अब्दालीचा अस्त झाला, त्याबरोबर त्यांना दबावणारी इंग्रजांची शक्ति निर्माण झाली. राजकारण व लष्करी सामर्थ्य या दोनही बाबतींत इंग्रज मराठ्यांना वरचढ होते. पण हिंदी सत्ताधीशांप्रमाणें त्यांचा कारभार व्यक्तिगत नसून हळूहळू पदरांत पडेल तें घेऊन एक एक मजल गांठावी असा त्यांचा क्रम होता. हल्लीं ते मराठ्यांना पाण्यांत पाहूं लागले. येन केन प्रकारेण मराठ्यांचें सामर्थ्य खची करावें, त्यांचा आश्रय बादशहाला मिळूं नये हा इंग्रजांचा मुख्य प्रयत्न होता. उलट बादशहानें दिल्लीस जाण्याविषयीं आतुर होऊन त्यांना टोंचणी लाविली तेव्हां ते नाना सबबी दाखवून त्यास झुलवूं लागले. बादशहालाही हा त्यांचा डाव उमगला. शुजाउद्दौल्याचे हातपाय पूर्ण बांधले गेले, म्हणून त्याला स्वतंत्र मार्ग राहिला नाहीं. जाठ-रोहिले इत्यादींना हे इंग्रज फारशी किंमत देत नव्हते. मराठ्यांच्या उच्छेदापुरता इंग्रज त्यांचा उपयोग करीत. ता. २१ नोव्हेंबर स. १७६७ च्या पत्रांत इंग्रज गव्हर्नर व्हेरेल्स्टनें शुजास कळविलें, "आम्ही मराठ्यांकडे असें धोरण ठेविलें आहे कीं जेणेंकरून त्यांनीं आमच्या शत्रूंस मदत करूं नये. त्यांच्याशीं दाट स्नेह आम्ही कधीं केला नाहीं व करणार नाहीं. ते आमची मदत केवळ स्वार्थाकरितां चाहतात, मानवजातीच्या कल्याणासाठीं नव्हे, हा प्रकार मशहूर आहे. न्याय व परहितेच्छा यांची चहाड आम्ही बाळगीत असल्यामुळें मराठ्यांशीं स्नेह ठेवणें

आमच्या स्वाभिमानास युक्त नाहीं. ” ‡ यापूर्वीच रघुनाथरावाचे वकील निळो गोपाळ व धोंडो खंडेराव कलकत्ता, बनारस इत्यादि ठिकाणीं जाऊन इंग्रजांशीं स्नेह जोडण्याच्या उद्योगांत होते. इंग्रजही त्यांना गोड गोष्टी बोलून अंतर्यामांतला थांग लागूं देत नव्हते. मात्र रघुनाथरावाचा उद्देश मराठी राज्याचा नसून पुतण्याला आवरण्याचा होता. स. १७६७ त पेशव्याचा सरदार त्रिंबकराव पेठे बुंदेलखंडांत अंमल बसवीत होता. † रघुनाथराव गेल्याबरोबर जवाहीरसिंग जाठानें नर्मदोत्तरचा मराठ्यांचा अंमल उठवून देण्याचा चंग बांधला. त्यासाठीं फ्रेंच सेनानी रीन माडेक यास त्यानें मोठ्या पगारावर चाकरीस ठेवून त्याजकडून कवायती पलटणें बनविलीं. तेणेंकरून त्याचें बळ वाढलें. शिवाय दानाशा, समरू, मुहकमसिंग हे त्याचे सहायक कल्पक व चतुर होते. दानाशा नवलसिंगाचा मेहुणा जवाहीरचा उजवा हात होता. जवाहीरच्या मृत्युनंतर त्यानेंच जाठांचा पुरस्कार करून मराठ्यांवर शस्त्र चालविलें. याच संधींत जयपुरच्या माधोसिंगानें जाठांचा पराभव केला, तेणेंकरून जाठांची सत्ता खालावली आणि मराठ्यांनीं बुंदेलखंडांतलीं आपलीं ठाणीं परत घेतलीं. या घडामोडी महादजी सिंदे स्वतः पाहात होता. पाश्चात्य सेनानींचें कसब पाहून ती पद्धति स्वीकारल्याशिवाय आपल्या राज्याचा निभाव लागणार नाहीं हा बोध त्यानें घेतला. “ सांप्रत जाठाचें पारिपत्य व पातशहास दिल्लीस नेऊन बसविणें ही गोष्ट प्रथम आहे, ” असें मराठा वकील सांगतो.

मावंदाच्या लढाईत मराठ्यांचे दोन शत्रु माधोसिंग व जवाहीरसिंग जाठ एकमेकांशीं लढून हतबल झाले ही गोष्ट मराठ्यांना उपकारक बनली. रोहिल्यांनीं माधोसिंगाची मदत केली होती, पण विजयाचा फायदा घेण्यास तो जगला नाहीं. लढाईनंतर लगेच २१ डिसेंबर रोजीं माधोसिंग मरण पावला. त्यास दोन पुत्र अल्पवयी होते, एक पृथुसिंग व दुसरा प्रतापसिंग. अहल्याबाईनें पृथुसिंगास वस्त्रें देऊन कारभार त्याच्या मातुश्रीस सांगितला आणि खुशालीराम बोहरा याचे सल्ल्यानें कारभार चालावा अशी व्यवस्था ठरविली. जवाहीरसिंग जाठालाही लवकरच विपत्तींत मृत्यु आला. स. १७६८ च्या जुलईंत हत्तीच्या टकरा पाहात असतां एका सैनिकानें सिबंदीच्या कटकटीवरून त्याचा खून केला.*

‡ प० कॅ० २.२६३. † पे. द. २९. १६३, १९२, २०७–२१२.

* ख. ७७६ ; ऐ. सं. सा. ४. ५ यांत जवाहीरसिंगचा बडेजाव पाहा.

असा हा निधड्या छातीचा पुढारी नाहींसा झाल्यानें जाटांची सत्ता कमकुवत बनली. उत्तरेंतील क्षेत्र यावेळीं अनायासें असें निर्वेध झालें असतां मराठ्यांचा एकही पुढारी त्या बाजूस हजर नव्हता. एकटा लक्ष्मणशंकर झांशी येथें आपली निभावणी करून होता.

घोडपवर दादाचा बखेडा थांबला, तरी त्यांतूनच नागपुरकर भोसल्यांचा दुष्टावा निर्माण झाला, त्याचें निराकरण करण्यांत पेशव्याचें आणखी एक वर्ष गेलें. बादशहा अलाहबादेस इंग्रजांच्या थापांस कंटाळून दिल्लीस जाण्यास आतुर झाला. त्याचा पुत्र जवानबख्त, मलिकाजमानी व नजीबखान दिल्लींत कष्टानें दिवस कंठीत होते. या संबंधानें माधवराव पेशव्याचें अंतःकरण जळत होतें. स. १७६८ च्या नोव्हेंबरांत तुकोजी होळकर रामचंद्र गणेशास लिहितो, " सांप्रत थालनेरास दाखल जालों. आठचौ रोजांत लोक जमा होतांच महेश्वरीं जातों. तेथें मातुश्रीची भेट घेऊन माळवे प्रांतीं पोंचल्यावर पुढील योजना होईल." महादजी सिंद्याची कहाणी किती कष्टप्रद होती ती स्वतंत्रच सांगितली आहे. सखूबाईची समजूत काढून तो उज्जनीस जातो तों राघोराम पागे याच्याशीं त्यास लढण्याचा प्रसंग आला. त्यास महादजीनें युद्धांत ठार मारतांच बाजी नरसिंह, राघो मल्हार आदी करून प्रतिस्पर्धी महादजीस रुजू झाले. हा प्रकार स. १७६८ अखेरचा असून तो पेशव्याला मंजूर होता. त्यानें उत्तरेंत फौजा पाठविण्याची सिद्धता केली आणि रामचंद्र गणेश कानडे याजकडे मुख्य व्यवस्था नेमिली. *

रामचंद्र गणेश भोसल्यांच्या स्वारींतून स. १७६९ च्या उन्हाळ्यात मोकळा होऊन उत्तरेच्या मार्गास लागला. तत्पूर्वी सिंदे-होळकर तिकडे गेले होते. मे महिन्यांतलें वर्तमान. " सिंदे-होळकर उदेपुराकडे आहेत. उभयतांचें चित्त शुद्ध नाहीं. रामचंद्र गणेश आले तर रहस्य होऊन सरकार कामें घडतील. जवाहीरमल्ल जाठ देवाज्ञा पावला." § या वेळीं उदेपुरच्या गादीसंबंधानें कलह माजला. अरिसिंग व रतनसिंग हे दोघे वारस झगडूं लागले. तुकोजीनें अरिसिंगाचा पक्ष घेऊन उदेपुराकडे चाल केली, तों महादजीनें रतनसिंगाची बाजू घेतली, तेणेंकरून राजकारण बिघडलें. पुढें रामचंद्र गणेश व विसाजी

* पे. द. २९. २१९, २२२, २२४, २२९.

§ पे. द. २९. २३३, २३४.

कृष्ण फौजा घेऊन आले. उदेपुरची खंडणी साठ लक्ष ठरली. सरदारांनीं १७६९ च्या पावसाळ्यांत छावण्या खेचीवाड्यावर केल्या. तेथूनच कित्येक कामें उरकलीं. ऑक्टोबरांत चारही सरदार चंबळवर एकत्र झाले. तत्पूर्वी त्यांनीं बुंदेलखंडचा अंमल विर्वेध केला.§ प्रांतांत त्यांची जरब बसली, चहूंकडच्या खंडण्या वसूल होऊं लागल्या. पातशहाचीं व इतरांचीं सरदारांकडे पत्रें येऊं लागलीं कीं आपण येऊन इकडील बंदोबस्त करावा. जाठाचें पारिपत्य केल्यास बादशहानें पन्नास लक्ष कबूल केले. त्यावरून प्रथम जाठावरच स्वारी करण्याचा विचार ठरला. मराठ्यांचा जमाव पाऊण लाखांवर जाला. जयनगरवाला येऊन त्यांस मिळाला. पेशव्याचा हुकूम होता कीं एकदम पुढें चाल करून दिल्लीचा कबजा घ्यावा. पण जाठ मध्यें आडवा आल्यामुळें पुढें जाण्यास अडचण आली. तिचें निवारण करण्यासाठीं अलीकडेच युद्धप्रसंग उद्भवला. यावेळीं पैशाची मोठी अडचण मराठ्यांना भासली. अंमल बसल्याशिवाय पैसा हातीं येईना; आणि पैसा आल्याशिवाय फौजेचा खर्च भागेना. याचा उपाय सरदारांनीं योजिला. चहूंकडील मांडलिकांस शह देऊन खंडण्या वसूल करण्याचा सपाटा चालविला, तेणेंकरून लहान मोठे सत्ताधीश गडबडून गेले. हिंगणे वकील पुरुषोत्तमपंत यास सरदारांनीं बादशहा व सुजाउद्दौला यांचे भेटीस पाठवून त्यांचा आशय विचारला. शिवाय नजीबखान व रोहिले पठाण इत्यादींचा विचार घेऊन मग पुढील कार्यभाग ठरवावा अशी योजना आखण्यांत आली. *

मराठ्यांचा हा आवेश पाहून दिल्ली येथें नजीबखानाला मोठी धास्ती उत्पन्न झाली. पानिपतच्या संहाराचा हा आद्य उत्पादक मराठ्यांचा द्वेष्टा हें ते कसे विसरणार ! आतां त्याला बाहेरचें पाठबळ उरलें नाहीं. होळकर त्याचा पूर्वापार त्राता, त्या आधारावर त्यानें तुकोजी होळकराकडे संधान लाविलें. जवानबख्त व मलिकाजमानी यांचा आधार नजीबखानच होता. त्याचे वकील मराठ्यांकडे आले. या घरबुडव्याला जवळ करूं नये, त्याचा फडशा उडवावा अशी उत्कंठा महादजीला लागलेली होती. परंतु रामचंद्रपंत व तुकोजी यांनीं टरविलें, तूर्त नजीबखानाच्या मसलतीनें प्रथम अंतर्वेदींत अंमल बसवावा. नजीबखानही काकुळकतीस येऊन पूर्वीचे प्रकार विसरून नवीन ममतेच्या गोष्टी

§ पे. द. २९. २३८; का. सं. पत्रा. २२२–२२४; ख. ८३०.

* पे. द. २९. २४२–१४६.

बोलूं लागला. याजबद्दल महादजीला भारी चीड आली. तो छावणी सोडून मारवाडकडे चालता झाला. "त्यास माघारे आणून रामचंद्र गणेशाशीं व होळकराशीं ठीक करून द्यावें, त्रिवर्गांनीं काम बनवावें या डौलानें गणोजी कदम यास महादजीकडे रवाना केलें. मसलतींत पेच पडतात." † दरम्यान रामचंद्र गणेशानें सर्व प्रकार पेशव्यास कळवून त्याजकडून निकाल मागविला.

चंबळपलीकडे जयपुरहद्दींत फौजा असतां वरील प्रकार स. १७७० च्या आरंभीं घडला. त्यापूर्वींच स. १७६८ च्या जुलईत जवाहीर मल्ल जाटाचा खून होऊन त्याचा अल्पवयी मुलगा केसरीसिंग याची भरतपुरचे गादीवर स्थापना झाली. पण हा अल्पवयी असल्यामुळें जवाहीरचे दोघे बंधु रणजितसिंग व नवलसिंग यांचा कारभाराबद्दल तंटा लागला, त्यांत रणजितसिंगानें मराठ्यांस मदतीस बोलावलें. नजीबखानानेंही रणजितसिंगाचा पक्ष स्वीकारला. अंतर्वेदीच्या कार्यांस हा जाठाचा अडथळा मध्यें नको म्हणून मराठे सरदार जाठांचे मुलखांत शिरले. गेल्या दोन तीन वर्षांत जाठांनीं मराठ्यांचा पुष्कळ उच्छेद केला होता, त्यांजवर चांगला शह बसविल्याशिवाय पुढें दिल्लीवर जाणें शक्य नव्हतें. रणजितसिंग मराठे सरदारांचे भेटीस आलाच होता, त्यास बरोबर घेऊन मराठे कुंभेरीवर आले. त्यांजवर नवलसिंग व दानाशा यांनीं गोवर्धनजवळ चालून घेतलें. समरू, माडेक वगैरे युरोपीय सेनानी जाठांकडे असल्यामुळें संग्राम निकराचा बनला. ता. ५ एप्रिल १७७० रोजीं रामचंद्र गणेश, तुकोजी होळकर इत्यादींनीं तीन प्रहरपावेतों मोठी मारगिरी करून जाठांचा धुव्वा उडवून दिला. नवलसिंग जीव बचावून शेंपन्नास रावतांनिशीं पळून गेला. त्याचे हजार लोक कापले जाऊन पांच हजार जखमी झाले. मराठ्यांस लूट पुष्कळ मिळाली.*

**९. रोहिल्यांचा पाडाव**—या गोवर्धनच्या लढाईत समरू व माडेक या युरोपियन सेनानींचा मराठ्यांनीं पराभव केल्यामुळें त्यांची जरब चहूंकडे बसली. लगेच आगऱ्याचा किल्ला कबजांत येऊन मथुरेस ठाणें बसलें. आतां पुढें कोणता कार्यभाग हातीं घ्यायचा याची कसून वाटाघाट सरदारांनीं केली. नजीबखानानें भेट घेऊन मराठ्यांचा आश्रय मागितला. त्याचें अवसान खता

---

† पे. द. २९.२५२. * पे. द. २९, पृ० २९४; प० कॅ. १८०–१८४; ख. ९७०–७१; Poona Parasnis, Delhi Affairs A १.

होऊन खात्री पटली कीं आतां हे आपला इतक्या दिवसांचा सूड पुरेपूर घेणार. त्याचा आधार होळकर प्रमुख होताच, त्याच्याशीं नजीबानें संधान बांधून अत्यंत आर्जवानें कळविलें, कीं "तुमच्याशीं वैर बांधण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. मी तुमचे सर्व कार्यभाग आपण होऊन पुरे करून देतों. तुमचा अंतर्वेदींतला अंमल पूर्ववत् बसवून देतों, बंगसादि पठाणांचा बंदोबस्त करतों, दिल्लींत तुमची व्यवस्था लावतों." पलीकडे अंतर्वेदींत जाठांचा मुलूख होता, तो कबजांत घेणें जरूर होतें. नजीबखानास या वेळीं अब्दालीसारख्या दुसऱ्या कोणाचेंही पाठबळ बाहेरचें नव्हतें, पण शुक्रतालची आठवण महादजी सिंद्याच्या अंतःकरणावर कोरलेली होती ती तो कशी विसरणार! त्यानें निक्षून बजावलें, या खानाच्या थापांवर विश्वास ठेवणें घातक होईल. उलट यास कबजांत घेऊन बंदोबस्तांत ठेवण्यांतच आपला फायदा आहे. दहा वर्षांपूर्वी भाऊसाहेबांनीं मथुरेवरून एकदम दिल्लीवर चाल केली तोच क्रम आपण आतांही पाळूं या, म्हणजे एकदम सर्वत्र आपला जम बसेल.

यावर होळकराचें म्हणणें पडलें कीं दिल्लीचा मालक बादशहा हजर नसतां राजधानी हस्तगत केल्यानें निष्कारण गैरसमज वाढून शत्रु उत्पन्न होतात. सदाशिवरावभाऊनें दिल्ली घेतल्याबरोबर मराठ्यांविरुद्ध वातावरण बनत गेलें. जवानबख्त, झीनतमहल इत्यादिकांस निष्कारण धास्ती बसून ते आतां विरुद्ध खटपटी करतील, कदाचित् खुद्द बादशहा व शुजाउद्दौला इंग्रजांची मदत घेऊन दिल्लीचा कबजा घेण्यास धावून येतील तर आपली त्रेधा उडेल, अशा स्थितींत बाहेरच्या सर्व पक्षांशीं आपले विचार ठीक करून मगच दिल्लीस हात घालावा, त्यायोगें ग्वाल्हेर, चंबळ, आग्रा, अंतर्वेद इत्यादि आपला मागचा पाया मजबूद राहून मराठी सत्ता निर्वेध बनेल. त्यासाठीं नजीबखानाचा उपयोग करावा, त्याचा बंदोस्त करण्यास उशीर लागणार नाहीं. अशी भरपूर सर्वांची एकत्र चर्चा झाली. शेवटीं त्रिवर्ग सरदारांनीं महादजीच्या विरोधास न जुमानतां अंतर्वेदींत जाण्याचा निश्चय कायम केला. ही सर्व वाटाघाट युद्धाच्या उच्च पातळीची अलीकडील कौन्सिल ऑफ वॉर सारखी होती. तींत वैयक्तिक मतलब नव्हता. तितक्यांत पेशव्याचा निकालही आला कीं नजीबखानाचा उपयोग करून अंतर्वेदचा अंमल बसवावा. मागाहून नजीबखानाचा परिणाम होणें तो होईल.*

* पे. द. २९·२५५.

जाठांची मामलत पुरी करून लगेच स. १७७० च्या एप्रिलांत मराठी फौजा मथुरेवर यमुना उतरून अंतर्वेदींत शिरल्या. त्यांबरोबर साह्यास नजीबखान होता. फर्रुखाबादचा नबाब अहंमदखान बंगश यानें पानिपतापूर्वी आपले साडेसोळा परगणे ताम्रपटानें मराठ्यांस दिले होते, ते पुढ त्यानें अलीकडे परत घेतले ते व अंतर्वेदींतला जाठांचा मुलूख कबजांत घेणें हें या चढाईचें पहिलें मुख्य प्रयोजन होतें. रामचंद्र गणेशानें बंगसाकडे परगण्यांची मागणी केली ती त्यानें झिडकारून लावली, त्याबरोबर त्याचे मुलखांत गंगेवर जाऊन रामघाटावर मराठ्यांनीं छावणी केली. नदीपलीकडे बंगसाचा तळ होता. पर्जन्य पडून प्रदेश जलमय झाला. त्यामुळें अल्पकाळ मराठ्यांची कुचंबणा झाली. नजीबखानानें पूर्वीचा शुक्रतालवरचा दत्ताजीचा प्रसंग पुनः येथें उपस्थित केल्याचा अनुभव मराठी फौजांस आला. नजीबखान व बंगश यांचीं अंतस्थ सूत्रें खेळूं लागलीं. त्याच वेळीं शुजा व इंग्रज मराठ्यांना गिळण्यास टपून बसले होते. हा अडचणीचा प्रसंग पुण्यास कळून तेथेंही चिंताक्रान्त वातावरण बनलें. पेशव्यानें तावडतोब जास्त फौज उत्तरेंत पाठविण्याची सिद्धता केली. मात्र पूर्वीच्या अनुभवानें मराठे आतां सावध होते. रामचंद्र गणेशानें युक्तीनें बाजी सावरून संकटाचें निवारण केलें. आगाऊ सर्व व्यवस्था ठरवून हलके हलके माघार घेत ते यमुनेअलीकडे आले. परत येतांना डिसेंबरांत इटाव्याचें ठाणें घेऊन तेथें त्यांनीं आपला पाया मजबूद कला. † अशा रीतीनें संकट निवारण होऊन मराठे प्रबल बनले.

नजीबखान जरी मोकळा होता, तरी त्याचा पुत्र झाबेताखान एक प्रकारचा ओलीस म्हणून गंगाकांठच्या मराठ्यांचे छावणींत होता. नजीबखान स्वतः नजीबगडास जात असतां रस्त्यांतच ता. ३१ ऑक्टोबर स. १७७० रोजीं एकाएकीं मरण पावला, आणि इकडे त्याच वेळीं नद्यांचे पाणी ओसरून मराठ्यांचा संचार सुगम झाला. "रामचंद्र गणेश फौजेसह यमुनेपलीकडे कोंडून अडकले होते, ते अलीकडे आले, आतां शह उरला नाहीं. पुण्याहून त्यांचे मदतीस फौजा पाठविण्याचा मनसबा रहित झाला. श्रीमंतांचें पुण्य समर्थ." असा उल्लेख १९ ऑक्टोबरचा पुण्याचा आहे. रामचंद्र गणेशाची चहूंकडे मोठी वाहवा झाली.

---

† पे. द. २९·२६१; ख. १००१, १०१५, १०४३.

सरदार अंतर्वेदींत उतरल्यावर जाठाच्या तहाची शिष्टाई कैक दिवस चालूच होती. तिचा निकाल लागून ता० ८ सेप्टेंबर स. १७७० ला तह पुरा झाला.

( १ ) नवलसिंगानें ६५ लाख रक्कम हप्त्याहप्त्यानें मराठ्यांस द्यावी, ( २ ) दरसाल ११ लाख खंडणी भरावी आणि ( ३ ) रणजितसिंगानें राज्याचा हक्क सोडून वीस लाखांची जागीर स्वीकारावी. * असा ठराव झाला.

उत्तरेंतील व्यवहारांकडे पेशव्याचें लक्ष सारखें लागलेलें असून त्यांतील घडामोडींचा बारकावा, त्यानें दाखविलेले निरनिराळ्या व्यक्तींचें गुणदोष व पुढील उद्योगाच्या सूचना पाहिल्या म्हणजे त्याच्या ग्रहणशक्तीचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाहीं. पेशव्याचें पत्र ता० २१ डिसेंबर स. १७७० चें रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण या त्याच्या दोघां मुख्य चालकांस लिहिलेलें सर्वच अभ्यासनीय आहे. त्यांतील मतलब असा : " भाऊसाहेबांनंतर हिंदुस्थानांत तुम्ही सरदार सरकारची फौज घेऊन तमाम अमीर राजेरजवाडे उन्मत्त जाले त्यांस शिक्षा करून अंमल बसवावा, दक्षिणी कायम आहे अशी आवई अब्दाली शीख वगैरेंवर बसवावी, सिंदे-होळकर पराक्रमी होते ते पहिल्यापेक्षांही अधिक करून दाखवितील हा भरंवसा फार होता. तुम्हांस जाऊन वीस महिने जाहले, किती उपयोगी कर्में तुम्ही व त्यांनीं संपादिलींत त्याचें मनन करावें. सरकारांत रुपया दृष्टीस न पडे. सिंदे-होळकरांत परस्पर फूट, तुम्ही उभयतां मुखत्यार परस्पर भांडतां. तुम्ही सारे एकदील असतां तर जाठ जिवंत कसा राहूं शकता ! समरू फिरंगी सांभाळून कसा जाता. नजीबखानानें तुम्हांस अंतर्वेदींत उतरावयाची मसलत दिली. तुम्ही लढाई मारली असतां यश त्यास दिल्हें. खंडणी पासष्ट लाख केली ती तरी झाडून पदरांत पैका पडला नाहीं. आतां नजीबखान मृत्यु पावला, मोठी व्याधि गेली. प्रस्तुत त्याच्या घरांत कलह, शत्रूचा निःपात व्हावा ऐसा समय आहे. झाबेताखानाअगोदर तुम्ही दिल्ली हस्तगत करून आपला बंदोबस्त करावा. शुजास वजारत करून पातशहास तख्तावर बसवावा. होळकर झाबेताखानाबद्दल हिसके मारतील, त्याचे कारभारी फितूर करतील, पाय मोडून गोष्टी सांगतील त्या तुम्हीं ऐकूं नयेत. तुम्ही व सिंदे एक झाल्यास होळकर न येऊन काय करतील ! झाबेताखानास दगा न करावा, त्यास नजीबगडास जाऊं द्यावा. उत्तम न वर्तेल तर पारपत्य करावें. तुम्ही मनसुब्यास

---

* कानुंगो जाठ इ० पृ० २३७ ; पे. द. २९. २६१, २६२.

चुकलां, – धन्याचे आज्ञेप्रमाणें करावें तें न केलें, – आतां प्रथम दिल्लीचें कार्य करावें सबब तुम्हांस सर्व खोलून लिहिलें आहे. धण्याचें हित सर्वांनीं करून दाखवावें. धणी कृपाच करतील. जाणीजे. ” ‡

रामचंद्र गणेशानें अल्प वेळ माघार घेतली याचा अर्थ बंगसास वठणीस आणण्याचा प्रयत्न त्यानें सोडला असा नाहीं. कल्पक सेनानीची युक्ति त्यानें पुरेपूर लढविली. या बंगसाला पाठिंबा होता रोहिल्यांचा. नजीबखान मेला तेव्हां झाबेताखान मराठ्यांच्या छावणींत होता, त्यास रामचंद्र गणेशानें लगेच नजर कैद बसविली. महादजीनें सुचविलें रोहिल्यांचे सर्व करार पुरे करून घेतल्याशिवाय यास सोडूं नका. बादशहाकडून वस्त्रें व सरंजाम झाबेताखानासाठीं येत होता, तो रामचंद्र गणेशानें प्रथम आपल्या मुक्कामावर बोलविला. *

पूर्वीं पानिपतप्रसंगीं मल्हारराव होळकर व नजीबखान यांच्या परस्पर संरक्षणाच्या शपथा झालेल्या होत्या, म्हणूनच ऐन युद्धाच्या गर्दींतून नजीबखानानें मल्हाररावास संग्रामांतून बाहेर सुरक्षित पोंचविलें. त्याची आठवण याप्रसंगीं झाबेताखानानें तुकोजी होळकरास देऊन आपणास वांचवावें अशी त्याची विनवणी केली. त्यावरून तुकोजीनें एका अंधाऱ्या रात्रीं झाबेताखानास छावणींतून बाहेर काढून दिलें. † त्याबरोबर त्यानें पूर्वींप्रमाणें मराठ्यांचा उच्छेद मांडिला. त्यानें बादशहाकडून मीरबक्षीचा हुद्दा मिळवून मराठ्यांचीं कारस्थानें हाणून पाडण्याची खटपट सुरू केली. पाऊस संपतांच मराठी फौजा दुआबांत आपल्या कामावर जाऊन बंगसाच्या प्रदेशांत दंगल माजवूं लागल्या. बंगसही चालून आला. त्याचे मदतीस हाफीज रहमतखान आला. रणधुमाळी माजली. जागोजाग मराठ्यांनीं मुसलमानांची कत्तल उडविली. अंतर्वेदचा बहुतेक प्रदेश त्यांनीं व्यापिला. ता. १५ डिसेंबर १७७० रोजीं रामचंद्र गणेश व महादजी इटाव्याहून फरुखाबादेवर चालून गेले. पांच चार महिने संग्राम झाले. अहंमदखान बंगसाचा नाइलाज होऊन त्यानें स. १७७१ ता. २१ जानेवारीस तह केला. बावीस लाख दंड द्यावा, मराठ्यांचा पूर्वींचा मुलूख सर्व परत त्यांचे हवालीं करावा आणि नवीन घेतलेले बंगसाचे परगणे मराठ्यांनीं सोडावे. असा हा ठराव पुरा झाल्यावर सन १७७१ च्या मे महिन्यांत अहंमदखानानें शरण चिट्ठी

‡ ऐ. सं. सा. ७.९. * भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ८ अंक ३ चा ले० २२, पृ० १३९.

† Ind. Hist. Quarterly, Vol. XI, 1935, P. 641, फारसी पत्र, सर जदुनाथ.

लिहून जीवदान मागितलें; आणि पानिपतपूर्वीचा मराठ्यांनीं व्यापलेला सर्व प्रदेश त्यांच्या हवालीं केला. हा अपमान त्या मानी पुरुषास दुःसह होऊन तो लवकरच ११ जुलईस १७७१ रोजीं मरण पावला. हाफीज रहमत अगोदरच त्यास सोडून आपल्या हद्दींत गेला होता. अशा रीतीनें दुआबांतली मराठ्यांची मोहीम पुर्णतः यशस्वी झाल्यानें बादशहा व शुजा यांचा कल इंग्रजांकडून सुटून मराठ्यांकडे झुकला. या वेळीं गाजीउद्दीन, मीरकासीम इत्यादि पूर्वीचे पुरुष राजकरणांत आपलें तेज पाडीत होते, पण त्यांचें कर्तृत्व आतां संपलें. झाबेताखानाच्या प्रकरणावरून तुकोजी महादजींची चुरस वाढली होती, पण रामचंद्र गणेश, विसाजी कृष्ण व महादजी यांच्या पुढें एकट्या तुकोजीचा प्रभाव चालला नाहीं. झाबेताखान तुकोजीच्या आश्रयास होता, त्यास या तिघांनीं बाहेर घालवून देण्यास तुकोजीस भाग पाडिलें. तेव्हां खान निराधार बनला.

मराठ्यांची ही चढाई पाहून अलाहबादेस बादशहा व शुजा दोघेही दुश्चित झाले. क्लाइव्ह स्वदेशीं जाऊन पांच सहा वर्षें झालीं, तरी इंग्रज त्यांना दिल्लीस पोंचविणार हें आश्वासन दुरावतच गेलें. इंग्रजांविषयीं त्यांचे मनांतला आदर सर्व ओसरला. बादशहानें मराठ्यांच्या वकिलास बोलावून त्याचा गौरव केला. मीर्झा नजफखान हा बादशहाचा मुख्य कारभारी असून त्यास इंग्रजांनीं सालाचा दोन लाख तनखा नियमित पोंचवून वश करून घेतलें होतें. बादशहाच्या २६ लाख नेमणुकींतूनच हे दोन लाख ते त्या खानास पोंचवीत होते. अर्थात् त्याच्यामार्फत बादशहा-मराठ्यांचीं सर्व कारस्थानें अंतस्थपणें इंग्रजांस लगोलग कळत. तसाच त्यांचा दुसरा दोस्त काशीचा राजा बळवंतसिंगही इंग्रजांच्या तंत्रांत राहून आपला अर्थ साधीत होता. हा बळवंतसिंग ता. २३ ऑगस्ट स. १७७० रोजीं मरण पावल्यानें इंग्रजांचा एक साथीदार नाहींसा झाला. * मराठ्यांचा शिरकाव पुनः दिल्लीच्या कारभारांत होऊं लागला ही गोष्ट इंग्रजांस अप्रिय वाटूं लागली. शुजा, बादशहा, मीरकासीम, रोहिले, गाजीउद्दीन, जाठ हे सर्व एक झाले तर आपल्या हातांतला डाव बुडतो असा पेंच त्यांस उत्पन्न झाला. मराठे सरदार नुसते दिल्लींतच वावरणार असें नसून पूर्वेकडील प्रयाग, काशी, पटणा-कडचा मुलूख सोडवून इंग्रजांस त्याबाजूसही शह देण्याच्या उद्योगास लागले होते. चुनारगड किल्ला उत्कृष्ट बंदिस्त, तेथें तोफांचें जबरदस्त अधिष्ठान

* याचा पुत्र चेतसिंग पुढें इंग्रजांचा शत्रु बनला.

इंग्रजांचे कबजांत असल्यामुळें तूर्त तरी मराठ्यांनीं हें पूर्वेचें साहस अंगावाहेर टाकलें. हिंदुस्थानचें भवितव्य इंग्रज ठरविणार कीं मराठे असा हा समय होता. अंतर्वेदींत उतरण्यापूर्वी या सर्व मुद्द्यांचा खल करून मगच ते यमुनापार झाले. पूर्वेचें राजकारण सोडून आतां प्रथम दिल्लीचा कार्यभाग त्यांनीं स्वीकारला. त्याला पोषक अशी अंतर्वेदीची मोहीम त्यांनीं यशस्वी केली म्हणून त्यांना जोर आला.

इंग्रजांना सर्वांत मोठी दहशत मीरकासीमची वाटत होती. या वेळीं तो बुंदेलखंडांत गोहदकर राण्याचे आश्रयास राहून इंग्रजांवर सूड उगविण्याच्या प्रयत्नांत होता. क्लाइव्ह निघून गेला, त्याचे जागीं कार्टियर गव्हर्नर आला, त्यानें तूर्त केवळ बचावाचें धोरण स्वीकारून रोहिले वगैरेंना मराठ्यांविरुद्ध चिथविण्यापलीकडे जास्त कांहीं केलें नाहीं. दरम्यान बादशहानें इंग्रजांस कळविलें, हे मराठे बलवान होत चालले, यांच्या चढाईस तुम्ही एकदम आळा घाला, नाहीं तर आमची धडगत नाहीं. अशी टोंचणी बादशहा परोपरीनें इंग्रजांस लावीत होता. त्यानें इंग्रजांचीं पलटणें आगऱ्यावर बोलाविलीं. पण कांहींना कांहीं सबब दाखवून त्यांनीं मराठ्यांविरुद्ध हालचाल करण्याचें साफ नाकारलें. ‡ उलट ते सर्वांना उपदेश करूं लागले, तुम्हीच सर्व एक होऊन या मराठ्यांना उत्तर हिंदुस्थानांतून काढून लावा. बादशहाला त्यांनीं निक्षून कळविलें, मराठ्यांच्या थापांना भुलून तुम्ही त्यांच्याशीं दोस्ती कराल तर तुम्हांस पुढें पश्चात्ताप करण्याची पाळी येईल.

अशा शिष्टाईनें इंग्रज आपली निभावणूक करीत असतां मराठे आतां दिल्लीवर चालले ही खबर बादशहाला पोंचून तो सर्वथा गडबडून गेला. दिल्ली मराठ्यांचे कबजांत गेल्यावर मग राज्य कसलें! शहाआलम बादशहा कपटी किंवा उपद्व्यापी असला तरी तो धूर्त व बलाबल ओळखून होता. राजधानीशिवाय राज्य नाहीं अशी पूर्ण खात्री पटून त्यानें इंग्रजांचा नाद सोडला. बादशाहीच्या बचावासाठीं झगडतांना मराठ्यांनीं पानिपतावर सर्वस्वाची होळी करून घेतली हें तो कसें विसरणार! त्यानें शुजाउद्दौल्याचे मार्फत मराठ्यांकडे बोलणें सुरू केलें. शुजानें अंतर्वेदींत रामचंद्र गणेशाची भेट घेतली. ता० १० ऑगस्ट स. १७७० रोजीं बादशहानें रामचंद्र गणेशास कळविलें, " शुजाचा आमचा

‡ प० क्रं० ३. १९०, २३२, २३३. २६३, ३२९, ३८७.

स्नेह पक्का झाला असून तुम्ही आमची सेवा करून दिल्लीची व्यवस्था सुरळीत करून देण्यास तयार आहां असें त्यांनीं कळविलें तें ऐकून आम्हांस संतोष वाटला. शुजांनींही त्यासंबंधानें खातरजमा केली. बोलल्याप्रमाणें कृति करून दाखविली म्हणजे इंग्रज व शुजा यांजप्रमाणेंच आमचें प्रेम तुमच्या ठिकाणीं कायम राहील." अशा आशयाचीं पत्रें बादशहानें तुकोजी, विसाजीपंत व खुद्द पेशवा यांसही लिहून पाठविलीं. गाजीउद्दीन मराठ्यांच्या छावणींत होता, ही गोष्ट मात्र बादशहास खपत नव्हती. या गाजीउद्दीननें आपल्या बापाचा नाहक खून केला हा प्रकार बादशहा विसरूं शकत नव्हता! बादशहाची आई झीनतमहाल दिल्लींत होती, तिनेंही वारंवार परोपरीनें मुलास आग्रह केला कीं मराठे दिल्लीवर येतात तर तुम्हींही त्यांचा आश्रय करून निघून यावें. यावरून बादशहानें मराठ्यांचें साह्य घेण्याचा निश्चय ठरविला आणि मीर्झा नजफखानास सरदारांचे भेटीस पाठवून कळविलें, कीं "आम्ही लवकरच दिल्लीस येतों, तुम्हीं दुसरा कोणीं शहाजादा तख्तावर बसवूं नये. जवानबख्त तेथें आहेत त्यांचा सांभाळ करावा."*

**१०. दिल्लीचा कबजा घेतला**—दिल्लीच्या प्रकरणांत नानाविध व्यक्ति व त्यांचे निरनिराळे हितसंबंध गुंतलेले असल्यामुळें सर्वांचा संतोष राखणें व एकवाक्यता करणें कठिण झालें. इंग्रज तर मराठ्यांचा उद्योग सर्वथा हाणून पाडीतच होते. मुनीरुद्दौला म्हणून बादशहाचा वकील इंग्रजांजवळ असे त्यास त्यांनीं बादशहाकडे पाठवून त्याची चांगली कानउघाडणी केली, कीं "तुम्ही मराठ्यांचा आश्रय करूं नका." इकडे सरदारांनीं इंग्रजांशीं हातघाईचा प्रसंग येऊं दिला नाहीं. माधवराव पेशव्यानें आपला वकील हरिपंडित यास नजराणे देऊन कलकत्त्यास पाठविलें. ता. २७ सेप्टेंबर स. १७७० च्या पत्रांत पेशव्यानें इंग्रजांस कळविलें, "आम्ही रामचंद्र गणेशास हिंदुस्थानचे बंदोबस्तास पाठविलें आहे. या कामीं तुमच्या सूचना येतील त्या आम्ही मान्य करूं. यास्तव हरि अमानजी पंडित या वकिलांस आपल्याकडे रवाना केले आहेत." तथापि इंग्रज महा कपटी. त्यांनीं नाना युक्त्या करून बादशहाला भंडावून सोडलें. त्यामुळें त्यानें दुश्चित होऊन एक वर्ष अवधि फुकट घालविला. नाहीं तर तो पूर्वीच दिल्लीस पोंचूं शकला असता. अव्वलपासून त्याजकडे मराठ्यांचें बोलणें चालू होतें.

---

* Delhi Affairs A 15 & 16, Bombay Govt. publication.

सर्वांपेक्षां या बाबतींत महादजीचीच उत्कंठा भारी होती. त्यानें बादशहास धाक घातला, "आम्ही बादशहा दुसरा बसवून गाजीउद्दीनास वजिरी देतों." हा घाव बादशहाच्या वर्मी बसला. अंतर्वेदींत मराठे शेर झाले, आतां दिल्लीला काय उशीर? इंग्रज, शुजा वगैरे गडबडून गेले कीं दिल्लीस पुनः उलथापालथ होणार. बादशहानें इंग्रजांस कळविलें, "मराठी फौजा दिल्लीच्या दोन कोसांवर आल्या. गाजीउद्दीन व मीरकासीम त्यांजबरोबर आहेत. अशा वेळीं तुम्ही आम्हास लष्करी साह्य न कराल तर आमचा कारभार आटोपला असें समजा." सैफुद्दीन महंमद हा बादशहाचा वकील मराठ्यांच्या छावणींत होता, त्यास महादजीनें दिल्लीस पुढें पाठवून ता. ७ फेब्रुवारी स. १७७१ रोजीं नगरांत शहाआलमची द्वाही फिरविली आणि झाबेताखानाकडून दिल्लीचा ताबा मागितला. झाबेताचा हस्तक कासीम अलीखान व बेगम झीनतमहाल यांनीं कळविलें, आम्ही किल्ल्याचा ताबा देणार नाहीं. त्यावरून महादजीनें लगेच तोफांचा मारा सुरू केला. ता. १० फेब्रुवारी रोजीं किल्ला मराठ्यांचे कबजांत आला. "राजधानीवर सरकारचे झेंडे उभे केले. शहाजादा जवानबख्त यास बापाचे ठिकाणीं तख्तावर बसवून मराठे सरदारांनीं नजरा केल्या. बंदोबस्तासाठीं लष्कर नेमून दिलें. ह्या उपरी पातशाहीचा बंदोबस्त करून फौजेच्या खर्चास पैका मेळवावा ऐसा इरादा आहे." * याप्रमाणें पानिपतपूर्वीचा मराठ्यांचा उत्साह लोकांचे निदर्शनास आला. लगेच त्यांनीं झाबेताखानाच्या मुलखाची जप्ती आरंभिली.

या बनावानें इंग्रज अत्यंत बेदील झाले. बादशहानें तगादा लावला कीं तुम्ही आम्हांस ताबाडतोब दिल्लीस पोंचवा, नाहीं तर आम्ही मराठ्यांचे आश्रयानें तेथें जाऊं. त्यावर इंग्रजांनीं आर्जवें करून त्याची समजूत घातली कीं "तुम्ही हा भलताच वेडेपणा करूं नका." त्यांनीं शुजाउद्दौल्यास मध्यस्थ घालून नाहीं नाहीं त्या खटपटी केल्या. बनावट पत्रें बादशहाचे हातीं पाडलीं. पण बादशहा तरी करतो काय, जाग्यावरून हालल्याशिवाय त्याला दुसरी सोयच उरली नाहीं. धोका काय तो एकच होता. इंग्रजांचा आश्रय सुटला तर त्यांजकडून मिळणारी सव्वीस लाखांची नेमणूक व कुरा अलाहबादचे परगणे यांवर पाणी सोडणें ओघास आलें. पण एवढ्या अल्प फायद्यासाठीं समग्र बादशाहीला कोण मुकणार! बादशहा आपण होऊन जातो तर जाईना, त्या योगानें त्याची

---

* ख० ११९०; प० के० भा. ३·५४४ व पुढील कित्येक.

नेमणूक तरी आपल्या पदरांत पडेल अशी मतलबी खबरदारी इंग्रजांनीं ठेविली. मला जबरदस्तीनें येथें ठेवून घ्याल तर मी आत्महत्या करून प्राण देईन, अशी धमकी देखील त्यांस बादशहानें घातली, तेव्हां अन्य प्रतिबंध करण्याची त्यांस छाती झाली नाहीं. पुण्यास पेशव्याची प्रकृति बिघडून तो आटपला अशीही वार्ता उत्तरेंत पसरली, तेव्हां आतां मराठे दिल्ली सोडून जातील अस अल्पकाळ इंग्रजांस वाटलें. पण पेशवा जिवंत असून मराठ्यांच्या फौजा झाबेताखानावर चालून गेल्या, तेव्हां ता० १२ फेब्रुवारी रोजीं बादशहानें मराठ्यांशीं पांच-कलमी करार पुरा करून ता० २९ मार्चच्या मुहूर्तावर अलाहबादेहून प्रयाण करण्याचें टरविलें. मराठ्यांच्या मागण्यांस बादशहाचे जबाब § :—

१. राजधानी व किल्ला मराठ्यांनीं बादशहाचे हवालीं करतांच त्यानें त्यांस पंचवीस लाख रुपये द्यावे. बादशहाचा जबाब. आठ दिवसांत दहा लाख रुपये देऊं.

२. बादशहा दिल्लीस पोंचतांच पंधरा लाख रुपये मराठ्यांस द्यावे. जबाब. बादशहा दिल्लींत पोंचल्यास देऊं. न आल्यास प्रांताच्या वसुलांतून घ्यावे.

३. पूर्वींचे शिरस्ते व प्रदेश मराठ्यांकडे चालवावे. कबूल.

४. वजिरीशिवाय बाकीच्या सर्व नेमणुका मराठ्यांनीं आपल्या मर्जीप्रमाणें कराव्या. कबूल.

याप्रमाणें करार होऊन बादशहा शुक्रवार ता. १२ एप्रिल रोजीं अलाहबादेहून निघाला. कुरा परगण्याच्या हद्दीपर्यंत इंग्रज त्यास पोंचविण्यास आले. शुजाही आपल्या हद्दीपर्यंत पोंचवून परत गेला. अलाहबादचा किल्ला बादशहानें शुजास देण्याचा करार लिहून दिला, पण इंग्रजांनीं आपल्या फौजेस जागा पाहिजे असें सांगून ताबा मात्र सोडला नाहीं. २६ जुलईस बादशहा फर्रुखाबादेस पोंचला. त्यापूर्वीं तेथील नबाब बंगश मरण पावला होता. बादशहा हातचा गेल्यामुळें इंग्रजांची थोडी नापत झाली, तरी खरें नुकसान त्यांचें कांहींच झालें नाहीं. प्रयागपर्यंतचा सर्व प्रदेश त्यांच्या कबजांत होताच. फर्रुखाबादेहून आपले लोक पुढें पाठवून बादशहानें दिल्लीचा कबजा मागितला, तेव्हां १२ ऑगस्ट रोजीं मराठ्यांनीं ती राजधानी सैफउद्दीन महंमदच्या हवालीं केली. बंगसाच्या प्रदेशाची व्यवस्था करण्यासाटीं बादशहानें फर्रुखाबादेजवळ नबीगंज येथें

§ प. कॅ. ३·६९५.

छावणी केली. येथून त्यानें इंग्रजांकडे आपल्या नेमणुकीची मागणी केली. रक्कम न देतां केवळ मोहक भाषेवर त्यांनीं बादशहाची बोळवण केली.

दिल्ली घेण्याचें काम मुख्यतः महादजी सिंद्यानें केलें. पुढील घडामोडीवरून पाहतां महादजीकडेच एव्हांपासून मुख्य पुढारीपण असतें तर फायद्याचें झालें असतें. रामचंद्रपंत व विसाजीकृष्ण ह्यांजमध्यें चुरस असून त्यांनीं क्षुद्र मानापमानासाठीं तंटे करून राज्यहितास व्यत्यय आणला. तक्रारी माधवराव पेशव्याकडे गेल्या. त्यानें विसाजीपंतास मुख्याधिकार देऊन रामचंद्र गणेशास परत बोलाविलें. जुलईंत रामचंद्रपंत परत गेला. पावसाळा ओसरतांच बादशहा नबीगंजची छावणी सोडून दिल्लीकडे निघाला तो १६ नोव्हेंबरास अनूपशहराजवळ आला. या टिकाणीं महादजीनें येऊन त्याची भेट घेतली; आणि २८ नोव्हेंबर रोजीं सर्वजण दिल्लीच्या मार्गास लागले. दरम्यान रोहिल्यांचें पारिपत्य करण्याचा करार होऊन नगराबाहेर कांहीं मुक्काम झाल्यावर ता० २५ डिसेंबर स. १७७१ च्या शुभमुहूर्तावर † बादशहानें नगरप्रवेश व सिंहासनारोहण केलें. येणेंप्रमाणें पानिपतावर बिघडलेली मराठी सत्तेची घडी पुनरपि दिल्लींत बसून आतां पुढें नवीन मनु सुरू होणार असा योग घडून आला. मात्र आतांपर्यंत हा सर्व आंतबट्ट्याचा व्यवहार होऊन पैशाची किफायत होण्याऐवजीं उलट वजीर गाजीउद्दीन हातचा जाऊन बादशहाचा खर्च भागविणें व त्याचा बाहेरचा पैसा वसूल करून देणें मराठ्यांकडे आलें. माधवरावानें सरदारांचें अभिनंदन करतांना त्यांना थोडासा चिमटाच घेतलेला दिसतो. त्यानें लिहिलें, "इंग्रजांस जी गोष्ट न जाहली ती तुम्ही सिद्ध करून असाधारण लौकिक मिळाविला, परंतु पातशहांनीं पैका व मुलूख तुम्हांस काय दिल्हा? तीन छावण्या गुदरल्या, चवथी समीप आली. पातशहाचे मतलब सिद्ध जाहले, पण तुमचे स्वहिताचा प्रकार कसा! सरकारची फौज खराब जाली त्याप्रमाणें पैका व मुलूख तों साधलाच पाहिजे. प्रयागकाशीचे मतलब तुम्ही साध्य करून घेतलेच असतील. फौजेची उस्तवारी व कर्जाचा परिहार करणें तुम्हांस अगाध नाहीं. इंग्रज पातशहास दिल्लीस आणते तर त्यांचें सामर्थ नव्हतें असें नाहीं, पण ते पाण्यांतील पावप्यादे, त्यांची इतकी हिंमत नाहीं. इंग्रजांचा प्रवेश दिल्लींत होऊं देऊं नये. प्रवेश जालीया उखळणार नाहीं, टोपीकरांत इंग्रज भारी जाले आहेत. कलकत्ता, मच्छलिबंदर,

† युरोपांतील नव्या कालगणनेप्रमाणें ता. ६ जानेवारी स. १७७२.

सुरत पावेतों आटोप त्यांचा जाला." हें पत्र ता. २२ जून १७७२ चें म्हणजे मृत्युपूर्वी पांच महिन्यांतलें वाचून माधवरावाचा हा राज्याचा कयास त्याच्या जिव्हारीं किती लागला होता याची कल्पना होते. पूर्व-पश्चिम किनाऱ्यानें इंग्रजांचा वेढा भरतभूमीला पडला. §

गाजीउद्दीन मराठ्यांना अनुकूल होता, म्हणून त्याजवर मुसलमान पक्षाचा मोठा राग झाला. तसा तो कर्तृत्वशून्य नव्हता. त्याला कांहीं तरी काम देऊन गुंतवून ठेवावें अशी सरदारांची इच्छा असतांही बादशहाला तो दृष्टीसमोर नको होता. बादशहाच्या मर्जीखातर प्रस्तुत झाबेताखान मीरबक्षी व मीर्झा नजफखान कारभारी अशी योजना बनली. येणेंकरून गाजीउद्दीनची अन्नान्न दशा होऊन प्राण वांचविण्यासाठीं तो जाठ वगैरेकडे लपून छपून राहिला. त्याचे पूर्वोपकार स्मरून माधवरावानें त्यास काल्पीजवळ दोन लक्षांची जागीर नेमून दिली. तेथें त्याचा जम बसेना म्हणून तो पुण्यास पेशव्याचे भेटीस आला. तत्पूर्वी थोडे दिवस पेशव्याचा अंत झाल्यामुळें नारायणराव पेशव्यानें ता. ६ मार्च १७७३ रोजीं पुण्यांतून त्यास त्याच्या जागिरीवर रवाना केलें. पुढें बहुत वर्षें तिकडे काढून तो २८ मे स. १८०२ रोजीं मरण पावला. ‡

**११. नजीबखानाची फिटाफीट**—आतां फक्त झाबेताखान तेवढा एकटा विरोधक राहिला. महादजीला त्याचा सूड घेण्याची उत्कंठा असून पैशाची अडचण भागविण्यासाठीं विसाजीपंत व महादजी यांनीं स. १७७२ च्या फेब्रुवारींत बादशहास घेऊन रोहिल्यांवर चाल केली. सर्व घसारा झाबेताखानावर आला. हाफीज रहमतनें झाबेताखानास मदत केली नाहीं. मराठ्यांस अटकाव करण्यासाठीं रोहिल्यांच्या अनेक टोळ्या गंगेच्या कांठीं ठिकठिकाणीं जमा झाल्या. दत्ताजी सिंद्याचे वेळचा शुक्रतालचा डाव पुनः उद्भवला. परंतु महादजी त्यास वस्ताद भेटला. त्यानें हुलकावण्या दाखवून गंगेच्या पलीकडे जाऊन रोहिल्यांचा फन्ना उडविला. झाबेताखान शुक्रतालच्या किल्ल्यांत बंदोबस्तानें राहिला असतां ता० ४ मार्चला सिंद्यानें त्याजवर तोफांचा मारा केला, त्याबरोबर झाबेताखानाची दाणादाण उडून तो जीव बचावण्यासाठीं काळोख्या रात्रीं शुक्रतालमधून निघून गंगेपलीकडे बिजनोर प्रांतांत पळून

---

§ कै. या. पृ. १५९. पारसनीसकृत बु. प्र. पृ. १५९ वरील ता. २५ जानेवारी १७७२ चें पत्र परिस्थितीचा तपशील देतें. ‡ मा. रो. १·७०; ख. १२४१; पे. अखेर बखर पृ० ११६.

गेला. मराठे लगोलग त्याचा पाठलाग करून मुलूख उध्वस्त करीत नजीबगडावर धावले. झाबेताखान तेथूनही निसटला आणि एप्रिलांत रोहिल्यांचें तें मुख्य ठिकाण मराठ्यांनीं हस्तगत केलें. यासच फत्तरगड, (पथ्थरगड) नजीबाबाद हीं नांवें असल्यावरून मराठी कागदांत या स्वारीस पथ्थरगडची स्वारी असें नांव आढळतें. झाबेताखानाचीं मुलेंमाणसें व सर्व दौलत मराठ्यांचे हातीं आली. नजीबखानाची कबर मराठ्यांनीं फोडून विच्छिन्न कली, आणि त्यानें पानिपत-वरून नेलेल्या तोफा व दुसरी अपार संपत्ति परत मिळवली. कांहीं मराठी बायका पानिपतावरून नेलेल्या यावेळीं परत मिळाल्या असें सांगतात. नजीकच रोहिल्यांचा दुसरा किल्ला घोसगड म्हणून होता तोही मराठ्यांनीं घेऊन त्यांचा अगदीं उच्छेद करून सोडला. कत्तल, लूट, जाळपोळ, इत्यादि बाबतींत पूर्वीच्या कृत्यांचा पुरेपूर सूड या प्रसंगीं मराठ्यांनीं उगविला. आपल्या बंधूंनीं राष्ट्रासाठीं जे कष्ट व प्राणत्याग केले त्याची पूर्ण भरपाई पथ्थरगडच्या या स्वारींत आपण करून दिली, असा योग्य अभिमान महादजीस अखेरपर्यंत वाटत असे. "रोहिले एवढे शूर, परंतु मराठ्यांचा एखादा स्वार दृष्टीस पडतांच त्यांनीं आपल्या जागा सोडून धूम पळत सुटावें, मराठ्यांसमोर उभें राहण्याचा मगदूर कोणाचा राहिला नाहीं. लोक राहता प्रदेश सोडून हिमालयाच्या पायथ्याशीं तराईत पळून गेले. झाबेताखान जाठांचे आश्रयास जाऊन राहिला". नारायणरावानें सरदारांचें अभिनंदन करून कळविलें, झाबेताखानास मोडून ताराज केलें, तो पळून पहाडांत गेला, युद्ध मोठें झालें, शुक्रताल घेतलें, पथ्थरगड घेतला, त्यांची दौलत हत्ती, घोडे, तोफा वगैरे सरंजाम पाडाव केला, स्वामींच्या फौजेस मोठें यश आलें याचा विस्तार लिहिला तो श्रवण होऊन संतोष झाला. तुम्हीं सर्वांनीं अमित यश संपादिलें. रोहिला अतिगर्वित होता, त्यांनीं फार अन्याय केले होते, त्यांचें पारिपत्य यथायुक्त केलें, मोठें यश संपादिलें." (ता० २८ मे स. १७७२) *

रोहिल्यांच्या युद्धाची ही हकीकत विसाजी कृष्णानें पेशव्यास कळविली आणि लिहिलें, "श्रीगंगापार जाण्यास सिद्धता करून गेलों. गंगेस पाणी फार असतां प्रार्थना करतांच स्वामींच्या पुण्यप्रतापें भागीरथीनें उतार दिला. जाबेताखान तयार होऊन लढाईस सन्मुख जाहाला. त्यानें तोफखाना व जंगी सामानाचा

* पे. द. ४५ पृ० ११६–१२४. पृ. १२४ वरील इंग्रजी टीप पाहा.

मार आम्हांवर अतिशय केला. तत्रापि सरदार लोकांनीं जीवित्वाकडे न पाहतां स्वामिसेवेवर नजर देऊन तोफखान्याची मारगिरी करून छातीचा कोट करून दोन प्रहर मर्दुमीनें युद्ध होऊन रोहिल्यांचा फत्तरगड किल्ला कावीज केला. स्वामींच्या पुण्यप्रतापेंकरून फत्ते केली." या विजयाबद्दल माधवरावानें सरदारांचें अभिनंदन करून कळविलें, "वर्तमान श्रवण करून फार संतोष जाहला. जाबेताखान रोहिला पातशाहींत फौजेनें व मर्दुमीनें अतिगर्वित होता. तुम्हीं सर्वांनीं एकदील होऊन रोहिल्यांचें पारिपत्य केलें ही गोष्ट अतिउत्कृष्ट केली. सर्वांनीं जिवापेक्षां श्रम करून रोहिल्यांचें पारिपत्य केलें, धन्याचा नक्षा हिंदुस्थानांत वृद्धिंगत केलात. शाबास तुमची. सर्वांनीं एकनिष्ठेनें सेवा करून स्वामिकृपा संपादिली. सिंदे-होळकरांच्या वडिलांनीं महत्कार्य करून शत्रु पादाक्रान्त केले त्याच रीतीनें हेही करितात, या दौलतीचे स्तंभ आहेत. ती० कै० आपासाहेबीं दयाबहादूर सुभा उज्जनीचा सफा बुडविला व वसईचा फिरंगी नेस्तनाबूद केला, त्याचप्रमाणें तुम्ही हा रोहिला गारद केला त्याची तारीफ किती ल्याहावी. सारांश, हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांवर जरब बसवोन उत्कृष्ट पराक्रम केलात, या उपरी क्रोडों पैका मिळावयाचा प्रसंग आहे, त्याची तरतूद तुम्ही करीतच असाल. अंतर्वेदींत महालांचा तह करून कमावीसदार नेमून रसदा घेऊन हुजूर पाठवणें. इकडे त्रिंबकराव विश्वनाथ यांनीं हैदरनायकास लुटून फस्त केल्याचें वृत्त लिहून पाठविलें आहे. सांप्रत कालीं उत्तर व दक्षिण दोन्ही कर्में वडिलांचे पुण्यप्रतापें महद यश प्राप्त जालें." ‡

यावरून माधवरावानें मृत्युपूर्वी चार पिढ्यांचे संकल्प पुरे करून मराठशाहीचा अंमल सर्व देशावर कसा बसविला हें लक्षांत येईल. या विजयांमुळें इंग्रज, शुजाउद्दौला, बादशहा इत्यादि मंडळी अस्वस्थ व दुश्चित झाली याचें आश्चर्य वाटावयास नको. झाबेताखानाची खटपट बापाची मीरबक्षीगिरी आपणास मिळावी अशी असून बादशहा शुद्ध मतलबी होता. महादजी सिंदे एवढा एकच त्याच्या कारस्थानांस अखेरपर्यंत पुरा पडला. शुजाउद्दौला दीर्घसूत्री व कर्तृत्वशून्य होता. स. १७७२च्या पावसाळ्यांत मराठ्यांनीं आपली छावणी रोहिलखंडांत करावी अशी विश्वासघातकी सूचना शुजानें केली ती विसाजीपंतानें मोडून रोहिल्यांशीं स्वतंत्र तह चाळीस लाखांवर

‡ पेठे द० १. ६९, २२ जुलई १७७२.

टरविला. विसाजी कृष्णाचा पराक्रम माधवरावास एवढा अपूर्व वाटला कीं तो पुण्यास आल्यावर सुवर्णपुष्पें उधळून सन्मानानें शहरांत आणावें अशी आज्ञा त्यानें मृत्युपूर्वी लिहून ठेविली. §

विसाजीपंताच्या पराक्रमानें शुजाउद्दौला अत्यंत भयभीत झाला. त्याला वाटूं लागलें हे मराठे आपलीही केव्हां तरी अशीच वाट लावतील. सिंदे-होळकरांचें सूत तर कधींच नव्हतें. होळकर सदा झाबेताखानाची कड घेई. अशा स्थितींत विसाजीनें दूरदृष्टीची तटस्थ वृत्ति स्वीकारून अवघड राजकारण सांभाळिलें. त्यानें झाबेताखानाची समजूत काढून दंड घेऊन त्याचीं मुलेंमाणसें सोडून दिलीं. बादशहानें मीर्झा नजफखान यास मीरबक्षी करून मराठ्यांचा पाडाव करण्याची सूचना केली. दिल्लीबाहेर मराठ्यांचा तळ असतां बादशहाची पंधरा हजार फौज ता० १८ डिसेंबर स. १७७२ रोजीं एकाएकीं मराठ्यांवर चालून आली, त्या प्रसंगीं मराठ्यांनीं बादशहाचा पराभव करून त्यास शरण येण्यास भाग पाडलें. यामुळें बादशहाची अत्यंत नाचक्की झाली. पण हीं कारस्थानें दिल्लींत रंगत असतांच पेशवा माधवराव पुण्यांत कालवश होऊन मराठ्यांची सत्ता उत्तर पंथास लागली तो प्रकार पुढील इतिहास सांगतो.

माधवराव मृत्युशय्येवर पडला असतां उत्तरेंतील राजकारणास रंग चढत गेला. शुजा व रोहिले यांनीं संगनमत करून मराठ्यांचीं ठाणीं उठविण्याचा उद्योग आरंभिला, तेव्हां तुकोजी होळकरानें स. १७७३ च्या आरंभीं रोहिल्यांवर चाल केली. विसाजीपंत मोठा तोफखाना घेऊन तुकोजीचे मदतीस गेला, तेणेंकरून रोहिल्यांवर दहशत बसून हाफीजरहमतनें मराठ्यांशीं तह करून वैर मिटविलें. हा प्रकार शुजास मानवला नाहीं. रोहिल्यांचा द्वेष त्याच्या मनांत भारी वागत होता. त्यासाठीं इंग्रजांचीं पलटणें आणून त्यानें रोहिल्यांचा निःपात केला. याच बाबतींत पुढें वॉरन्हेस्टिंग्सवर गहजब उडाला, तो प्रकार इतिहासांत महशूर आहे. माधवरावाचा असा ऐन तारुण्यांत अंत झाला नसता तर हिंदुस्थानचा भावी इतिहास कसा बदलला असता हें यावरून सहज कळून येतें.*

---

§ पे. द. २९. २७६. स्वारीचे आर्थिक तपशील पे. द. २९·२८३ त पाहावे.

* ऐ. टि. ६. १७, रोहिलखंडचें बातमीपत्र.

## ४. कालसूची, दादाची उद्वेगकारक कहाणी

| | | | |
|---|---|---|---|
| स. १७३४ | ऑगस्ट | १८ | रघुनाथराव दादाचा जन्म. |
| १७४५ | | | अहल्याबाई पुत्र मालराव होळकर जन्म. |
| १७४७ | | | आनंदीबाईचा जन्म. |
| १७६४ | जानेवारी | १ | त्रिंबकक्षेत्रीं दादाचा निवृत्तीचा निवास. |
| ,, | एप्रिल | | अग्निहोत्र घेण्याची तयारी. |
| ,, | मे | ४ | आनंदीबाईची आनंदवल्लीस वसती. |
| १७६५ | जून | १६ | दौलत वांटणीची मागणी. |
| १७६६ | मे | २० | मल्हारराव होळकर मृत्यु. |
| ,, | जुलई | २३ | मालराव होळकरास दौलतीचीं वस्त्रें. |
| १७६७ | मार्च | २७ | मालराव होळकर मृत्यु. |
| ,, | ,, | ३० | दादाची इंदूरवर स्वारी. |
| ,, | सेप्टेंबर | १३ | माधवराव व दादा भेट नांदूर येथें. |
| ,, | ऑक्टोबर | २५ | पावेतों उभयतांचा आनंदवल्लीस मुक्काम. |
| ,, | डिसेंबर | १९ | ब्रोम व दादा यांची भेट नाशकास. |
| १७६८ | एप्रिल | १९ | अमृतरावाचें दत्तविधान. |
| ,, | मे | | महादजी राहुरी येथें पेशव्यास सामील. |
| ,, | जून | १० | धोडपची लढाई, दादास कैद, साथीदारांस शिक्षा. |
| ,, | जून | २२ | उभयतांचा पुण्यांत प्रवेश, शनिवारवाड्यांत कैद. |
| १७६९ | एप्रिल | २ | दादाचा फितूर उमगला, कैद सख्त. |
| ,, | ऑगस्ट | ४ | दादाचा उपास व त्रागा एक आठवडा. |
| ,, | सेप्टेंबर | ७ | माधवरावावर खुनाचा शस्त्रप्रयोग. |
| १७७२ | फेब्रुवारी | | कैदेंतून दादाची सुटका. |
| ,, | ऑक्टोबर | ६ | दादाचा फितुर, पुनश्च कैद. |
| ,, | नोव्हेंबर | १८ | पेशव्याचा मृत्यु. |
| १७८० | जून | ५ | दादाची कनिष्ठ स्त्री मथुराबाई मृत्यु. |

## — ४ —

# दादाची उद्वेगकारक कहाणी

## १७६५ – १७६८

१. क्षणभंगुर चित्त. २. दौलत वांटणीची मागणी.
३. अहल्याबाईचा उच्छेद. ४. दसरा-दिवाळीचा वरकरणी समेट.
५. धोडपेची झोडप. ६. पुण्यांतील बंदीवास.

**१. क्षणभंगुर चित्त** — माधवरावाच्या कारभाराचा कष्टमय भाग त्याच्या चुलत्याच्या वांट्यास येतो. तद्विषयक संदर्भ पूर्वीच्या प्रकरणांतून प्रसंगानुसार आला आहे आणि पुढेंही येईल. तथापि उभयतांच्या कलहाचा मुख्य गाभा तत्कालीन लेखांत उतरलेला येथें स्वतंत्र सांगावयाचा आहे. अनुभवाच्या व वडीलकीच्या नात्यानें दादानें कारभारांत पुढारीपण घेणें वावगें नव्हतें. पहिल्या तीन वर्षांतील शिकाऊ परिस्थितींत त्यानें केलेला कार्यभाग पूर्वीं सांगितलाच आहे. राक्षस-भुवनावर माधवरावाची लायकी सिद्ध होऊन तो आपलें काम मुखत्यारीनें पाहूं लागला, आणि ही कबुली खुद्द दादानेंच ठांसून सांगितल्यावर त्यानें पेशव्याच्या आज्ञेंत वागणें हेंच त्याचें कर्तव्य होतें. निदान वांकडी गोष्ट पेशव्याच्या नजरेस आणली कीं त्याचा कर्तव्यभाग संपला. परंतु त्याला कळून चुकलें कीं माधवरावा-पुढें आपला आतां प्रकाश पडत नाहीं, म्हणून तो आडमार्गानें जाऊं लागला. राज्यहिताच्या दृष्टीनें माधवरावाचें साह्य मनापासून करणें हा एकच त्याचा कर्तव्यमार्ग असून तो स्वीकारणें नसल्यास संसारनिवृत्तीचे जे विचार तो बोलून दाखवीत होता, ते तरी मनापासून त्यानें सर्वथा कृतींत आणिले पाहिजे होते. माधवरावाजवळ इतकीं कामें तटलेलीं होतीं कीं तीं तो मनापासून करता तर राज्याचें कोटकल्याण झालें असतें. पण निष्प्रभ होऊन स्वस्थ बसण्याचा दादाचा स्वभाव नव्हता. त्याच्या शब्दांत व कृतींत मेळ असा कधीं बसलाच नाहीं. चिंतो विठ्ठल वगैरे त्याचे पक्षपाती स्वतःच्या मतलबास्तव त्यास वेळीं अवेळीं भलतीच भर देत. जवळची शागीर्द मंडळी सुद्धां अवास्तव स्तुति करून त्यास चढवीत. तेणेंकरून राज्यांत निरर्थक पेंच मात्र उत्पन्न

होत. या बाबतींत त्याची बायको आनंदीबाई त्याची साथ किती करी हें सांगणें कठिण आहे. तिचा जन्म स. १७४७ च्या ऑक्टोबरचा असून नवऱ्याहून ती बारा वर्षांनीं लहान, माधवरावाहून दोन वर्षांनीं मोठी. वरचेवर मुलें होत असल्यामुळें राजकारणी वाटाघाटींत ती फारशी जवळ नसावी. शिवाय नवऱ्याची गोष्ट तिला न आवडली तरी त्यास उघड विरोध दाखविणें तिला मुळींच शक्य नव्हतें. नवऱ्याच्या उठाठेवी तिला माहीत असाव्या, कळत असाव्या हें साहजिक आहे. तथापि राज्याचा अर्धा वांटा मागणें, अहिल्याबाईवर चढाई करणें, महादजी सिंद्यास बंडखोर ठरविणें, अमृतरावास दत्तक घेणें, किंवा नारायणरावास अटकेंत घालणें, असल्या राजकारणी विषयांत तिला दोषी ठरविणें अन्यायाचें होईल. आपल्या समाजांत नवऱ्याकडून बायकोचा कोंडमारा कसा होतो हें लक्षांत घेऊनच असले नाजूक विषय हाताळले पाहिजेत. पुरुष जात्या चांगले, बायकोच्या शिकवणीनें भलतसे वागतात हा समजही त्यावेळीं प्रबळ होता हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. आनंदीबाई धूर्त व दक्ष होती, नेभळट नव्हती. नातेवाईकांस व आतेष्टांस भेटून किंवा पत्रें पोपाख पाठवून ती अनेकांचा परामर्ष घेई, पण माधवरावाशीं चाललेल्या कलहांत तिचा हात नसावा असें स्पष्ट दिसतें. एवढे सामान्य विचार लक्षांत ठेवून आतां आपण दादाचें आख्यान कसकसें रंगत गेलें तें पाहूं.

ता० १ जानेवारी स. १७६४ रोजीं माधवराव मातुश्रीस लिहितो, " दादांनीं कर्नाटकांत यावें म्हणून बहुत आग्रह केला, परंतु त्यांचे चित्तास न येऊन त्रिंबकास जावें असें ठरलें. तेथें कारभार करावा असा प्रकार नाहीं. स्वस्थ जाऊन बसावें या अर्थें जाणार. बरोबर गोविंद शिवराम व त्रिंबकराव पेठे जातात. आबा पुरंदरे, नारोशंकरही सत्वरच जातील." पहिले दोघे माधवरावाचे पक्षपाती होते. अशी व्यवस्था ठरून पेशवा कर्नाटकचे स्वारीस गेला. तरी तो चुलत्यास वारंवार पत्रें पाठवून प्रकृति विचारी, महत्त्वाचीं कामें लिहून कळवी, सल्ला मसलत घेई. शिवाय निजाम, भोसले, सिंदे अशांचीं प्रकरणें व पुण्याचा कारभार त्यानें दादाकडेच सोंपविला होता. ता. २५ जानेवारीस पेशवा निजामाकडील आपल्या वकिलास लिहितो, " निजामलीखानाकडील बातमी तुम्ही तीर्थरूपांकडे लिहितच असाल, इकडेही बातमी बारीक मोठें वर्तमान लिहीत जाणें." यावरून उघड आहे कीं चुलत्यास दुखविण्याचें

कांहीं एक कृत्य माधवरावानें केलें नाहीं. फेब्रुवारींत नारोशंकर लिहितो "दादांची आज्ञा घेऊन रावसाहेबांचे स्वारींत चाकरीसाठीं विजापुर मुक्कामीं, हजर झालों. बहुत कृपा करतात." पूर्वीचा माहीतगार म्हणून सखाराम बापूस पेशव्यानें आपल्या बरोबर कर्नाटकांत नेलें. असें सर्व सुरळित चालू असतां दादांचें मन त्यास स्वस्थ बसूं देत नव्हतें. मल्हारराव होळकरानें दादास उत्तरेंत नेण्याचा बेत चालविला. "फौजेचे सरंजामास पंधरा लक्ष पाहिजेत त्याची तर्तूद मल्हारबांनीं केल्यास हिंदुस्थानांत जावें, नाहीं तर चैत्रमासीं अग्नि-साधन करून गंगेचा वियोग न करावा असें चित्तांत आहे. कर्नाटकांत चलावें म्हणून आबा पुरंधऱ्यांनीं आग्रह फारच केला, परंतु मनांतून जाण्याचें नाहीं." हें वर्तमान १७ मार्च स. १७६४ चें आहे. × दरम्यान माधवरावानें मातुश्रीच्या कारकुनास विचारलें, "प्रस्तुत दादा कोठें आहेत, मर्जी व बोलण्यांत भाव काय आहे, इकडील वर्तमानें तिकडे काय जातात, पुरंदरे वगैरे काय काय प्रकार घाटतात, मातुश्रींच्या व दादांचे बोलण्याचा प्रकार काय झाला वगैरे लिहिणें." मार्चांत मातुश्री गोपिकाबाई पुण्याहून नाशकास गेली. दादांचा उद्वेग दूर करून त्यांची समजूत घालावी असा प्रयत्न तिनें या वेळीं केला. म्हणजे निवृत्तीचें ढोंग सोडून त्यानें राज्याचे कामांत मनापासून भाग घ्यावा असा प्रयोग सर्व जाणत्यांनीं चालविला हें स्पष्ट आहे. ता. ४ मे रोजीं त्रिंबकराव नाशकाहून लिहितो, "श्रीमंतांनीं किल्ले त्रिंबकची पेठ पसंत करून नवें घर बांधलें. दुसरें घर चावडस येथें बांधलें. जवळच कोसावर जलालपुर म्हणून आमचा गांव आहे तेथें मातुश्री येऊन राहिली. श्रीमंतांचा संतोष राखण्याकरितां तीही गंगापुरास आली. आठपंधरा दिवशीं श्रीमंत येऊन त्यांना भेटतात, आम्ही दोंचौ दिवशीं श्रीमंतांचे दर्शनास जातों. दादांचा कुलअखत्यार चिंतो विठ्ठलावर आहे. मातबर कारभारी आबा पुरंदरे. होळकर मंडळी सर्व कल राखण्याकरितां येऊन राहिले. सारें कूट एक आहे. सर्व मायेंत शिरोन दौलत बुडेल तर बुडो, परंतु आपले स्वार्थाचा मार्ग पाहतात. श्रीमंतांचा प्रकार क्षणभंगुर. गोविंद शिवराम व आम्ही जितकें बोलणें तितकें बोलतों. परंतु जवळपास तीच मंडळी विपरीत भासवितात. अग्निहोत्र घेणार होते. कुंडें घालून संकल्प करण्यापर्यंत आल्यावर, हे किरकिर आम्हांस पुरवणार नाहीं असें म्हणून कुंडें गंगेंत टाकलीं. पालख्या-घोडीं पाठवून भट

---

× पे. द. ३९·२४.

जमा केले होते त्यांस निरोप दिला. त्यांचा कारभारी चिंतो विठ्ठल मनस्वी, दौलत बुडविण्यांतच जमा आहे." यावरून दादाच्या अनिश्चित व लहरी स्वभावाची पारख होते. त्यास सांभाळावें कसें हाच मुख्य पेंच पडून तूर्त तो कार्यभाग मातुश्रीनें स्वीकारला. दादाहून ती सुमारें दहा वर्षांनीं तरी वडील होती.

स. १७६४ च्या या उन्हाळ्यांत दादाच्या मनाची तारांबळ उडण्यास पुरंदरच्या कोळ्यांचें प्रकरण उद्भवलें. तो संदर्भ येथें ध्यानांत वागविला पाहिजे. किल्ले पुरंदर श्रीमंतांनीं सरकारांत घेतला त्यामुळें आबा पुरंदरे दादासाहेबापासून रुसवा करून नाशकाहून पुण्यास आले, त्यावरून पुण्यास गडबड उडाली. आपणांस फसविण्याकरितां मुद्दाम पेशव्यानें नामा निराळे राहून परभारें हें कृत्य करविलें अशी दादाची समजूत झाली. 'पुरंदरामुळें फारच विपरीत प्रकार दर्शवितात, मनस्वी भाषणें करितात.' हें प्रकरण वर्षभर पुरलें. ता. ३० जून रोजीं माधवरावानें चुलत्यास कळविलें, "सरदार डोईजड व पत कोठेंच राहिली नाहीं. चाकरीकरितां नेट धरून बोलल्यास वडिलांस विपरीत प्रदर्शन करून तत्काळच घरांत पेंच पाडून राहिली हेही दौलत बुडवावयास सिद्धच आहेत. दौलतीचा बंदोबस्त करणार वडील समर्थ आहेत. आम्ही आज्ञेप्रमाणें वर्तावें, सेवा करावी यांतच इहपर लोक आहे. मर्यादा सोडून लिहिलें म्हणून वाईट न मानलें पाहिजे." यावरून दादाकडून बंडखोर सरदारांस कशी फूस मिळत असे आणि यासाठीं माधवराव त्याचीं आर्जवें कशीं करीत होता हें दिसून येतें.

कर्नाटकांत जातेसमयीं उभय खाशांचा असा करार ठरला होता, कीं नाना फडणिसानें पुण्याचा कारभार करावा आणि दादांनीं स्नानसंध्या करून नाशकास स्वस्थ बसावें. हा करार त्यानें पाळला नाहीं. आपणच नाशकास बसून कारभार करूं अशा उद्देशानें त्यानें नानास नाशकास बोलावून नेलें. अर्थात् एकमुखी कारभाराची घडी बिघडून पुनः दुही उत्पन्न झाली. पेशवा नाना फडणिसास लिहितो, "येथून तीर्थरूपांस दोन चार वेळां लिहिलें कीं पुण्यास यावें, परंतु येणें न झालें, तुम्हांसच तिकडे बोलावलें. तरी त्यांस सविस्तर अर्थ समजावून ऐवज जथे ते गोष्ट करणें."§ दादांनीं अमदाबादचा कारभार आपाजी गणेशाकडून काढून गोपाळराव गणेशास सांगितला. तेणेंकरून घोटाळे माजले. दादांच्या कारभारामुळें उत्पन्नांत भराभर तूट येऊं लागली.

§ पे. द. ३९, ३४, ४७.

कोणतेंही प्रकरण दौलतीच्या दृष्टीनें न पाहतां, आपला शह माधवरावावर कसा राहील हा मतलब दादाचा स्पष्ट होत गेला. आपसांतील मतभेद बाहेर दिसूं नयेत हा माधवरावाचा कटाक्ष तर आपल्या पक्षास बळकटी आणण्याचा दादाचा प्रयत्न चालू झाला. नाशकास राहून दादाजवळ कारभार करणें नानास बनेना. नानाचे बोलण्यावर दादाचा विश्वास बसेना, 'दुसरे आम्हांपेक्षां अधिक विश्वासु, त्यांचेंच प्रमाण' असा प्रकार होत गेला. मुख्यतः दोनमुखी हुकमत अशक्य होऊन नानाफडणीस वैतागून परत पुण्यास आला; आणि दादानें भलतेंच कांहीं करूं नये म्हणून त्यास माधवरावानें आपलेकडे कर्नाटकांत बोलवून घेतलें तो प्रकार पूर्वी सांगितला आहे.

माधवरावाचा कारभार उघडा होता, तसा दादाचा नसल्यामुळें त्यास पुष्कळदां आंत एक बाहेर एक असे दुटप्पी मतलबाचे प्रकार आचरावे लागत, त्याचीं उदाहरणें थोडीं नाहींत. आबाजी महादेव, गोपाळराव गणेश बर्वे व बऱ्हाणपुरचा सुभेदार नारोकृष्ण दर्वे हीं दादाचीं माणसें माधवरावास जुमानीनात. हें तो तडफदार पेशवा थोडेंच सहन करणार! त्याचा कारभार उघडा, सरळ आलें म्हणजे भीडमुर्वत कोणाची नाहीं. अशा स्थितींत वाटेल ते लपंडाव करून आपल्या माणसांचा बचाव करण्यांत दादाची काय त्रेधा उडे ती विचारूं नये. एकएका व्यक्तीचें प्रकरण म्हणजे स्वतंत्र आख्यानच होईल, तसें तें येथें सांगत बसण्याची आवश्यकता नाहीं. नारोकृष्ण बऱ्हाणपुरचा सुभेदार माधवरावाचे हुकूम जुमानीना. दादा उत्तरेंत असतां ता. ४ जून स. १७६६ च्या पत्रांत माधवराव लिहितो, 'नारोकृष्णांनीं हुकूम न मानतां जाबसाल केले. त्यावर खिजमदगाराबरोबर त्यास पत्र सादर केलें, त्याशींही मनस्वी भाषण केलें. तदुत्तरही पत्रें माणसें पाठविलीं, त्यांस शहरांत घेतले नाहीं. बेदिलीच्या व अमर्यादेच्या गोष्टी सांगितल्या. माणसें फिरोन आलीं. एवंच हा मार्ग पडतो. यांत खावंदगिरीचा बोज काय? यास्तव अशा गोष्टीचें पारिपत्य झालेंच पाहिजे. काम थोडें म्हणून कानाडोळा करावा तर लौकिकांत वाईट, म्हणोन मल्हारराव पानशे यांस फौजेसह पाठवून कैद करून आणिलें. कैद वडिलांची, अमर्यादा नसावी, सेवक लोकांनीं मर्यादेनें वर्तावें. आज्ञा वडिलांचीच आहे. नाहीं तर नारोकृष्णावर असा प्रकार व्हावासें नाहीं." * राज्यांत शिस्त

* का. सं. प. या. २११, २१३.

कशी पाहिजे याचा हा दंडक पुतण्यानें चुलत्यास शिकविलेला त्यास दुःसह होऊन त्याची त्रेधा उडाली. शेख्याजी आयतोळे अंतस्थपणें दादाच्या पक्षांतला होता, त्याची भलतीच पायधरणी करून निभाव करण्याची पाळी दादावर आली. ता. २२ जुलईस आयतोळ्यास दादा गोहदेहून लिहितो, " रावसाहेबांनीं नारोकृष्णावर इतराजी करून पारिपत्यास मल्हार जगजीवन पाठविले. नारोकृष्णांनीं आपले मतलबाकरितां चिरंजिवांचेच होऊन राहावयाचें होतें. दहावीस हजार तोटा जाहला असता तरी चिंता नव्हती. इकडून बंदोबस्त करावा तर सध्याच गृहकलह होऊन पेच पडणार. याजकरितां बऱ्हाणपुर शहर द्यावें हें उचित जाणोन तशीं पत्रें नारोकृष्णाकडे पाठविलीं आहेत. आमचें अंग यांत आहे असें दाखवूं नये. जाहिराणा न होतां गुप्त कुमक केलीत तर कार्यास येईल. चिरंजीव बातमी बहुत राखतात, ते संभाळून गुप्त कुमक होईल तर करणें. फौज येईल त्यास बाह्यात्कारी सामील होऊन चिरंजीवांची मर्जी राखणें. गुप्त प्रकार निराळाच करणें. हिय्या असला तर दम धरून राहणें, नाहीं तर शहर स्वाधीन करून नारोकृष्णांनीं तूर्त नाशकास जाऊन राहणें. हें पत्र फारच गुप्त ठेवणें. कोणास न दाखवणें. येथून कुमक करावी तरी गृहकलहामुळें मागें नाश जाहले, दौलत खराब जाहली तसेंच पुढें होणार, यास्तव तूर्त शहर हवालीं करून अब्रूस धका देऊं नये, हें उत्तम आहे. " या पत्रावरून दादाची नीति उत्कृष्ट कळून येते. छाती ठोकून पुतण्याशीं दोन हात उघडपणें करणें एका अर्थानें त्याला शोभलें असतें. अशा भ्याड व दुटप्पी वर्तनानें तो मराठ्यांची दौलत कशी सांभाळणार होता हें कळत नाहीं. उगाच हाताखालच्या गरीबांस बळी देऊन आपण नामानिराळें राहणें हें राज्य करणारास अत्यंत लांछनकारक होय. दादास हें सर्व कळत असूनही तो उगाच वेड पांघरून चाचपडत होता. नारोकृष्णाच्या या एका प्रकरणावरून इतर कारभाराची कल्पना होईल. त्यास माधवरावानें पकडून जेरदस्तींत ठेविलें. पुढें घोडपवर दादाचा निकाल लागल्यावर अशा हस्तकांचाही यथाकाल निकाल पेशव्यानें दंश न ठेवतां करून दिला. ‡

आंत एक व बाहेर एक असा दुश्चित्त हेतु न धरतां दादानें सरळ एक कार्यभाग स्वतःकडे घेतला असता तर त्यावेळीं उद्योगास कांहीं तोटा नव्हता.

‡ पे. द. १९·५२, ७४.

तशी त्याची लायकी असती तर खुद्द पेशवाही त्याचे हुकमतींत वागण्यास सिद्ध होता. दादाचा मार्गदर्शक कारभारी चिंतो विठ्ठल तितकाच वक्रगामी असून पेशव्याच्या विरुद्ध या दोघांचीं कारस्थानें कधीं बंद पडलीं नाहींत. स. १७६४ च्या ऑगस्टांत दादा चिंतो विठ्ठलास लिहितो, "भोसले, मोगल, हैदर, जाधव चार एके जागां जाले इतक्यांशीं साद बांधणें दुरापास्त आहे. आम्ही खजानपूर आहों तें कळतच आहे. साल मजकुरीं आमचे वर्षप्रवेशकाळीं गुरुशुक्र सहावे पडले आहेत ते चैन पडूं देणार नाहींत. अब्रू वाचतां संकटच दिसतें. हा दैवी विचार सोडून मानवी विचार करणें तर आमचा निश्चयच आहे कीं दुसऱ्याची याचना न करावी. तुम्हीं चहूंकडे तर्तुदी कराव्या. मल्हारबांस. पत्रें लिहावीं. महादजी सिंदे चाकर रुसून गेला आहे त्यास चार पत्रें युक्तीनें लिहून गळ घालावी. तुम्ही, आबाजी महादेव, चिंतो अनंत देवस्थळे, त्रिंबक विनायक असे चौघे बसून सिद्धान्त लिहून पाठविणें. चहूंकडे पत्रांचे पूर चालविणें. पत्रामागें पत्र व बातम्या चालविणें. दिवसास निजत न जाणें. रात्रौ दीड दोन प्रहर कारभार करणें." या पत्रांत दादांच्या विचाराच्या व अवसानाच्या लहरी अंतःकरणांत कशा उठत तें दिसून येतें.

**२. दौलत वांटणीची मागणी**—शेवटीं नाशकास स्वस्थ बसतना म्हणून माधवरावानें दादांस आपल्याजवळ कर्नाटकांत बोलावून नेलें, पण 'प्रकृति फार क्षीण, अडीच प्रहरपर्यंत पोथी वाचणें, नंतर थोरले पंगतीस होईल तें अन्न जेवावें, रात्रंदिवस ईश्वरभजन करावें,' असा क्रम चालू होता. असा वैताग न करण्याबद्दल माधवरावानें त्यास परोपरी लिहिलें, "अलीकडे वडील-पणाची आज्ञा विस्तारयुक्त येत नाहीं, तेणेंकरून मजपासून आज्ञेशिवाय कांहीं वर्तणूक झाली असा संदेह वाटतो." स. १७६४ च्या डिसेंबरांत दादा नाशिक सोडून फौजा जमवीत कर्नाटकांत गेला. रस्त्यानें पटवर्धन व इतर विरोधकांचे प्रांत लुटून त्यानें बेचिराख केले. 'यवनापेक्षां निष्ठुरता धरली.' विकल्प मनांत ठेवून त्यानें आपल्या कांहीं अटी गोविंद शिवरामाबरोबर माधवरावास कळविल्या. त्यानें ते पर्याय मान्य केले. नंतर स. १७६५ च्या जानेवारीअखेर चुलते पुतण्यांच्या भेटी म्हैसूर प्रांतांत झाल्या. ता० ८ फेब्रुवारीस दादानें भावजयीस लिहिलें, "चिरंजीव बहुत शहाणे झाले आहेत, कारभार आमचे मर्जीप्रमाणें करतात. उभय तीर्थरूपांपेक्षां अधिक आहेत."

पुढें दादाचे विद्यमानें हैदराचा तह गैरफायदेशीर घडून उभयतां बरसातीस पुण्यास आले, तेव्हांपासून कलहाग्नीनें नवीन पेट घेतला. कोणताही कारभार करतांना दादाचा कांहीं तरी गुप्त मतलब पुढें येई तो पेशव्यास मानवेना. त्यांत प्रतिनिधि, होळकर व सिंदे यांचे सारंजाम ठरवितांना तेढ उत्पन्न झाली. पुण्यास येऊन आठ दिवस नाहीं झाले तोंच दादांनीं बोली घातली कीं "निमें राज्य वांटून द्यावें." माधवरावानें उत्तर केलें, राज्य कोणाचें, आम्ही वांटणार कोण ? आमच्यानें वांटवत नाहीं, सर्व तुमचेंच आहे. आम्ही चार बारगीर तसे तुम्हांजवळ राहूं. सर्व तुम्हींच करणें. असे जाबसाल होऊन तमाम परगणेकरी आले आहेत, त्यांचा हिशेब कोणी पाहत नाहींत. आज पांच रोज शिक्के होत नाहींत. कारभारही नाहीं. शिवगण शंभर मंडळी आहे. उगेच जाऊन नाना प्रकारें सांगतात. सर्व लोक दिलगीर आहेत. काय गत होईल न कळे. §

शिवछत्रपतीनें उभारलेल्या राज्याचा हिस्सा दादा पुतण्याजवळ मागतो यास काय म्हणावें ! माधवरावानें आषाढ शु० १ म्हणजे १९ जून रोजीं खालील खुबीदार पत्र चिंतो विठ्ठलास लिहिलें. "ही दौलत मोठी. या दौलतेस सर्व लहान मोठ्यांनीं अनुकूल असून ती नीट होय तेंच सर्वांनीं करावें, तें एकीकडे राहून, दौलत दोहों जागीं करावी हेंच तीर्थरूपांचें मानस, त्यास आम्हांस कांहीं करणें नाहीं, कारण कीं दौलत पहिल्यापासून एकानींच करावी, वरकडांचा भार करणारावर असावा. या प्रमाणें चाललें असतां आतां वडिलांचें मानस कीं आम्हांस गुजरात द्यावी, सर्व किल्ल्यांचा बंदोबस्त आम्हींच करूं म्हणतात. त्यास आम्हांस कांहीं करणें नाहीं. कां कीं अशानें दौलत चालणार नाहीं. दोहों जागीं दौलतीचे वांटे केल्यानें लौकिकही वाईट. यास्तव सर्व वडिलांनींच करावें. आम्ही भलते जागां स्वस्थ बसून राहूं. आपल्याआपल्यांत भांडून दौलत बुडविली हा लौकिक कशास पाहिजे. सर्व त्यांनींच करावें हें फार चांगलें. वडिलांनीं नीट केल्यावर आम्हांस सांगतील तेव्हां आम्ही जवळच आहों. हेंच प्रस्तुत काळीं बरें. तुम्हांस लिहावयाचें कारण इतकेंच कीं सर्व लोक म्हणतात ही दौलत थोर, दादासाहेब चिंतोबाचे हातीं, तेव्हां चिंतोबांनीं वडिलांस समजून सांगावें आणि या गोष्टीचा बंदोबस्त पाडावा. हें एकीकडे राहून नव्या गोष्टी नित्य निघतात हें काय ? तेव्हां या गोष्टीचा शब्द तुम्हांवर लोक आणितात. तुम्ही तर वडिलांस आपल्या तर्फेनें

§ ख. ५७४.

सांगतच असाल, परंतु वडिलांचा इतबार तुम्हांवर, तेव्हां तुम्हांवर वाईट आणितात. तुम्ही तर नीट करितां, परंतु लौकिक बाहेर कसा आहे हा तिऱ्हाइतास पुसावा. ही चिठी वाचून फाडून टाकणें. दुसऱ्यास एकंदर कळूं न देणें. दुसऱ्यास कळवाल तर शपथ असे. हेंच बोलणें रुबरू बोलावयाचें होतें, परंतु वर्तमान ऐकलें कीं तुम्हांस बरें वाटत नाहीं. यास्तव चिठी लिहिली असे." †

या पत्रांत पेशव्यानें चिंतोपंतास गौरवून खुबीनें त्याचे पदरांत अन्याय बांधला आहे. अशा रीतीनें महिना पंधरा दिवसांत राज्याच्या वांटणीची खुळी कल्पना माधवरावानें मोडून काढिली आणि दादानें स्वतंत्र स्वारीस उत्तरेस जावें अशी तजवीज ठरविली. सेप्टेंबरांत गंगातीरास जाण्यासाठीं दादा डेरे दाखल जाले. "उभयतां श्रीमंत बहुत संतोषें एक विचारें आहेत. तिळमात्र दुजाभाव नाहीं." पण हा योग फार काळ टिकला नाहीं. दादाची अंतर्यामांतील धरसोड आणि बाहेर चाललेल्या खटपटी यांचे योगानें उभय पक्षांमधलें वातावरण संशयग्रस्त व क्षुब्ध बनत गेलें. याच वेळीं दादानें आपला एक इतबारी महादेव गोविंद काकडे नांवाचा महादजी सिंद्याजवळ नेमून दिला होता, तो आकस्मिक रीतीनें मारला गेल्यामुळें सिंद्यावर दादाची वक्रदृष्टि झाली. स. १७६५ च्या कार्तिकांत उभयतां श्रीमंत वऱ्हाड खानदेशांतून भोसल्यावर चालून गेले. पुढील वर्षारंभीं तें प्रकरण उरकून दादा उत्तरहिंदच्या स्वारीस गेला आणि पेशवा मुरूमखेडावर निजामाची भेट घेऊन पुण्यास आला. दरम्यान उत्तरेंत मल्हारराव होळकर मृत्यु पावला आणि जाठांचें प्रकरण अनावर होऊन दादास अपयश घेऊन परत यावें लागलें. स. १७६६ च्या बरसातीनंतर दादाकडील अनिष्ट वर्तमानें पुण्यास आलीं, तेव्हां आपण स्वतः उत्तरेंत जाऊन बिघडलेला डाव सुधारावा, निदान गोपाळराव पटवर्धनास तरी तिकडे पाठवावें असा विचार पेशव्यानें ठरविला. पण चौघांशीं वाटाघाट करतां स्वतः पेशवा उत्तरेंत गेल्यानें आतांच तिकडे हा अंतस्थ कलहाग्नि भडकेल असें लक्षांत येऊन, पेशवा हैदरावर चालून गेला आणि १७६७ च्या बरसातीस चुलतेपुतणे जयापजय पदरांत घेऊन पुनः स्वदेशीं आले. § येतांना दादानें अहल्याबाईची कुरापत काढून समस्त मराठमंडळांत आपली नाचक्की करून घेतली, हें आणखी एक कारण त्याला चीड येण्यासारखें झालें. "सुभेदारांचा काळ झाल्यावर उभयतांचे मन-

† रा. खं. १३. ८४.

§ पे. द. २०·१८४ ; पे. द. २९· ९६, १८४ ; रा. खं. १३·१५.

ओळखीस प्रारंभ झाला," असें एक सूचक वाक्य होळकरांचे कैफियतींत आहे. मल्हारराव होळकर दादास वडील असून त्याचें वैगुण्य झांकून प्रसंग निभावून नेत असे, हा त्याचा अर्थ.

**३. अहल्याबाईचा उच्छेद**—गोहदच्या स्वारींत दादास अपयश आलें, लोकांनीं कर्जापायीं भंडावून सोडलें, तेव्हां पैसा उकळण्याचे भलतेच मार्ग त्यानें स्वीकारले. सिंदे-होळकर हे दोन समर्थ सरदार, पैकीं सिंदे या वेळीं निष्कांचन होते. मल्हारराव होळकरानें मात्र भला मोठा संचय करून तो मरतांना सुनेच्या हवालीं केला होता. मल्हारराव मृत्यु पावल्यावर सरदारीचीं वस्त्रें माधवरावानें अहल्याबाईचा पुत्र मालराव यास ता. २३ जुलई स. १७६६ रोजीं दिलीं. मालरावाचा जन्म स. १७४५ च्या असून तो यावेळीं एकवीस वर्षांचा होता, पण तो दुर्वृत्त व नालायक असल्यामुळें कारभार सर्व अहल्या-बाईच पूर्वीप्रमाणें पाहात असे. स. १७६७ च्या फेब्रुवारींत दादा गोहदवरून परत फिरला. पुढील महिन्यांत तो भेलशावरून उज्जनीजवळ आला. इतक्यांत ता० २७ मार्च रोजीं मालराव होळकर मरण पावला, तेणेंकरून होळकरांच्या दौलतींत हात घालण्याची संधि त्याला चालून आली. होळकरांचा मुख्य चालक गंगोबा तात्या यावेळीं दादाचे छावणींत होता. त्यास दादानें अंतस्थपणें वश करून घेतलें. खरी मालकीण अहल्याबाई इंदुरास होती. तुकोजी होळकर फौज घेऊन कोट्याकडे कामगिरीवर होता. अशा वेळीं दादानें गंगोबा तात्याशीं गुप्त कारस्थान रचून केवळ पैसे उकळण्याच्या बुद्धीनें इंदुरास बाईकडे बोलणें करण्यास पाठविलें. व्यवहारतः स्वतः दादानें बाईचे समाधानासाठीं भेटीस जाणें जरूर होतें, तें त्यानें न करितां सोनाराकडून कान टोचण्याचा हा प्रयोग त्यानें रचिला. तात्यानें इंदुरास बाईची भेट घेऊन ताडलें कीं बाई यावेळीं असहाय आहे. दादासाहेब फौजबंद असून चालून आले म्हणजे बाई शरण येऊन आपला संचय हवालीं करील. अहल्याबाईला दत्तक पुत्र देऊन कारभार गंगोबानें करावा असा घाट सिद्ध झाला. तात्यानें दादास कळविलें, तुम्ही बेधडक इंदूरवर चालून या. हा गुप्त प्रकार बाईला कळण्यास उशीर काय! ती बाई माणूस, मालकाच्या प्रचंड फौजेपुढें तिचा निभाव कसा लागावा! पूर्वीची चार कारकून मंडळी, मल्हाररावाची रक्षा हरकूबाई आणि कन्या उदाबाई वाघमारे जवळ होत्या, त्यांनीं व गोविंद रघुनाथ गानूनें बाईस भर दिली,

दादा चालून आले तर बेलाशक दोन हात करावे. पराभव झाला तरी बाईला वैगुण्य नाहीं. तिचें नैतिक सामर्थ्य निभावून नेईल. त्यावरून बाईनें घाईनें लढण्याची सिद्धता केली. दादाचे फौजेंत नागपुरकर भोसले, गायकवाड व इतर मंडळी होती त्यांजला बाईकडून इशारे गेले. मल्हाररावाचे घरांत ही एकच व्यक्ति कर्तबगार असून तिच्याबद्दल चहूंकडे मोठा आदर होता. तुकोजी होळकरास तिनें सर्व वर्तमान कळवून तावडतोब जवळ बोलाविलें. " दादानें आपले सरदार शेख्याजी आयतोळा व आनंदराव गोपाळ मुलखाचे जप्तीस पाठविले. बाईनीं उत्तर केलें, एक खेडें द्यावयाशीं अनुकूल पडत नाहीं. तिनें बुळ्याचें पथक रवाना केलें त्यांनीं आयतोळा मोडला, मृत्यु पावला, वर्तमान ऐकून श्रीमंत बहुत क्रुद्ध. अहल्याबाई प्यादा तोफखाना घेऊन इंदुरीं ठासून बसल्या आहेत. होळकर, सिंदे, भोसले सर्व एकवटले आहेत. इंदुरास जावें असें दादासाहेबांचे मानस आहे. बाई म्हणते मजपाशीं एक रुपयाही नाहीं. दादासाहेबांचे चित्तांत मुलूख दिल्हा तो घ्यावा, शिवाय नजर घ्यावी. दादा-साहेबांपुढें कोणाचाही वक्र चालत नाहीं. मर्जी बहुत कठिण जाली आहे. * "

दीड दोन महिने दादानें होळकराच्या दौलतींत हा घोळ घातला. स. १७६७ चे एप्रिल-मेचे दादाचे मुक्काम उज्जन प्रांतांत झाले. बाईपुढें त्याचें सामर्थ्य फिकें पडलें. तिनें दादोबा वाघोलीकर हा आपला वकील मोठा विश्वासु होता त्यास पुण्यास माधवरावाचे भेटीस पाठवून त्यास सर्व हकीकत कळविली, आणि दादानें चालविलेला अत्याचार त्याचे नजरेस आणिला. पेशव्याला चुलत्याचें वर्तन बिलकूल पसंत पडलें नाहीं. त्यानें बाईस कळविलें, " तुमचे दौलतीविशीं पापबुद्धि ठेवील त्याचें पारिपत्य बेलाशक करावें आणि आपले दोघे विश्वस्त हुजूर पाठवावे. " या सूचनेनुसार नारोगणेश व शिवाजी गोपाळ या दोन आपल्या खासगीकडील इसमांस तिनें माधवरावाकडे पाठवून निकाल आणविला. पेशव्यानें तुकोजी होळकराचे नांवानें सरदारी करून दिली. § या कामांत गोविंद रघुनाथ गानू हा अहल्याबाईचा विश्वासु सेवक अखेरपावेतों तिच्या मर्जीत होता. त्याचीं पत्रें बोधप्रद आहेत.

एवढें सर्व होण्यास अवधि लागला आणि दादा तर इंदुरावर चढाई करून निघाला. पण हाताखालचे त्याचे सर्व सरदार बेदील झाले. महादजीला चालून

* पे. द. २९. ५७, १७५, १७७. § मा. रो. १. १७५, १७६.

जाण्यास सांगितलें असतां तो बोलला, " मी जातीनें पेशव्यांची चाकरी पाहिजे ती करण्यास सिद्ध आहें, पण या कामास मी आपली फौज लावणार नाहीं. " गायकवाड व नागपुरकर भोसले उघडपणें अहल्याबाईस सामील झाले. बाईची तयारी व कडक भाषणें यांचा परिणाम सर्वांवर होऊन दादा अत्यंत खजील जाला. महिनाभर सर्वच घोळ माजून राहिला. लोक सर्व मौज आतुरतेनें पाहत होते. झकत माघार घेणें दादास भाग पडलें. त्यानें बाईस कळविलें, " आम्ही केवळ सांत्वनार्थ आपल्या भेटीस येतों. सरदारींत घालमेल करीत नाहीं. " यावर बाईनें कळविलें, " असें आहे तर फौज घेऊन येण्याचें प्रयोजन नाहीं. सडे यावें. " त्यावर दादानें खर्चास सात लाख रुपये व तोफा मागण्यासाठीं गोविंदराव गानू यास उज्जनीहून इंदुरास बाईकडे पाठविलें. मागाहून स्वतः इंदुरास गेले. संवत्सर प्रतिपदा ( ३० मार्च ) तेथें केली. श्रीमंतांनीं सांगितलें, " आज पाडवा आहे. लाख दोन लाखांचें कापड लोकांस द्यावयास पाहिजे. बाईनीं सांगितलें श्रीमंत वाड्यांत येतील ते समयीं काय अनुकूल पडेल तो पोषाख देऊं. त्याजवरून मग पांच तोफा मात्र घेतल्या. " बाईच्या बाणेदार स्वभावाचें वर्णन आढळतें तें असें. " बाई सुभेदाराची सून होय. तुकोजीबावा तिचे हातचा बसविलेला. श्रीमंतांनीं हेलना करावी आणि बाई करून घेईल असें होणार नाहीं. श्रीमंतांच्या पुण्यप्रतापेंकरून यांनीं पहिलीं कामें केलीं. पुढेंही मरे तोंवर तीच धारणा आहे. दुसऱ्याचे ओंजळीनें पाणी पितील असें होणार नाहीं. "

श्रीमंतांनीं बाईची भेट सामोपचारें घेतली. तिनेंही त्यांचा सत्कार यथायोग्य केला. भोसले गायकवाड इत्यादि सरदारांनाही यथायोग्य गौरव करून तिनें निरोप दिला. या सरदारांनीं व मुख्यतः गायकवाडानें आपली आज्ञा न ऐकतां अहल्याबाईचा पुरस्कार केला याबद्दल दादास भारी चीड येऊन त्यानें लगेच गुजरातेंत जाऊन गायकवाडाचे महाल जप्त करण्याचा विचार चालविला, पण तीही गोष्ट सिद्धीस नेणें त्यास शक्य झालें नाहीं; आणि सर्व प्रकारें हताश व कर्जबाजारी होऊन तो पुतण्यावर सर्व राग काढण्याच्या तयारीनें नर्मदा उतरून परभारें आनंदवल्लीस गेला. *

या एकंदर प्रसंगाचा पत्रविस्तार अपरंपार असून तो लक्षपूर्वक अभ्यासला म्हणजे तत्कालीन परिस्थिति चांगली कळून येते. होळकर कैफियत, खरे यांचे

* रा. खं० १०, १२, १३ व १४ या पुस्तकांचे तपशील.

लेख, राजवाड्यांच्या खंडांतले रायरीकरांचे कागद आणि अलीकडील पेशवे दप्तरांतील वाङ्मय इत्यादींचा त्रोटक अल्पांश वर निर्दिष्ट केला आहे. या प्रसंगाची चर्चा अनेक विद्वानांनीं व नाटककार वगैरे साहित्यिकांनीं केलेली अभ्यसनीय आहे. वि. ज्ञा. वि. च्या मे स. १९०७ च्या अंकांत कै. पारसनीस यांनीं तिच्या एकंदर चरित्राची चर्चा केलेली मार्मिक आहे. मुकुंदराव बर्वे यांनीं बाईचें चरित्र इंग्रजींत लिहिलेलें पाहावें. मल्हाररावाची बायको गौतमाबाई ता० २९ सेप्टेंबर स. १७६१ रोजीं सासष्ट वर्षांच्या वयांत वारली, ती बाई देखील दक्ष व कर्तृत्ववान असून तिचीच दीक्षा वीस पंचवीस वर्षें अहल्याबाईस मिळत गेली. क्वचित् गौतमाबाईचें नांव गोदूबाई असें आहे तें तिचें माहेरचें नांव असेल. §

**४. दसरा-दिवाळीचा वरकरणी समेट** — मानवी स्वभावाच्या छटांनीं भविष्यकाल कसा बदलत जातो, तें आगाऊ अचूक मनुष्यास समजत नसल्यामुळें त्यास अंधारांतूनच चाचपडत जावें लागतें. शेवटचा सोक्षमोक्ष संग्रामानेंच घडून येतो, हें ठरलेलें असलें तरी शहाणे लोक असा युद्धसंग्राम टाळण्याचे शिकस्तीचे प्रयत्न करीत असतात, हें चित्र आज विसाव्या शतकांतही आपण भूतलावर पाहात आहों. स. १७६७ त गोहदवर अपयश घेऊन आणि अहिल्याबाईपुढें निर्माल्य बनून ज्येष्ठांत दादासाहेबांची स्वारी परभारें आनंदवल्लीस दाखल झाली. पण अनुभवानें येणारा योग्य मार्ग त्यानें स्वीकारला नाहीं. त्याचा निःसीम अहंकार त्यास स्वस्थ बसूं देईना. आपल्या अपयशाचें व मानहानीचें कारण हा पुतण्या होय हेंच त्याच्या मनानें घेतलें. " चिरंजीवांनीं पागा फौज न पाठविली त्यानें मनसबा कांहीं न होतां सिबंदी अंगावर पडली. पुढें होणें ईश्वराधीन आहे", अशी भाषा तो बोलूं लागला. × पण या पोकळ वल्गना ऐकून घेण्याइतकी पेशव्याची भावना आतां मृदु राहिली नव्हती. चहूंकडे त्याची छाप चांगली बसल्यामुळें आत्मविश्वासावर प्रकरण कायमचें धसास लावावें असाच नेट त्यानें धरला. दादाच्या पराक्रमाचा भ्रम पूर्वी गाजत होता, तो परभारें ओसरला. आपल्या निभावणीचे अनेक कार्यकर्ते पेशव्यानें निर्माण केले, त्यांजपुढें दादाचे आत्मीय टिकाव धरण्यास असमर्थ झाले. आनंदवल्लीस

---

§ पे. द. १९ चे कागद व २९. १७६–१८६; भाऊसा० बखर पृ० ७८–७९.

× पे. द. २९. १८४.

येतांच दादानें राज्याच्या वांटणीचें त्वष्ट म्हणजे टुमणें पुनः पेशव्याकडे चालू केलें; आणि फौज जमवीत तो बाहेर पडला. उघड आव्हानच त्यानें पेशव्यास दिलें. पण पेशव्याला असलें घातुक कौटुंबिक युद्ध मनापासून नको होतें. चुलत्यास समक्ष भेटून निकाल लावण्याची शिकस्त त्यानें केली. अशी भेट सुद्धां अशक्य झाली. कारण भेटींत दग्याचा संभव उभयपक्षीं निर्माण झाला. पण तटस्थ मनोवृत्ति धारण करणारीं सन्मान्य माणसेंही कांहीं थोडीं नव्हतीं. सखारामबापू, गोविंद शिवराम, नाना फडणीस, हरिपंत फडके अशा अनेकांनीं समेटाची पराकाष्ठा केली, त्याचप्रमाणें युद्धप्रसंगासाठीं निरनिराळे किल्ले कबजांत घेण्याची त्वरा चालली. माधवरावानें सखारामबापूस आग्रह केला कीं तुम्ही दादांस भेटून कायमचा समेट ठरवा. * सखारामबापूनें हें काम स्वीकारलें नाहीं. त्याला वाटलें दोघेही यजमान आपणांस सारखे, त्यांच्या कलहांत पडून कोणा तरी एकास दुखवावें लागणार. ही त्याची वृत्ति माधवरावास पटेना. त्यानें सखारामबापूचा कारभार काढून तो भार मोरोबा दादास दिला, आणि गोविंद शिवरामास तडजोडीसाठीं चुलत्याकडे पाठविलें. शिवाय गोपाळराव पटवर्धनामार्फत युद्धाचीही तयारी तितक्याच जोरानें चालविली.

हा प्रकार पाहून लोक भयभीत झाले. नारोशंकर लिहितो, " श्रीमंतांजवळ शागीर्दींचें राज्य. त्यांजकडून दोन चार बोलावणीं आलीं. इकडे रावसाहेबांकडूनही बोलावणें आलें. दादांनीं कागदांचा सर लावला आहे कीं, किल्ले माफ केले, आणीक जागिरी देईन, तुम्ही कोणाकडे न जाणें, ऐसेंही करतां गेलतां तर सर्वस्व फस्त करून तुमचें वाईट करीन. बोलण्यांत शाश्वति नाहीं. मनांत दगाबाजी, यामुळें रावसाहेबांचे पायांशीं एकनिष्ठपणें चालावयाचा मानस असे." यावरून सरदारांची मनःस्थिति कळून येते. सखूबाई सिंदे हिला महादजी विरुद्ध दादानें उठविलें. § स. १७६७ ता० १० ऑगस्टचें वर्तमान, " दादासाहेब नाशकाहून साताऱ्यास जाणार. प्रतिनिधीचीं वस्त्रें घेणार म्हणून यांची त्यांची कटकट होईलसें दिसतें. साताऱ्यावर गाडदी व शिष्य गेले. नगरासही जाणार." दादाच्या या हालचाली ऐकून त्यास स्वतः भेटण्याच्या इराद्यानें पेशवा ता० २६ ऑगस्टला पुण्यांतून बाहेर पडला. मोठी फौज मागें ठेवून दादास धास्ती वाटू

---

* पे. द. १९·२९, ३१, ४३, ५५; पे. द. २९·१९०, २१३, २१४.

§ पे. द. २९·६८.

नये म्हणून आपण थोड्या लोकांनिशीं पुढें गेला. सखारामबापूस मध्यस्थीस पाठवून उभयतांनीं समक्ष भेटावें असा बेत ठरविला. सेप्टेंबरांत पेशवा राहुरीस पोंचला, तेथें गोविंद शिवराम व चिंतो विठ्ठल दादांकडून येऊन भेटले. * त्यांजकडून रागरंग काढून कटोऱ्यानजीक भेटीचा विचार पेशव्यानें ठरविला. तरी भेटीची भानगड व मागण्या यांचा कैक दिवस मेळ बसेना. सर्वांनीं पुण्यास जावें असेही बेत चालले. असें होतां होतां पेशवा इकडून व दादा नाशकाकडून असे पुढें येऊन ता० १३ सेप्टेंबरास गंगातीरीं नांदूर येथें उभयतांच्या भेटी जाल्या. चार दिवस दोघे ससज्ज एकत्र होते. "बोलतांना जावसालाचे पेंच वाढले. रायांचें मानस दादांस घेऊन पुण्यास जावें, हें त्यांचे चित्तास नये. सांप्रत रावसाहेबांची इभ्रत भारी आहे. किल्ले नगर, आशेर, दौलताबाद, सातारा, त्रिंबक असे पांच दादासाहेबांनीं मागितले त्यांवरून मेळ बसेना. ही भानगड आटपल्यावर पुण्यास जातील. बारीक मोठें पुष्कळ आहे. निखालसपणें लिहितां येत नाहीं." अखेरीस वाटाघाटी करीत उभयतां नांदुराहून आनंदवल्लीस गेले. तेथें मुक्काम २२ सेप्टेंबरपासून २५ ऑक्टोबरपर्यंत होऊन दसरा समारंभ साजरा झाला. वाटाघाटी व बोलणीं सारखीं चालू होतीं. पेशवा जिवाच्या भीतीनें मोठी सावधगिरी ठेवून वागला. +

मात्र माधवरावाचा रोख यावेळीं अत्यंत करडा, कायमचा सोक्षमोक्ष करून घ्यावा असा होता. त्यानें चुलत्यास दरडावून विचारलें, "तुमच्या मनांत दौलतीचा कारभार करणें असेल तर आम्हीं सांगूं तसें वागलें पाहिजे. नाहीं तर पांच लक्षांची जागीर लावून देतों ती घेऊन स्वस्थ बसा. दुसरे ढंग आम्ही चालूं देणार नाहीं. लोकांच्या नादीं लागून राज्याची वांटणी मागतां, बखेडे करतां, सरदारांच्या घालमेली करतां हे प्रकार इतःपर आम्ही चालूं देणार नाहीं. बोला कोणतें पत्करितां तें." वडीलपणाचा आदर व भीडभाड बाजूस ठेवून पुतण्यानें जेव्हां असा खडखडित प्रश्न विचारला, तेव्हां दादानें पूर्ण ओळखलें कीं हा रंग आतां निराळा आहे. यास्तव मिळेल तितकें पदरांत पाडून घ्यावें असा डाव तो खेळूं लागला. त्यावरून पेशव्यानेंही पहिली निष्ठुरता सोडून सढळपणें चुलत्याच्या मागण्या मान्य केल्या. दसऱ्याच्या मुहूर्तावर समेट सिद्धीस गेला. पे. द. १९·६२ व ७४ येथें हे करार दाखल आहेत. "दोघांची गांठ

* रा. खं. १०·३९–४१. + पे. द. १९·५५ – ६० ; पु. द. ३·१३१ ; सातारा २·३१५.

पडली म्हणजे दादासाहेबांची चित्तशुद्धि असते. गांठ सुटल्यावर मग वडिलांची बुद्धि ठिकाणावर राहत नाहीं. मध्यस्थांहीं उभयतांस निक्षून सर्व कारभाऱ्यांसह जागत बसोन निश्चय केला जे कलह करूं नये. बहुत करून प्रथम भेटीपासूनच रावसाहेबीं स्वतः एकांतीं बोलणें केलें. उपरांत मध्यस्थ आले. बीत बसावयास फार मेहनत लागली. ठराव व मुद्दे अगणित झाले." ‡

तात्पर्यार्थानें बोलणें तर दादाला पड घेणें भाग पडलें. "तुम्ही पेशवे तुमच्या कारभारांत पडण्याचें आम्हांस प्रयोजन नाहीं. आम्हांस स्वारीसंबंधीं कर्ज पंचवीस लाख झालें आहे, तें तुम्ही वारा म्हणजे आम्ही स्नानसंध्या करून स्वस्थ बसूं." कर्जाची व दादाच्या अवास्तव खर्चाची ही जबाबदारी भारी होती, पण निकाल पडण्यासाठीं पेशव्यानें तीही पत्करिली; आणि दिपवाळी-पर्यंत सावकारांची फेड करतों असा करार केला. मुख्य प्रश्न शिवनेर, नगर, सातारा व अशीरगड या चार महत्त्वाच्या किल्ल्यांसंबंधीं होता. हे किल्ले दादाच्या कबजांत होते ते पेशव्याने खालीं करून मागितले. हे किल्ले निजामास पाहिजे असल्यामुळें ते त्यास देऊन त्याची मदत मिळविण्याची सवड दादास राहूं नये यास्तव ते किल्ले पेशव्यास आपल्या कबजांत ठेवणें अपरिहार्य होतें. नाहीं होय करतां करतां त्यांच्या सोडचिठ्या दादानें लिहून दिल्या. सातारा किल्ल्यावर छत्रपति असल्यामुळें त्याजकडून पेशवाईचीं वस्त्रें मिळविण्याची सवलत दादास होती, ती आतां बंद झाली. "ते स्वस्थ घरीं बसले. दहा लक्षांची जागीर नेमून दिली. आनंदवल्लीस राहून स्नानसंध्या करावी. कारभार सर्व सोडला. किल्ले कबजांत होते ते सोडून दिले. कर्ज रावसाहेबांनीं वारलें. त्यांनींच दरोबस्त कारभार घेतला, तो लबाडीचा नाहीं. एकवचनी प्रमाण. दादांनीं जें मागितलें तें तें द्यावें. मात्र मर्जी बहुत नाजूक. दादासाहेब केवळ सांब. दसऱ्यासाठीं पुण्याहून सणगें आणून एकमेकांस पोषाख दिले. उभयतां श्रीमंत सीमोल्लंघनास गंगापार गेले. श्री० रावसाहेब फौजेसहवर्तमान दादासाहेबांचे दर्शनास आले. त्यांचें कर्ज तेहतीस लक्ष फेडून खर्चाचे बेगमीस जागीर देऊन वडिलांची मर्यादा बहुतच राखिली. उभयतां पितापुत्र (!) आनंदवल्लीस राहिले. तेथें दिवाळी करून पेशवे पुण्यास गेले" *

‡ ऐ. प. १०९; पे. द. ३९·९१, ९२; पे. द. १९·५२–९८ चे सर्व कागद या विषयाचे.

* पे. द. १९. ६९, ७०; पे. द. ३९. ९३.

तुकोजी होळकर हिंदुस्थानांतून आले त्यांची व उभय श्रीमंतांची भेट जाली. सिंद्यांचे कारभाराचीही घडामोड झाली. पेशवे पुण्यास गेल्यावर महादजी सिंद्यांनीं त्यांची भेट घेतली. नारोशंकराचा हस्तक अच्युतराव गणेश यास दादानें सिंद्याचा कारभारी नेमला होता, त्याचें व सिंद्याचें पटलें नाहीं. तोही समागमें पुण्यांस आला. पेशव्यानें तुकोजी होळकर व गंगाधर तात्या चंद्रचूड यांस पुण्यास आणून त्यांच्या विचारानें महादजीचा बंदोबस्त त्याचे मर्जीमाफक करून दिला.

दुर्दैव मराठी राज्याचें कीं समस्त महारथी भरीस घालून जुळविलेला वरील समेट पाळण्याची सुबुद्धि दादास जाली नाहीं. त्याच्या चंचल वृत्तीला स्थैर्य असें कधीं नव्हतें. सातारा हवालीं करण्यास दादानें दिरंग लावला तेणेंकरून पेशवा संतापूनच आनंदवल्ली सोडून गंगापुरास मातुश्रीकडे गेला. तेव्हां दादानें नाइलाजास्तव सातारा हवालीं करून पेशव्याचा राग शमविला. पेशव्यानें नगराला नारोबाबाजी, शिवनेरला उधो वीरेश्वर, सातारा येथें बाबूराव कृष्ण आपटे, सोलापुरास गोविंद शिवराम, असे आपल्या भरंवशाचे इसम नेमिले. सखारामबापूस जवळ ठेविलें. तथापि हा सर्व खटाटोप फुकट जाऊन पुनः लगेच प्रकरण मूळ पदावर आलें आणि माधवरावानें योजलेलीं राज्याचीं कामें लांबणीवर पडून बिघडलीं. ऑक्टोबरअखेर पेशवा पुण्यास येतो तों इंग्रजांचे वकील हैदरअलीविरुद्ध साह्य मागण्याकरितां पुण्यास आले, त्यांची हकीकत दुसरीकडे दिली आहे ती संदर्भासाठीं लक्षांत आणावी. इंग्रजांना अडविणारे यावेळीं मराठे तेवढे उरले असून पेशव्याचें वाढत चाललेलें सामर्थ्य इंग्रजांना दुःसह होत होतें. चुलतेपुतण्यांचा कलह विकोपास केव्हां जातो आणि दादा-सारखा राजकारणी मोहरा आपल्या हातीं कसा येतो याची त्यांस उत्कंठा लागली होती. इकडे माधवरावानें आपणांस निर्माल्यवत् बनविलें याची दादाला खंति वाटून लगेच त्यानें आपले पूर्वींचे चाळे सुरू केले. हैदरअली, निजाम, जानोजी भोसले, दमाजी गायकवाड इत्यादींकडे संधानें चालविलीं. हें लक्षांत घेऊनच मुंबईकरांनीं मॉस्टिनच्या वकिलातींत ब्रोम नांवाचा दुसरा एक स्वतंत्र इसम नजराणे देऊन मुद्दाम दादांचे भेटीस पाठविला. यावेळीं दादाचें कर्ज वारण्याची मोठी फिकीर पेशव्यास लागली असून कर्ज फिटल्याशिवाय त्यास दुसरा कोणताही उद्योग हातीं घेतां येईना, आणि कर्ज फिटलें नाहीं या सबबीवर

दादाचे चाळे वाढत चालले. दादाची अस्वस्थता ऐकून ब्रोम लगेच ता. १९ डिसेंबरास त्रिंबक येथें त्याचे भेटीस गेला. दादानें त्याची भेट घेऊन कळविलें, "आमचे मनांत पुतण्याबद्दल भारी त्वेष उत्पन्न झाला आहे. सालमजकुरीं त्याजवर चालून जाण्यास आतां अवधि नाहीं. पण पावसाळा संपतांच आम्ही त्याजवर चढाई करणार, त्यासाठीं आपण तोफा, दारूगोळा व फौज अशी मदत आम्हांस केली पाहिजे." त्यावर वकिलानें विचारलें, "नुसता खर्च घेऊन मदत पाठविणें आम्हांस शक्य होणार नाहीं, कांहीं विशेष फायदे आम्हांस मिळतील तर आपल्या विनंतीचा विचार होईल."

दादा – कशा प्रकारचे फायदे आपण मागतां ?

ब्रोम – वरिष्ठांस विचारल्याशिवाय मी यासंबंधांत कांहींच सांगूं शकत नाहीं. तुम्हीच कांहीं सूचना कळवाल तर मी त्या पुढें पाठवीन."

या उत्तरानें दादाची तारांबळ उडाली. त्याला निश्चित असें कांहींच सांगतां येईना. वसई, साष्टी वगैरे जागा इंग्रजांस हव्या होत्या, पण त्यांचा उच्चारही तोंडावाटे काढणें या वेळीं दादास शक्य नव्हतें. राज्याची मालकी माधवरावाकडे होती. पुढें नारायणरावाच्या वधानंतर दादाचा मार्ग मोकळा झाला. ब्रोमनें परत येऊन आपल्या या भेटीचा वृत्तान्त २५ जानेवारीस मुंबईस पाठविला. इकडे याच वेळीं दादाचा वकील गोपाळ चक्रधर पुण्यास होता त्यानें मॉस्टिनची भेट घेऊन कळविलें, "आमचे यजमान व पेशवा यांचें वितुष्ट अपरिमित वाढलें असून, युद्धप्रसंग उद्भवल्यास आपल्या स्नेहाची व मदतीची ते भारी आशा बाळगून आहेत. पुतण्याचा पाडाव केल्याशिवाय ते स्वस्थ बसणार नाहींत. माधवरावाकडून करार पुरे होतात कीं नाहींत एवढीच वाट ते पाहात आहेत. करारांत जरा न्यून पडलें कीं ते त्यास हाणणार. कसें आकाश पाताळ ते एक करून सोडतील तें सहा महिन्यांचे आंत तुम्हांस दिसेल. यासाठीं त्यांस इंग्रजांशीं कायम दोस्तीचा तह करण्याची इच्छा आहे. मद्रासकरांकडेही ते आपला वकील पाठविणार आहेत. ब्रोमसाहेब परत येण्याची तूर्त ते वाट पाहातात." इंग्रजांचे आधारावर दादाचें मन बदललें.

**५. धोडपेची झोडप** – इंग्रज वकिलांच्या या कारवाया पुणें-नासिकसारख्या मुख्य नगरांत अगदीं गुप्त म्हणून चाललेल्या जर माधवरावास कळल्या नसत्या

तरच आश्चर्य. इंग्रजांस वैषम्य वाटलें कीं आपले गुप्त बेत फार फुटले. वसई, साष्टी सहजासहजीं इंग्रजांचे पदरांत टाकणारा माधवराव नव्हता. या वकिलातीनें त्याचे डोळ्यांत चांगलें अंजन घातलें. गेल्या वर्षींच समेटाचे नादास लागून आपण या प्रकरणाचा सोक्षमोक्ष केला नाहीं, याजबद्दल त्याला वाईटही वाटलें. दादानें खुळेपणानें बाजतबरसाद पुतण्यावर चढाई करण्याची घोषणा केली, ती पेशव्याचे पथ्यावर पडली आणि बरसातीपूर्वींच त्यास गांठण्याचा निश्चय ठरविला. पण दादाची तयारी नसल्यामुळें त्याची तारांबळ उडाली. घटकेंत वऱ्हाडांत भोसल्याचे आश्रयास जावें, घटकेंत पुतण्याकडे बोलणें करण्यासाठीं माणसें पाठवावीं, अशा नेहमींच्या पळवाटा त्यानें चालविल्या. चिंतो विठ्ठल व गंगोबा तात्या मात्र त्याची साथ सर्वोपरी करूं लागले. दमाजी गायकवाडानें आपला पुत्र गोविंदराव याजबरोबर फौज देऊन दादाचे साह्यास पाठविलें. पण दादाचा मुख्य आधार गंगोबा असून तो अनुभवी योद्धा दादास मिळाल्यामुळें पेशव्यास पुढील संग्राम जास्त अवघड गेला. गंगोबावर पेशव्यानें पुढें एवढा कोप कां केला त्याचें हें बीज आहे.

पेशव्यानें लगेच संग्रामाची सिद्धता केली. महादजीस बोलावणें जातांच तो केदारजीसह स. १७६८ च्या मे महिन्यांत राहुरी येथें पेशव्यास सामील झाला. वीस हजारांवर फौज जमली. दादाचाही जमाव पुणतांब्यानजीक दहा हजार पावेतों झाला. तुकोजी होळकर अंग चुकवून स्वतः अलग राहिला. तो म्हणाला, " मी बेइमान व्हावयास कोणाकडेच जात नाहीं. तात्या जाणा, तुम्ही जाणा. " पेशव्यानें गंगोबाकडे माणसें पाठविलीं, त्यानें कळविलें, " मीं काय करावें ! माझें लक्ष स्वामींकडेच आहे. दादासा० जवळ आले म्हणून उगाच त्यांजसारख्या गोष्टी बोलाव्या लागतात. " पेशव्याची तयारी कडेकोट झाली. साताऱ्यास त्यानें छत्रपतीचा बंदोबस्त विशेष कडक ठेविला. अशा स्थितींत दादानें आगींत तेल ओतण्यासारखें कृत्य केलें. त्यास मुलगा नव्हता. बोलतांना मीच तुमचा मुलगा असें माधवराव वारंवार त्यास बोलून दाखवी, त्यामुळें दौलतीच्या वांटणीचा प्रश्न उद्भवत नसे. सबब वांटणीला जोर यावा म्हणून दादानें गोविंदपंत भुसकुटे याचा साडेतीन वर्षांचा पुत्र नासिक येथें वैशाख शु० ३ ( १९ एप्रिल, १७६८ ) या दिवशीं दत्तक घेऊन नांव अमृतराव ठेविलें.* व्रतबंध व विवाह

* पे. द. १९. ७५ – ८२ ; साता० २. ३१६ – ३१९.

लगेच करावयाचा विचार होता, परंतु माधवराव फौजेसह चालून आल्यामुळें ते संस्कार राहिले. दत्तक घेतल्याची साखर व वस्त्रें दादानें पेशव्यास पाठविलीं तीं त्यानें स्वीकारलीं नाहींत, परत केलीं. या दत्तविधानानें उभयतांच्या वैराचें पात्र कांठोकाठ भरलें म्हणून क्षणाची उपेक्षा पेशव्यानें केली नाहीं. उभयतांनीं सामन्याची सिद्धता करून चालून घेतलें. ता. १० जूनचें पत्र "पेशव्याचा मुक्काम गंगातीरीं झाला. दादा चांदवडापासून सहा कोसांवर होते. गोपाळराव चालून आले म्हणोन आवई लष्करांत पडली. पर्जन्यानें पेशव्याचे लष्करावर अतिवृष्टि केली. पूर येऊन घोडीं, पालख्या वाहून गेल्या. दादासाहेब माघारे फिरून घोडपेखालीं आले. बरोबर फौज पांचसहा हजार, तोफा वीस, सदाशिव रामचंद्र वगैरे आहेत. तुकोजी होळकर एक दिवस येऊन भेटून गेले. त्यांनीं सांगितलें आपण कोणाशींच झुंजत नाहीं. उठोन चांदवडास गेले. दादांनीं गंगोबा तात्यास सांगितलें जे तुम्ही झुंजा, आपण झुंजत नाहीं. झुंजलों तर माझी त्याला पितृहत्या घडेल त्याची मला घडेल. असें सांगितल्यावर साराच मनसबा राहिला. पेशव्याची फौज पंचवीस हजार जमा झाली. रोज येतच आहेत. काल दादासाहेबांचें पत्र गोपाळराव पटवर्धनास आलें कीं चिरंजीवांनीं निकर्षच आरंभिला आहे, त्यास त्याजकडून अन्याय जाले. तुम्ही मध्यस्थ आहां. आणशपथ केली त्याचें स्मरण धरणें. तुमचें चिरंजीव न ऐकत तर तुम्ही इकडे यावें असा करार आहे." *

"दादासाहेबांची फौज घोडपेचे पायथ्याशीं राहिली होती. तिजवर भृगुवार १० जून रोजीं पेशव्याच्या सड्या फौजेनें चाल केली. त्याबरोबर दादासाहेब निघून किल्ल्यावर गेले. खालीं फौजेंत चिंतो विठ्ठल व मोरो विठ्ठल रायरीकर, गणेश विठ्ठल वाघमारे, केदारजी सिंदे, सदाशिव रामचंद्र, हरि भिडे होते ते चालून आले. लगेच त्यांस पेशव्याचे फौजेनें गांठलें. क्षणमात्र लढाई जाहली. मोरो विठ्ठल जखमी होऊन घोड्यावरून पडून मेले. चिंतो विठ्ठल त्यांस काढावयास गेले त्यांत दाटी होऊन पाडाव गेले. उजवे हातास जखम लागली. इतर आले त्यांचा मोड जाहला. सदाशिव रामचंद्र पळून गेले. राहिली फौज तमाम लुटली गेली. दहाबारा हजार खजिना, दोनचारशें उंट घोडे, दहापंधरा हत्ती पाडाव आले. पेशव्यानें दादासाहेबांकडे बाळाजी कृष्ण ठोसर यास पाठविलें

* पे. द. २९. ८३.

कीं तुमचे मुद्दे काय ते सांगावे. भाषण केलें, आम्हांकडे बोलावयाचें कांहीं राहिलें नाहीं. पेशव्यानें लगेच दादाचा मुलूख जत करायचा हुकूम सोडला."

ता० ११ रोजीं किल्ल्यावरून दादासाहेबांनीं आबाजी महादेव व हरि भिडे यांस पेशव्याकडे बोलण्यासाठीं पाठविलें. पेशव्यानें सांगोन पाठविलें, "आपण वडील, पुण्यास यावें, एके जागां राहावें. वरकड विचार कशास पाहिजे!" त्यावर दादांचें उत्तर आलें, "आपण महायात्रेस जाऊं, बेगमी करून द्या." पेशव्यांचें निदान सांगणें एकच कीं स्वामींनीं निराळें राहूं नये. ता० १२ रोजीं दादांनीं सांगोन पाठविलें, "आम्ही दोन प्रहरां भेटीस व भोजनास येतों. स्वयंपाक करावा. मर्जीस येईल तसें आमचें चालवावें." दोन प्रहरांखालीं उतरून उभयतां एक हत्तीवर बसोन डेऱ्यास आले. बोलणीं झालीं. पेशव्याचें उत्तर ठासून जाहलें, कीं "आम्हांस फौज ठेवून यावें लागलें, मसलत पडली. म्हणून कर्जाचा ऐवज तुम्हांस पावणार नाहीं. कराराप्रमाणें निभावणी झाली असती तर ऐवज पावता." शेवटीं जाबसाल जाहला, निदान ठेवाल तसे राहूं. बंदवानाचे मूल जाहलोंच आहों." अशीं भाषणें चाललीं.

ता० १५ रोजीं सर्व हकीकत माधवरावानें रामशास्त्री यास लिहून कळविली कीं "दादासाहेबांनीं वडीलपणें खावंदपणें असावें, आमचें म्हटलें सर्व ऐकावें, याप्रमाणें करारांत आलें आहे. सारांश तीर्थरूप शाबूद भेटले. ज्यांनीं लबाड्या केल्या ते फजित पावले." अशा प्रकारें हरएक बाबतीचा पाढा पेशव्यानें न्यायासनासमोर स्पष्टपणें वाचून दाखविला. †

किल्ल्याच्या खालचें गांव रानवट येथें लढाई झाली, तिला नांव मात्र धोडप असेंच पडलें आहे. लढाई सुरू होण्यापूर्वींच दादा घाबरून किल्ल्याच्या आश्रयास गेला. राघो भरारी या शब्दांनीं जो त्याचा गौरव प्रसृत झाला आहे, तो पलायन क्रियेंतच आढळतो, ठासून लढण्यांत कधींच प्रगट झालेला नाहीं. चिंतो विठ्ठलचें कुटुंब व चंद्रचूड यांनींच लढाईंत पराकाष्ठा केली, तिचें प्रायश्चित्त त्यांस व सदाशिव रामचंद्र, पुरुषोत्तम महादेव हिंगणे, आबाजी महादेव वगैरे साथीदारांस भरपूर मिळालें. हाताखालच्यांस बळी देऊन प्रमुखानें आपला जीव बचावणें हा प्रकार युद्धनीतींत सर्वत्र निंद्य मानलेला आहे. पेशव्याच्या फौजेला लूट माफ केली होती म्हणून तिचे सर्व लोक आस्थेनें

† पे. द. १९. ८४–८९.

लढले. दादांनीं आपली सर्व दौलत, किल्लेकोट मुलूख, पैका सुतळीचा तोडासुद्धां हवालीं केला. सखारामबापू दादाचा पक्षपाती म्हणून त्यास पेशव्यानें घरीं बसविलें. "बोलावलें तर जातात. रावसाहेबांचें पुण्य समर्थ आहे." गंगाधर तात्यास पकडून नगरचे किल्ल्यावर ठेविलें. सुटकेकरितां तीस लक्ष दंड मागतात." तो न दिल्यामुळें पेशव्यानें त्यास भर दरबारांत छड्यांनीं फोडून काढिलें तो प्रकार रोमांचकारी वाटतो. मात्र दादांच्या सर्व साथीदारांस जबरदस्त शिक्षा केल्यामुळें पेशव्याची जरब सर्वत्र बसून त्याचा कारभार सुरळीत झाला यांत संशय नाहीं. $

गंगोबाचा वडील पुत्र यशवंत गंगाधर ऊर्फ दादाजी हा विद्वान व व्यवहारचतुर होता. घोडपच्या प्रसंगापूर्वी त्यानें बापास परोपरी समजून सांगितलें कीं माधवरावाचा सत्पक्ष आहे, तुम्ही दादास सामील होऊं नये. पुत्राची ही सल्ला बापानें ऐकिली नाहीं. सखारामबापूच्या सांगणीनें त्यानें रघुनाथरावाचें साह्य केलें, त्याचें प्रायश्चित्त त्यास मिळालें. सुमारें तीन वर्षें कैदेंत कुचंबल्यावर गंगाधर तात्यानें तीस लाख रुपये दंड भरला तेव्हां स. १७७२ च्या फेब्रुवारींत पेशव्यानें त्याची सुटला केली.

**६. पुण्यांतील बंदीवास**—पेशव्यानें चुलत्याची अमर्यादा यत्किंचित् न करतां त्यास पुण्यास आणिलें. ता० २२ जून रोजीं ते शहरांत दाखल झाले. "घटका रात्रीस पर्वतीहून आपण उजवे बाजूस व दादास डावे बाजूस एका अंबारींत बसून अवघ्या मुत्सद्यांसह सहावे घटकेस आनंदमय घरास पोंचले. नळेचंद्रज्योती गणतीआगळ्या झाल्या." यासंबंधानें राजवाडे म्हणतात "दादानें संस्थानद्रोह केला, त्याबद्दल यास करावें तसें शासन न करितां, कीड तशीच राहूं दिली. या किडीच्या आश्रयानें सरदारांना राज्याचे विरुद्ध वागण्यास अवसर मिळाला." सात वर्षांच्या परिश्रमांत प्रकृतीवर जो ताण बसला तेणेंकरून पेशव्याचें आयुष्यही घटलें.

ठाणीं व जागा हातीं येईपर्यंत पेशव्यानें रामचंद्र गणेश व बिनीवाले यांस नासिकच्या बाजूस ठेविलें, आणि त्यांजकडून दादांच्या कबजांतील सर्व स्थळें घेतलीं. खुद्द दादास शनिवारवाड्यांत पक्क्या बंदोबस्तांत ठेविलें, मात्र हाल कोणतेही होऊं दिले नाहींत. दादावर मुख्य देखरेख नाना फडणिसाची ठेविली.

---

$ इ. सं. पे. द. पृ. १०८ ; पे. द. १९. ९०–९२, १०६–११६.

बाहेर फितूर करण्याची त्याची जन्माची खोड कैदेंतही थोडीबहुत चालू राहिली. "फाल्गुन व० ११ ता. २ एप्रिल स. १७६९ रोजीं वाड्यांत फितूर झाला. देवडीचे लोक त्यांस फितले. बाहेर निघून जाणार तों बातमी नानास कळली. साठ असामी चतुर्भुज केले. दादा उपोषणें करतात. नानांनीं भोजनाचा आग्रह करितां शिवीगाळ केली." नानानें हें वर्तमान हरिपंतामार्फत पेशव्यास स्वारींत कळविलें. ‡ गोपिकाबाईस बातमी कळल्यावर तिनें नानास पत्र लिहून दादांची प्रकृतीची खबर विचारली. नानानें कळविलें, "दादांनीं मौन कांहीं धरलें नाहीं. फार करून स्नानसंध्याच करीत असतात. शरिरास उपद्रव झाल्यामुळें रक्त काढविलें होतें. प्रकृति बरी आहे." ता० ४ ऑगस्ट स. १७६९ चें वर्तमान. "दादा उपास करितात. आज दहा दिवस झाले. परवां जीव घाबरा झाला होता. तोंड निघत नाहीं. एखादे दिवशीं साखर पाणी व एखादे दिवशीं खारीक घेतात. आज दोन दिवस फारच घोळ पडला आहे. दत्तक मुलास पुण्यास आणवावें, दोन लक्षांची जागीर व एक किल्ला द्यावा, आम्हांस पांच लक्ष द्यावे अशी मागणी केली. रावसाहेबांनीं उत्तर केलें, दाखल्याप्रमाणें दानधर्मास ऐवज देऊं. आम्हीच कर्जदार जास्त कोठून द्यावें!" त्यावर दादा म्हणतात, "आतां आम्ही कैदेंत आहों, तुमच्या ओढीतेढीशीं आम्हांस गरज काय? नाहीं तर आम्ही उपवास करून मरूं." श्रीमंतांनीं साफ उत्तर केलें, "मुलास आणावयास किंवा जागीर द्यावयास अनुकूल नाहीं. दुसऱ्या गोत्राचा मूल, त्याचें बोलूं नये." पुढें मुलास आणून वडगावांस ठेवावें असें ठरलें. ता० ७ सेप्टेंबर स. १७६९ रोजीं माधवराव पर्वतीहून परत येत असतां त्याजवर गार्द्यानें वार केला, * तो पेशव्यानें सावधपणें चुकविला. ही शिकवण दादाचीच असली पाहिजे. मिळून हे परकीय गार्दी पेशव्यांनीं जवळ आणले तेंच घातक झाले. भाऊसाहेब, माधवराव यांस तर गार्द्यांनीं दगा केलाच, पण पुढें नारायणरावाची वाट लावली.

राक्षसभुवनानंतर नाशकास राहण्याचें दादानें ठरविलें तेव्हां खर्चास पांच लाख रुपये सालाचे द्यावे अशी व्यवस्था होती ती आतां पेशव्यानें पुण्यासही चालू ठेविली. दादास प्रतिबंधांत ठेवण्यांतच राज्याचें कल्याण आहे अशी सर्वत्र लोकांची खात्री झाली. अनुष्ठान करूं नये, कोणाशीं पत्रव्यवहार करूं नये,

---

‡ पे. द. १९·९८. * ख. ले. ८११.

कारभारी, शागीर्द, भट, नोकर माधवराव नेमून देतील तेच त्यांनीं ठेवावे, वर्षांतून एकदां कृष्णास्नानास जावें, असा बंदोबस्त झाला. सखारामबापूस आतां बाह्यतः करून कामांत घेतलें. पुढें पेशवा आसन्न स्थितीस पोंचला तेव्हां दादाला सर्वांच्या आग्रहावरून स. १७७२ च्या मार्चांत बंदींतून मुक्त केलें. परंतु पुढें ६ ऑक्टोबरास दादा पळून जात असतां पकडला गेला, तेव्हां फिरून कैदेंत घातलें. पश्चात् दीड महिन्यानें पेशवा मरण पावला.

स. १७६४ त दादाचे खर्चास पांच लक्ष त्रेसष्ट हजारांचे महाल तोडून दिलेले चालत होते, त्याचा कारभार चिंतो विठ्ठल करी. ही रक्कम खर्चास पुरत नाहीं अशी दादाची तक्रार सारखी चालू होती. उगाच पोकळ डौल वाढवून निरर्थक लवाजमा व आश्रित वर्ग बाळगून मोठेपणा मिरविण्यांत खर्च फार होई. शिवाय बेगुमानपणें पुतण्यास नडविण्यासाठीं मुद्दाम तो नाना ढंग करी. राज्याची पर्वा त्याचे मनास मुळींच वाटत नव्हती. त्याच्या आश्रितवर्गांत त्रिमंगलाचार्य, चतुर्भुज देव, खंडो दीक्षित, नरगुंदकर आपाशास्त्री, कुटुंबशास्त्री इत्यादि विद्वान पंडित, शिवाय हरिदास, गवई वगैरे पुष्कळ होते. नाटकशाळांचा तांडा तर अमर्याद होता. १ मैना, २ उमेदा, ३ यमुनी ( हेमंतीची आई ), ४ लाडू ( वसंतीची आई ), ५ केसरी ( चंदनीची आई ), ६ रत्ना ( रूपकुमरीची आई ), ७ स्वरूपा ( चंद्रसेनीची आई ), ८ श्यामा ( नैनेची आई ) अशीं नाटकशाळांचीं नांवें अढळतात. शिवाय रोजनिशींत हेमंत, वसंत, चपला, चंद्रसेना, अशीं आणखी नांवें दिसतात. या नाटकशाळांस चार, तीन, दोन रुपये दरमहा पगार म्हणजे हात खर्च बांधून दिलेला स. १७८० चा नमूद आहे. * वर मुलींचीं नांवें दिलेलीं आहेत त्या दादाच्याच असाव्या. या नांवांत मुलगे कां नाहीत हें गूढ वाटतें. दादाच्या पश्चात् या सर्व नाटकशाळांचा परामर्ष आनंदीबाईनें घेतला, हें तिला भूषणावह आहे. मथुरा नांवाची दादाची कनिष्ठ स्त्री होती ती देवी येऊन ता० ५ जून स. १७८० रोजीं वारली. सुरतेस असतां दादानें एका नागराची मुलगी पळविली, त्यावरून तिच्या आईबापांनीं जीव दिला, म्हणून इंग्रजांनीं त्यास वाड्याबाहेर जाण्याची बंदी केली. †

---

* स. मा. रो. ११. ५७ † इ० सं. पे. द. पृ० १०८, १३४, १३६; का. सं. प. या. ४९४ ; म. द. वा. १-८ ; ऐ. टि. १-८.

माधवराव तापट स्वभावाचा असला तरी विचारी व सहनशील होता, म्हणूनच त्यानें चुलत्याचे भलभलते छंद चालूं दिले, आणि अखेरपावेतों त्यास कोणत्याही प्रकारें कमी पडूं दिलें नाहीं. मोगल बादशाहींत दाराशुकोसारख्या अनेक शहाजाद्यांची वाट कशी लागली तें लक्षांत आणावें. मुसलमान राज्यकर्त्यांची गोष्ट बाजूला ठेवली तरी तुळाजी आंगऱ्याप्रमाणें दादासही एखाद्या दूरच्या किल्ल्यावर डांबून ठेवणें पेशव्यास शक्य होतें. स. १७७१ च्या वैशाखांत दादाला टोक्यास पाठवून तेथें पेशव्यानें अमृतरावाचें लग्न मोठ्या थाटांत करविलें. दादाला पेशवाईची हाव जबरदस्त होती, ती पुरी होईना म्हणून पुढें त्यानें पुतण्याचा वधही करविला. कपटविद्येंत तो निष्णात होता, त्या विद्येचा उपयोग त्यानें मराठी राज्याच्या हितासाठीं केला नाहीं याचा उद्वेग वाटतो तो काय सांगावा ! मराठशाहीच्या अवनतीचा इतिहास हे दादासाहेब व त्यांचे चिरंजीव रावबाजी यांनीं बनविलेला आहे. माधवरावाचीं पहिलीं सात वर्षे या चुलत्याच्या भानगडींत खर्च झालीं, म्हणून हैदर व इंग्रज यांना तो आळा घालूं शकला नाहीं.

दादाच्या वास्तव्यासाठीं आनंदवल्लीची स्थापना झाली. स. १७६४ च्या फाल्गुनांत दादा व गोपिकाबाई उभयतांनीं क्षेत्रवास पत्करून नाशकास प्रयाण केलें. तेथून पश्चिमेस तीन मैल चावडस म्हणून गांव होतें तेथें दादानें वास्तव्य केलें आणि आणखी पुढें तीन मैल गंगापूर येथें गोपिकाबाई राहूं लागली. ता० १५ ऑगस्ट १७६४ रोजीं चावडस येथें आनंदीबाईस पुत्र झाला, त्याचे स्मरणार्थ गांवाचें नांव आनंदवल्ली असें ठेविलें. घोडपेवर दादा हस्तगत झाल्यावर त्याची पूर्वीची जागीर परत घेऊन खर्चासाठीं रोख रकमा देण्यांत आल्या व कुटुंबास राहण्यास आनंदवल्लीचें बंदिस्त ठाणें त्याचे हवालीं करण्यांत आलें. परंतु पुढें दादाचें राहणें तेथें फारसें झालेंच नाहीं. कोपरगांव येथेंही त्याचे वाडे होते तेथेंच तो पुढें मृत्यु पावला. त्यानंतर कांहीं वर्षांनीं आनंदीबाई आनंदवल्लीस जाऊन राहिली तेथें ती मृत्यु पावली. परंतु दादांच्या अखेरीचा हा पुढचा भाग तूर्त येथेंच थांबविणें जरूर आहे. *



* संततीचा उल्लेख, बाळाजी विश्वनाथ, पृ० १५ वर पाहा.

## ५. नागपुरकर भोसल्यांना शिकवण – कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| स. १७६१–६३ | | | निजामी सरदार शेरजंगाचें पुण्यास वास्तव्य |
| स. १७६३ | एप्रिल – मे | | भोसले निजामांची पुण्यावर चढाई |
| ,, | ,, | | मीरकासीमची भोसल्याकडे विनवणी |
| स. १७६५ | ऑक्टो० | १४ | पुण्यांतून पेशव्याचें भोसल्यावर प्रयाण |
| स. १७६६ | जाने० | १८ | भोसल्याची शरणागति, खोलापुरचा तह |
| स. ,, | फे० | ५ | माधवराव निजामली भेट दहा दिवस कुरुमखेडावर |
| ,, | ,, | २४ | टोक्यास पेशव्याचें ग्रहण-स्नान |
| स. १७६८ | सेप्टें | २१ | दिवाकरपंतास पेशव्याचें पाचारण |
| ,, | डिसें० | | पेशव्याची भोसल्यावर चढाई |
| स. १७६९ | जाने० | ७ | पेशवा नागपुरास दाखल |
| ,, | ,, | १० | पंचगव्हाण येथें भोसल्याचा पराभव, चंद्रपुरास वेढा |
| ,, | फे० | १९-२२ | पुण्याचा पळ भोसले स्वारीच्या वार्तेनें |
| ,, | मार्च | ७ | भोसले मेदकावर दाखल |
| ,, | ,, | ११ | पेशव्याचा मुक्काम कनकापुरावर |
| ,, | ,, | २३ | कनकापुरचा तह |
| ,, | एप्रि० | २४ | जानोजी माधवराव भेटी |
| स. १७७२ | एप्रिल | | थेऊर येथें जानोजी पेशव्यांची भेट |
| ,, | मे | १६ | तुळजापूर येथें जानोजीचा मृत्यु |

## —५—

# नागपुरकर भोसल्यांना शिकवण

## स. १७६५–१७६९

**१. नागपुरकर भोसल्यांची तुटकवृत्ति. २. पहिली स्वारी.**
**३. निजामाशीं नवीन पायंडा. ४. जानोजीवर चढाई.**
**५. कनकापुरचा तह व कमाई.**

**१. नागपूरकर भोसल्यांची तुटकवृत्ति**—आपण मुख्य मराठी राज्याचे घटक आहों, तें राज्य टिकेल तरच आपलाही निभाव, त्याच्या संरक्षणार्थ आपणही झटलें पाहिजे, ही वृत्ति नागपुरकरांच्या अंतःकरणांत कधींच बाणली नाहीं. शिवाजीच्या वेळीं नागपुरचा उदयच नव्हता. शाहूचें आगमन महाराष्ट्रांत झालें, त्याला आरंभीं साह्य केल्यामुळें नागपुरकर भोसले मराठी राज्याचे अंशभाग बनले. रघूजीच्या धूर्ततेनें घराण्याचा पराक्रम वाढून पूर्व हिंदुस्थान बहुतेक त्यांच्या कबजांत आलें. रघूजीच्या पश्चात् त्याच्या कुटुंबांत कलह लागून पेशव्यांशीं चौघां बंधूंची तेढ उत्पन्न झाली. स. १७६३ त तर त्यांनीं निजामास सामील होऊन पुणें प्रांत उध्वस्त केला. त्यांच्या या सर्व भागळिकी तरुण पेशवा आपल्या अंतःकरणांत गुप्तपणें सांठवीत होता. प्रसंग येईल तेव्हां त्यांस चांगली अद्दल दाखवावी असा त्याचा निश्चय होता.

दुर्भाग्य मराठी राज्याचें कीं अशा थोर राजकारणाचा भाग स्वीकारण्याची बुद्धि या भोसले बंधूंस झाली नाहीं. रघूजीच्या मृत्यूनंतर यांच्याकडून प्रत्यक्ष राज्यहिताची किंवा आपलें स्वतःचें नागपुरचें राज्य दक्षतेनें सांभाळण्याची कामगिरी एकही सिद्धीस गेली नाहीं. त्यांस उद्योगास लावावें, मराठी राज्य-संवर्धनांत त्यांचा पूर्ण उपयोग करून घ्यावा, असा शिकस्तीचा प्रयत्न आतां पेशव्यानें केला. त्यासाठीं ममता व धाक दोनही प्रयोग त्यानें त्याजवर केले. पण राज्यहित न ओळखतां ते अखेरपर्यंत स्वपराक्रमाच्या घमेंडींत खितपत राहिले अंगीं बुद्धि, पराक्रम, मनुष्यबळ इतरांप्रमाणें असतां त्यांचा उपयोग राष्ट्रास मिळाला नाहीं. प्लासीच्या लढाईनें बंगाल प्रांत हातचा गेला त्याबद्दल त्यांनीं यत्किंचित् हालचाल केली नाहीं. उलट पानिपतानंतर मराठी राज्याची इभ्रत

सांभाळण्याऐवजीं साताऱ्याकडील छत्रपति पेशव्यांचें अधिष्ठान मोडण्याचाच उद्योग त्यांनीं केला. भोसल्यांनीं राज्याचे कामांत सामील होण्यासंबंधीं पेशव्यांनीं केलेल्या आर्जवांचे ढीग व त्याजवर भोसल्यांनीं दाखविलेल्या बयादा वाचतां वाचतां जीव घुटमळून जातो. घरांत सारखे तंटे, वसुलास ठिकाण नाहीं, फौजेस पगार नाहीं, कारभारांत मेळ नाहीं, अशी ही रडकथा त्या कागदांत वर्षानुवर्ष चाललेली आढळते. निजामासीं सख्य जोडून पुणें जाळण्यास जानोजी उद्युक्त झाला. पुढें त्याचवेळीं इंग्रजांनीं मीरकासीमसारख्या बाणेदार नबाबास तुडवून पाटणाशहर काबीज केलें, त्यावेळीं हा भोसल्यांनीं जिंकलेला प्रांत हातचा जातो, तो सांभाळण्यास ताबडतोब साह्य करा असें नबाबानें भोसल्यांस विनविलें. त्यांनीं धावून जाणें अवश्य होतें. पण याही बाबतींत त्यांनीं पूर्ण दुर्लक्षच केलें. घरचा नागपुरचा कारभार त्यांस होईना, मग बाहेरचा उद्योग ते कितीसा सांभाळणार! माधवरावानें भोसल्यांस कर्नाटकांत बोलावलें तेव्हां ता. २० सेप्टेंबर स. १७६४ च्या पत्रांत त्यांनीं कळविलें, ‡ "पटण्याहून शुजाउदौला वगैरेकडून मीर्झा साले मोठ्या मनसबियावर आला होता, आजारानें वारला." अशा सबबी सांगून भोसले घरांतून बाहेर पडले नाहींत. मनांतून पेशव्याचा द्वेष, बाहेरून वाटेल त्या सबबी, अशा रीतीनें जानोजीनें कालहरण केलें.

राक्षसभुवनावर भोसल्यानें आपणास तोंडघशीं पाडलें आणि पुढील तहानें सगळा वऱ्हाड प्रांत बळकावला हे प्रकार निजामअलीला दुःसह होऊन उभयतांचें वैर माजलें. स. १७६५ च्या पावसाळ्यांत निजामाचा सरदार मोरो धोंडाजी याचा भोसल्यानें वऱ्हाडांत पाडाव केला, तेव्हां निजामानें भोसल्यावर स्वारी केली आणि त्या कामीं पेशव्याची मदत मागितली. अशा स्थितींत या दोघांवरही आपला शह बसविण्याची संधि पेशव्यास प्राप्त झाली; दोघांकडेही दादाचीं अंतस्थ संधानें चालू असत, तीं बंद पाडण्यासाठीं माधवरावानें वऱ्हाडकडे स्वारी करण्याचें ठरवून वेळ पडेल त्याप्रमाणें भोसले व निजाम यांजला आपलें सामर्थ्य दाखविण्याचा निश्चय केला. राक्षसभुवनानंतर झालेल्या तहांत पेशवे निजामांनीं जरुरीप्रमाणें एकमेकांस साह्य करण्याचा करार होता, त्यास अनुसरून निजामानें ही पेशव्याची परीक्षाच पाहाण्याचा डाव टाकला. दादाला अशा वचनबद्धतेची पर्वा नव्हती, पण माधवरावाला याच बाबतींत आपली

‡ पे. द. २०. १५४.

प्रतिष्ठा सिद्ध करून दाखविण्याची खाशी संधि आली. त्यानें दादासही कळविलें कीं आपण उत्तर हिंदचे स्वारीस जाणार त्यास उभयतांनीं वऱ्हाडांत बरोबर जाऊन प्रथम भोसल्याची तक्रार मिटवूं, मग पुढें जावें.

**२. पहिली स्वारी** — स. १७६५ त कर्नाटकचा कारभार उरकून पेशवा माधवराव जूनचे आरंभीं पुण्यास आला. येतांक्षणीं त्यास जानोजीच्या कारस्थानाची नानाविध हकीकत कळली. त्यास पेशव्यानें कर्नाटकांत बोलावलें असतां गेला नाहीं. मागाहून दादा गेला त्यानें त्यास आग्रहानें बोलाविलें आणि रस्त्यांत त्याच्यासाठीं कैक दिवस खोळंबून बसला. शेवटीं आला नाहीं आणि सबब काय तर दोघां श्रीमंतांचीं स्वतंत्र बोलावणीं आपल्यास कां आलीं नाहींत. अंतःकरणांतून त्याला माधवरावाच्या उत्कर्षाचा हेवा व धाक वाटूं लागला. होऊं द्या एकदां दोन हात आणि मग पहा आमचा तमाशा, अशा वल्गना तो आपल्या मंडळांत करी, त्या सर्व पेशव्याचे कानांवर गेल्या. वेळ आली तर जानोजीला दादाचा आश्रय मिळेल, तो दादाच्या कच्छपीं लागेल हेंही पेशवा ओळखून होता. निजाम-हैदर इत्यादींशीं स्नेहसंबंध जोडून पेशव्याचा पाडाव करण्याचा त्याचा डाव होता. सिंदे–होळकरांकडे त्यानें पेशव्याविरुद्ध कागाळ्या करून त्यांचें साह्य मागितलें. जयपुरच्या माधवसिंगास आपल्या बाजूस वळविलें. त्याचा एक आत्मीय वकील बाबूराव रायाजी नांवाचा पुण्यास येऊन महिपतराव चिटणिसामार्फत नाहीं नाहीं तीं कारस्थानें रचित होता, त्यांची हकीकतही पेशव्यास कळली. ता० ६ जून १७६५ रोजीं हा वकील जानोजीस लिहितो, "पेशवे म्हणतात, हजारपांचशेंनिशीं जानोजीबाबांनीं पुण्यास येऊन आम्हांस भेटावें, पुढें मसलत करणें ते त्यांचे विचारें करूं. आपलें येणें होत नसेल तर पेशवे रावसाहेब फौजसहवर्तमान वऱ्हाडांत चालून येतील, मग अर्थं वा साधयेत्, देहं वा पातयेत् जें होणें असेल तें होईल. त्यास तुमच्यानें हजार राऊतांनिशीं यावयाचें असेल तर यावें. नाहीं तर आपले खबरदारींत राहावें आणि तमाम किल्ल्यांचा बंदोबस्त करावा."

बाबूराव रायाजीकडून अशी सूचना जानोजीस जातांच तो गडगबडून गेला. त्याजवळ पेशव्याचा वकील होता तो पुण्यास लिहितो, "जानोजीस पत्र पोंचल्यावर वल्गना केल्या कीं मजला सांपडतील तसे मारीन. कारभारीही त्यांस हीच सल्ला देतात. याचा पुष्कळ मजकूर आहे तो पत्रीं लिहितां येत नाहीं. समक्ष भेटींतच सांगतां येईल."

पेशव्याच्या सूचनेनुसार जानोजी स्वच्छ अंतःकरणानें पुण्यास येऊन पेशव्यास भेटला असता तर त्याची सर्व सोय लागून पुढील संग्राम टळले असते. पण जानोजीच्या पोटांतच कपट असल्यामुळें उभयतांचें रहस्य बनून आलें नाहीं. पेशव्यानें ताबडतोब त्यास वठणीस आणण्याचा निश्चय केला. सर्व मराठी राज्यावर हुकमत बसविण्याचा पेशव्याचा उद्देश असून भोसल्याच्या वल्गना चालूं देणें त्याला शक्य नव्हतें. वास्तविक जानोजी अगोदरच पुण्यास येण्यास निघाला होता. गोदावरी ओलांडून अलीकडे आल्यावर त्यास खबर कळली कीं पेशवा आपल्यावर चालून येणार. व्यंकटराव मोरेश्वर पेशव्याचा वकील तिकडे होता तो नागपुराहून लिहितो, " बाबूराव रायाजींनीं जानोजीस बातमी लिहिली कीं श्रीमंत पेशवे तुमच्या दग्यावर आहेत. भेटीच्या वेळेस दगा करण्यास चुकणार नाहींत. भेट घेणें तर तजविजीनें घ्यावी. नाहीं तर घेऊं नये. पेशव्यांचा इतबार धरूं नये. " ही इशारत जानोजीस पोंचतांच भेटीचा बेत रहित करून तो लगेच गोदावरी उतरून परत वऱ्हाडांत गेला आणि युद्धाच्या तयारीस लागला. खर्चासाठीं त्यानें त्वरेनें खंडण्या वसूल करून लष्कराची सिद्धता चालविली, हैदरअलीकडे वगैरे कारस्थानें चालू केलीं. *

जानोजीला ही भलतीच भर देण्याची मसलत सर्व त्याचा कारभारी देवाजीपंत सुचवीत होता. वकील लिहितो, " देवाजीपंत जबानीं मायाममतांची गोष्ट सांगतो. पोटांत कित्येक प्रकार आहेत. दादासाहेबांची ममता राखतात. ते हिंदुस्थानकडे गेले म्हणजे मुलखांत धामधूम उठविणार. सरकारची कुटाळी व हीनपत देवाजीपंत सांगतात. जानोजीबावांचें त्यांचें एकमत आहे. "

पेशवा आपल्यावर चालून येतो अशा बातम्या पावसाळ्यांत नागपुरास येऊन त्या मुलखांत धामधूम उडाली. तितक्यांत महादजी सिंद्याचे वकील नागपुरास आले, तेव्हां महादजी जानोजीचें साह्य करणार असा गवगवा उत्पन्न झाला. बाबूराव रायाजी पुण्यास बसून नाहीं नाहीं त्या खटपटी करीत होता. दादासाहेबांस आपल्या बाजूस वळविण्याची कारवाईही जानोजीनें केली. हे सर्व प्रकार पेशवा पक्केपणें जाणून होता. त्यानें फौजेची तयारी पूर्ण करून चहूंकडचीं संधानें संभाळलीं. अंतःकरणाचा ठाव मात्र त्यानें कोणासही लागूं दिला नाहीं. रघुनाथरावदादांनीं उत्तरेंत जाण्याची व्यवस्था त्यानें ठरवून दिली.

---

* पेठे द० १·३५, ३७, ४०.

निजामअलीचा कारभार या वेळीं त्याचा धाकटा भाऊ मीर मोगल ऊर्फ रुक्नुद्दौला पाहत होता, त्याच्याशीं पेशव्यानें आपल्या वकिलामार्फत स्नेह जोडून निजामाची मदत जानोजीस होऊं नये अशी तजवीज घडवून आणिली. ता० १३ ऑक्टोबर, स. १७६५ रोजीं आश्विन अखेर पेशवा पुणें सोडून स्वतः स्वारीस निघाला. ‡

निजामाचा मुलूख भोसल्यानें लुटल्यामुळें त्या उभयतांचा संग्राम चालू झाला, त्यांत निजामानें औरंगाबादच्या तहास अनुसरून पेशव्याची मदत मागितली, ती कबूल करून पेशव्यानें वऱ्हाडकडे प्रयाण चालू केलें. भोसल्यास वठणीस आणण्याचा विचार त्यानें मनांत योजिला. त्यापूर्वींच त्यानें चुलत्याची रवानगी उत्तरच्या स्वारीस केली होती. भोसल्याची समजूत घालून त्यास आपलें धोरण समजून सांगण्यासाठीं पेशव्यानें आपला खास वकील रामाजी बल्लाळ गुणे यास पुढें जानोजीच्या भेटीस पाठविलें. स. १७६५ च्या डिसेंबरांत उभयतां "श्रीमंतांच्या भेटी येदलाबाद * येथें झाल्या. तेथून बाळापुराकडे जात आहेत."

जानोजीचा सर्व ओढा रघुनाथराव दादांकडे. त्याचा कारभारी देवाजी पंत केवळ त्याचा गुरु, निकालावर न येतां बाहेरून पोकळ उपचाराच्या गोष्टी बोलून जानोजीस पेशव्याचे विरुद्ध भर देई. अर्थं वा साधयेत् देहं वा पातयेत्, अशा ईर्षेनें तो धन्यास चिथवून दादासाहेबांचे आड लपून वेळ मारून नेण्याचें त्याचें धोरण होतें. "केवळ निकर्ष करणें थोरपणास उचित नाहीं," असले उपदेशही तो पेशव्यास पर्यायानें करीत असे. ही सर्व वतावणी बरोबर ओळखून पेशव्यानें दादासही अंतःकरणांतला डाव न दाखवितां थेट नागपुराकडे चाल केली. ता० १ जानेवारीचें वर्तमान, "भोसले नागपुरा अलीकडे दहा कोसांवर आहेत. श्रीमंतांनीं वऱ्हाड प्रांताची जप्ती केली. बाळापुर अकोला यांची खंडणी केली. भोसल्यांकडील बोलण्याचा प्रकार नाहीं. श्रीमंताची फौज भारी, त्यांजपुढें निर्वाह होणें कळतच आहे. भोसल्यांचें प्रकरण अगाध नाहीं."§ अल्पावकाशांत निजामपेशव्यांच्या फौजा एकत्र चालून आलेल्या पाहून भोसल्याची गाळण उडाली. कंठावर आलें. उपाय राहिला नाहीं. दादाच्या पाठीशीं लागून निभाव

‡ पे. द. २०·१५६. * उमरखेडच्या पूर्वेस चाळीस मैल. खानदेशांतलें नव्हे. ऐ. प. १०६; पे. द. २०. १४६, १६०. § पे. द. २०. १४६, १५९, १६५.

करण्याचा त्याचा प्रयत्न पेशव्यानें चालूं दिला नाहीं. दादाला तर पेशव्याच्या तडफेची कल्पनाच नव्हती. वास्तविक भोसल्याचे अंगीं पराक्रम व आवरशक्ति कांहीं नव्हती. कशी तरी घाईघाईनें निरवानिरव करून जानोजी एलिचपुरजवळ आमनेरावर आला. जिवावर येऊन बेतली, उपाय राहिला नाहीं तेव्हां पेशव्याचा वकील व्यंकटराव मोरेश्वर जवळ होता त्याची पायधरणी करून भोसल्यानें पेशव्याकडे कृपेची याचना केली. त्याजबद्दल दादानें अत्यंत काकुळतीच्या रदबदली केल्या, त्यांस मान देऊन पेशव्यानें आपला हात आवरला. ही अस्थानीं कृपा पेशव्यानें केली नसती तर पुढील अरिष्ट पुष्कळसें टळलें असतें. त्रिवर्ग भोसले बंधूंनीं विनंती कळविली, कीं " आम्हांवर राग करून श्रीमंत वऱ्हाडांत आले. आमचा अन्याय कोणता ! एक पुणें म्हणतील तर पुण्याचा अन्याय आमचा नाहीं. मोगलानें जाळलें तेव्हांच आम्ही मोगलांसीं बेरूख जालों. एक आमचा अन्याय कीं हैदर नाइकाकडे आलों नाहीं, तर मनुष्यापासून होतच असतें, त्या अन्यायासीं असा दंड कीं काय, कीं तिसा लाखांचा सरंजाम दिला तो आमचा घेऊन मोगलांस द्यावा. सर्पास दूध पाजावें ? आम्हांस आज्ञा करावी कीं तुम्ही मोगलावर जाणें. जाऊन पारिपत्य करतों कीं नाहीं पहावें होतें ! आम्हीं त्याच्या मुलखांत चार रुपये घेतले, त्यासी श्रीमंतांनीं वऱ्हाडांत येऊन रुपये घेतले. जें जालें तें समर्थ. आतां आम्हांस वडीलपणें हातीं धरावें. आम्ही ऐसें काम करून दाखवूं कीं मागें जालें नाहीं, पुढें होणार नाहीं. आम्हीं लेकरें, आम्हांवर निकरच करतील तर आम्हांस समोरून हालतां येणार नाहीं. प्राणच द्यावा लागेल. स्वामी वडील आहेत. लढण्यांत जीव नाहीं. स्नेह होय तें करावें. यांत धन्याची मर्जी. " * दांतीं तृण धरून शरण आलेल्यास झिडकारणें पेशव्याला शक्य झालें नाहीं. दि० १८ जानेवारी, स. १७६६ दिवशीं जानोजी सडा होऊन दर्यापुर मुक्कामीं उभयतां श्रीमंतांस भेटला. सूत्रचालक देवाजीपंत यानें दादाचे कुशींत शिरून धन्याचा बचाव केला. बोलणीं व वाटाघाटी होऊन अमरावतीजवळ खोलापुर येथें तह होऊन लढा मिटला. भोसल्यानें चोवीस लक्षांचा मुलूख पेशव्यास परत द्यावा, त्यापैकीं पेशव्यानें पंधरा लक्षांचा मुलूख निजामास देऊन बाकीचा नऊ लक्षांचा आपण ठेवावा. भोसल्यानें इतउत्तर आपल्या सर्व फौजेनिशीं पेशव्याचे स्वारींत हजर राहण्याचें मान्य केलें. †

* पे. द. २०-१६८. † पे. द २०-१६५-१७३ ; चं. १०० ; ऐ प. १०७.

या भोसले स्वारीचा फलितार्थ दादानें होळकरास लिहून कळविला तो असा : "सांप्रत दर्यापुरावर आहों. भोसल्यांची सेखी, अमर्याद राजकारणें व फितुर पाहून तंबी पोंहचावणें जरूर पडलें. आमचा पोक्त सरंजाम फौज व तोफखाना मोगलही सर्व प्रकारें सामील, सबब भोसल्यांस बचावास जागा नाहीं पाहून भयभीत जाले. वकील बहुतच बजिदीचे निरोप घेऊन आला कीं पोटास मात्र द्या, वरकड आग्रह नाहीं. मातबर माणसाचा केवळच उपहास करणें उचित नाहीं व हिंदुस्थानास जाण्याची निकड, सबब भेटीस बोलावून निकाल केला. त्यांस झाडून बुडवावें ऐसाच समय होता. परंतु मातबर माणूस शरण आल्यावर निकर्ष करणें अनुचित, आपलींही पत्रें त्यांचे सिफारसीचीं आलीं यास्तव आटोपतें घेतलें." करारानुसार दादाबरोबर जानोजीनें हिंदुस्थान स्वारीस जाणें अवश्य होतें. त्यानें थोडीबहुत फौज पाठविली, पण स्वतः गेला नाहीं तो नाहींच. हे भोसले पेशव्याचे नांवानें अंतःकरणांत सदा जळत होते आणि मराठी राज्याची परवा त्यांना कधीं वाटली नाहीं, याचें विवेचन अनेकांनीं प्रसंगानुसार केलें आहे.‡

**३. निजामाशीं नवीन पायंडा** — भोसल्यावरील पेशव्याचा वार ह्या समयीं वायफळ गेला. निजामाशीं गोडी करून सर्पास दूध मात्र पाजलें असा आरोप पेशव्यावर जानोजीनें केला, यांत जानोजीला राजकारणच कळलें नाहीं हें उघड होतें. माधवरावाला कांहीं पुण्याच्या शेजारीं निजाम हवा होता असें नाहीं. पण मराठी राज्यास आंत बाहेर सर्वत्र आग लागलेली दिसत असतां सर्वांशींच वैर बांधून भागलें असतें कसें! तिकडे हैदर, इकडे निजाम, पलीकडे इंग्रज, घरांत चुलता हे सर्व ग्रह ह्या पेशव्यास गिळंकृत करण्यास टपलेले, अशा स्थितींत त्यानें शेजारच्या निजामास युक्तीनें वश करून घेतलें याबद्दल त्याची वाखाणणीच केली पाहिजे. पालखेड पासून राक्षसभुवनपर्यंतचा निजाम-पेशव्यांचा चित्रपट माधवरावाचे दृष्टीपुढें सारखा वावरत होता. उदगीरच्या मोहिमेपर्यंत मराठ्यांना धमक वाटत होती कीं आपण सबंध महाराष्ट्रभूमि मुसलमानांचे कबजांतून सोडवून स्वराज्याखालीं आणूं. ही पेशव्यांची हाव पानिपतप्रसंगानें साफ विरून गेली. प्रत्यक्ष पेशव्यांचेंच आसन डळमळून निजामअली पुण्यास येऊन भिडला. राक्षसभुवनावर निजामाचा पाडाव होऊन

‡ पाहा वि. सी. चितळे यांचा निबंध, हि. रे. क. जयपूर १९५१. पे. द. २०·१८४.

तोच जेव्हां पेशव्याशीं स्नेह करण्याच्या गोष्टी बोलूं लागला, तेव्हां माधवरावाच्या मनानें ठरविलें कीं आपण एकदम सर्व शत्रूंशीं बेबनाव करूं नये. कर्नाटकांत हैदरखानाशीं तोंड देणें आहे तर निजामाशीं आपलें सख्य पाहिजे. यास्तव उत्तरेकडील बादशाही कारभाराकडे तूर्त डोळेझांक करून हैदरअलीचा नवा कोंब प्रथम खुडून काढावा. हा त्रिविध कार्यक्रम कृष्णराव काळे, सखाराम बापू इत्यादींच्या सल्लयानें विचारांत घेऊन तूर्त निजामाला पेशव्यानें आपला मित्र बनविलें. या कामीं एका मुस्लीम व्यक्तीचा उपयोग पेशव्यास झाला तो अज्ञात प्रकार प्रथम सांगितला पाहिजे.

शेरजंग नांवाचा एक हुशार सरदार निजामसरकारचे पदरीं होता. त्याचें मूळ नांव हैदर यारखान. स. १७५३ त सलाबतजंगानें त्यास शेरजंग असा किताब देऊन वसुलाच्या कामावर नेमिलें. पुढें निजामअलीनें सलाबतजंगावर अत्याचार चालविले त्यांत खानानें सलाबतजंगाचा पक्ष घेतल्यामुळें निजामअलीशीं त्याचें वांकडे आलें. तेव्हां आपल्या जिवास निजामअली अपाय करील अशी भीति वाटून तो शेरजंग स. १७६१ त पुण्यास येऊन तेथें दोन तीन वर्षे राहिला. निजामअलीनें पुण्यावर चाल केली तेव्हां शेरजंग पुण्यास असून सखारामबापू, कृष्णराव काळे इत्यादिकांशीं त्याचा स्नेह जमला. त्या दोन वर्षांच्या धामधुमींत शेरजंगाचा उपयोग पेशवे दरबारला चांगला झाला. राक्षसभुवन येथें विठ्ठल सुंदर मारला गेल्यावर निजामअलीनें पेशव्यास भेटून स्नेहाचा तह केला, त्या वेळीं निजामअलीचा मुख्य कारभारी त्याचा धाकटा भाऊ रुकुद्दौला होता, त्याच्या शिफारसीनें व पेशव्याच्या आग्रहावरून निजामअलीनें शेरजंगावरील आपला रोष सोडून त्यास पुनः आपल्या नोकरींत घेतलें. निजामअली व माधवराव यांचें सख्य जमवून आणणारा मुख्य दुवा हा शेरजंग होय. त्याच्या मार्फत त्या दोन दरबारांची दिलजमाई बनली. दोन्ही पक्षांतील कर्तबगार व्यक्तींशीं शेरजंगाचा निकट परिचय घडल्यामुळें उभयतांची पूर्वीची तेढ निरास पावली. मुख्यतः निजामास दक्षिणेंतून साफ उखडून काढण्याचा पेशव्यांचा प्रयत्न सुटल्याबरोबर शेजारधर्मानें वागण्याची स्फूर्ति उभयपक्षांत निर्माण झाली. माधवरावानें स्पष्ट आश्वासन निजामाला दिलें, कीं "तुमचें आमचें वैर असूं नये. तुमचा राज्यांश आहे या स्थितींत तुम्ही सांभाळावा. आमचा आम्ही सांभाळूं. कोणी कोणास दुखवूं नये किंवा एकमेकांवर आक्रमण करूं नये. तक्रारी उपस्थित होतील त्या सामवृत्तीनें एकमेकांनीं बोलून भागवाव्या,

त्यासाठीं वर्दळीस येण्याचें कारण नाहीं." याप्रमाणें निजामासंबंधानें पूर्वीचें धोरण माधवरावानें सोडल्याबरोबर या शेरजंगामार्फत त्या दोन दरबारांत नवीन स्नेहमनु उत्पन्न झाला. स्नेह ठेवण्यांतच उभयतांचें कल्याण आहे, शत्रुत्व चालविण्यांत दोघांचेंही नुकसान या प्रवृत्तीचा उत्पादक हा शेरजंग होय. निजामअलीनें लगेच त्याची नेमणूक औरंगाबादच्या सुभ्यावर केली आणि मराठ्यांचीं राजकारणें तो त्याच्याच सल्ल्यानें भागवूं लागला. हा शेरजंग पुढें स. १७७५ त मरण पावला. नारायणरावाच्या वधानंतर निजामअलीनें रघुनाथरावाचा पक्ष स्वीकारला नाहीं त्याचें श्रेय या शेरजंगास आहे.† मराठी वकिलांच्या पत्रांत शेरजंगाचा उल्लेख प्रसंगानें येतो. वरील माहिती हैदराबाद दप्तरांतून मिळाली.

भोसले निजमांचा तंटा लागलेला ऐकून दादा त्या दोघांचाही पेशव्याला नरम करण्याचे कामीं उपयोग करूं पाहत होता. दादा आनंदवल्लीहून व पेशवा पुण्याहून एकदम बाहेर पडले. गोदावरीवर उभयतांनीं भेटून पुढील उद्योग ठरवायचा होता. निजामानें पेशव्याकडे तक्रार केली कीं जानोजी भोसले आमचा वऱ्हाडचा प्रदेश लुटतो त्याचा तुम्हीं बंदोबस्त करून द्या, आम्ही फौज घेऊन त्याजवर जात आहों, तर या प्रसंगीं तुम्ही आमचें साह्य करा. दोन वर्षांपूर्वी औरंगाबादचे तहांत ठरलेंच आहे कीं अडीअडचणींत उभयतांनीं एकमेकांचें साह्य करावें. पण तहाचीं कलमें आचरणांत आणायचीं नसून केवळ दिखाऊ शोभेचीं असतात अशी त्या वेळची मुत्सद्दी धोरणाची सामान्य समजूत होती. पण माधवराव वचनाचा खंबीर होता. कोणाही सल्लागाराचें न ऐकतां आपल्या मनास पटेल तें धडाक्यानें करून दाखवायचें हा त्याचा बाणा. त्यानें निजामाचें साह्य करून भोसल्यास तंबी दिली आणि अल्पावकाशांत चहूंकडे दरारा बसविला. प्रत्यक्ष त्याच्या चुलत्यासही आश्चर्य वाटलें कीं हा उद्दाम पोर शत्रूचें साह्य घेऊन आपल्याच सरदारांचा पाडाव करतो. दादाचा घाट होता कीं मागेंपुढें आपणास पुतण्याशीं झगडावें लागल्यास भोसल्याचें साह्य आपणांस हटकून मिळावें. हा चुलत्याचा डाव पेशव्यानें हाणून पाडला, इतकेंच नाहीं तर वऱ्हाडांतून दादास निरोप देऊन आपण परत येत असतां निजामानें भेटीची इच्छा दर्शविली ती पेशव्यानें लगेच बिनदिक्कत मान्य केली. उभयतांच्या भेटी

† पे. द. २०·१२८, १४६, १५९, १७२.

एक आठवडाभर अशा विश्वासानें व आनंदानें पार पडल्या कीं या विपरीत राजकारणाचा त्या वेळीं बाहेर मोठा अचंबा प्रगट झाला. निजामबाजीरावाची भेट स. १७३२ त झाली तेव्हां सर्व महाराष्ट्र चिंताक्रांत बनला होता. मुसलमानी कावा सर्व हिंदुस्थानास महशूर होता. बेलभंडार नाहीं, कुराण नाहीं, आणा-शपथा नाहींत. त्या वेळचे दोन तरुण मागचा पन्नास वर्षांचा इतिहास पूर्णपणें विसरून आणि निकटवर्ती सल्लागारांना सर्वथा बाजूस ठेवून, प्रेमभावानें व अत्यंत विश्वासानें एकमेकांस भेटून स्नेह जोडतात, हा देखावा त्या वेळच्या राजकारणास धक्का देणारा व स्पृहणीय म्हटला पाहिजे. या भेटीची वार्ता दादास कळल्यावर त्याचा थरकांप झाला यावरूनच पेशव्याच्या धोरणाची महती कळते.

मागें सांगितलेंच आहे कीं सन १७६५ त पुण्याहून दसऱ्यास बाहेर पडतांना चुलता, भोसले व निजाम या त्रिवर्गांशीं सख्य करून सगळ्यांनीं मिळून बाह्य शत्रु जे इंग्रज हैदर वगैरे सर्वांनाच नडत होते त्यांना आळा घालावा, असा माधवरावाचा दूरदृष्टीचा डाव योजलेला होता. दुर्दैवानें भोसल्यास तो उमगला नाहीं म्हणून त्यास थोडी लष्करी चुणूक दाखविणें पेशव्यास भाग पडलें. या मोहिमेंत खुद्द निजामअलीही पेशव्यास सामील होण्यासाठीं आला होता. त्याची अर्धीमुर्धी फौज भोसल्यावरच्या स्वारींत पेशव्याबरोबर काम करीत होती. तथापि निजामअली व माधवराव यांच्या प्रत्यक्ष भेटीचा योग जमला नव्हता तो त्यानें आतां घडवून आणिला. भोसले-पेशव्याची भेट दादाचे सांनिध्यांत झाल्यामुळें ती पेशव्यास हवी होती तशी सफाईदार उतरूं शकली नाहीं. आतां निजामअलीच्या भेटीस तरी दादानें व्यत्यय आणूं नये म्हणून माधवरावानें त्यास परभारें उत्तरेंत रवाना केलें आणि परत फिरून येतांना जणूं काय सहजगत्या निजामअलीची भेट घेतली. ही भेट म्हणजे एक मोठा राजकारणी डाव माधवरावानें कौशल्यानें जिंकला असें म्हणावें लागतें.

चुलत्यास वैषम्य न वाटावें म्हणून निजामाच्या या भेटीची हकीकत पेशव्यानें लगोलग त्यास लिहून पाठविली कीं, "निजाम अलीखान आले. ५ फेब्रुवारी (स. १७६६) ला दरम्यान डेरे देऊन त्यांच्या आमच्या भेटी जाल्या. दुसरे दिवशीं आम्ही त्यांचे डेऱ्यास गेलों. परस्परें शिष्टाचाराचें बोलणें जालें." "श्रीमंतांचे व नबाबाचे कुरुमखेडावर * दहा मुक्काम जाले. डेऱ्यास येणीं जाणीं

* हें स्थल उमरखेडजवळच आहे. भेटीचे विपुल उल्लेख पाहा पे. द. २९·१२०; २०· १७४; ३७·१२९; ३८·१६५, १६६, १८४; का. सं. प. या. २०७.

जालीं. प्रथम दिवशीं मध्यें डेरा उभा करून इकडून रावसाहेब तिकडून नबाब ऐसे आले. उत्तम मिष्ट भाषणें परस्परें दोन अडीच घटका जालीं. नंतर उभयतांचे तळ उमरखेड्यानजीक पाण्यावर येऊन राहिले. भेटी वारंवार जाल्या. मग शिष्टाचार वस्त्रें, जवाहीर याप्रमाणें आठ नऊ हजार रुपयांचें व हत्ती घोडे परस्परांस दिल्हे. चार सा घटका रात्रपर्यंत फार गोड भाषणें जालीं. सरकारांतून नबाबांस महाल दिल्हे त्यांचा बंदोबस्त करीत पूर्वस्थलीं जात आहेत. ”

दादाच्या पोटांत मात्र या भेटीनें धस्स झालें. धोंडोराम वकील व कृष्णराव बल्लाळ पेशव्याजवळ होते त्यांस दादानें खोदखोदून लिहिलें कीं माधवराव निजामअलीचीं बोलणीं काय झालीं व काय ठरलें. वास्तविक नवीन तह असा कांहींच ठरला नव्हता. पण कागदी करारापेक्षां अंतःकरणाचा स्नेहभाव उभयतांनीं रहस्यपूर्वक बोलून कायम केला त्याची किंमत जास्त होती. पंधरा लाखांचा मुलूख अगोदरच निजामास दादानें दिला होता. माधवरावाचें वय या वेळीं २१ वर्षांचें व निजामअली अकरा वर्षांनीं वडील. त्याचा जन्म ता० ७ मार्च १७३४ चा आहे. कसे झाले तरी दोघे विधर्मी सत्ताधीश खुल्या अंतःकरणानें आठ चार दिवस एकत्र राहून मनमुराद सहवासाचा लाभ घेऊं शकले यांत त्यांचीं अंतःकरणें मिळून आलीं. परस्परें आणभाष होऊन स्नेहाची गांठ भक्कम बसली. “आमच्या तर्फेनें स्वतंत्र शपथेचा कागद देण्याघेण्यास सांगितलें असतां, एकट्या चिरंजीवांचाच लेख कां झाला, आमचाही शपथेचा लेख स्वतंत्र कां केला नाहीं” असें धोंडोरामास दादानें खडसावलें, त्यावर त्यानें समजुतीचा जबाब पाठविला कीं, “आपली व पेशव्याची शपथ वेगळी झाली पाहिजे असा आग्रह मीं धरला असता तर यवनास संशय येता कीं घरांत फूट आहे. या प्रसंगीं हें बोलणें उचित नाहीं. दोघांच्याही शपथा एकट्या रावसाहेबांनींच दिल्या. याउपर जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन.” × दादांच्या मनांतील विष यांत चांगलें व्यक्त होतें.

वऱ्हाडांत निजामाशीं सख्य जोडून पेशवा ग्रहणासाटीं गोदावरीवर आला. हें चंद्रग्रहण दि० २४ फेब्रुवारीस झालें. “रावसाहेब टोक्यास आले. तेथून सडे होऊन गंगापुरास मातुश्रीचे दर्शनास गेले.” तेथें दोन आठवडे राहून मेच्या

× पे. द. २०·१६७.

आरंभीं पुण्यास आले. या वेळेपासून एकंदर मराठ्यांचें राजकारण पेशव्यानें स्वतःच्या हातीं घेतलें. निजामाशीं सख्य जोडल्याचा परिणाम तत्काळ दिसूं लागला. पालखेडपासून उदगीरची परंपरा व त्यापुढील राक्षसभुवनाचा प्रसंग या मागच्या आठवणी बुजून माधवरावानें जोडलेला निजामाचा स्नेह पुढें तीस वर्षें खर्ड्याच्या प्रसंगापावेतों टिकला. पोटांतल्या भावना उभय पक्षीं कांहीं असल्या तरी माधवरावानें आपल्या हयातींत निजामास व त्याचे हस्तकांस वस्त्रें, हत्ती, घोडे वगैरे पाठवून संतुष्ट ठेविलें, 'ऐने अंबारीसकट चांगला हत्ती नजर केला,' हें स्मरण पुढें फार दिवस टिकलें.‡ माधवरावाच्या पश्चात् नारायणरावाचा खून, इंग्रज–मराठा युद्ध, चौकडीचें कारस्थान अशा नानाविध गहन प्रसंगांत निजाम–मराठा स्नेह चांगलाच कसास लागला याचें श्रेय माधवरावास दिलें पाहिजे. निजामानें जर दादाचा पक्ष वरील प्रकरणांत घेतला असता तर त्या कलिपुरुषाचा पाडाव नाना फडणिसाकडून सहसा झाला नसता असें सहज अनुमान निघतें.

**४. जानोजीवर चढाई**—स. १७६६ च्या जानेवारींत माधवरावानें आपल्या राजनीतीची अल्प चुणूक भोसल्यांस दाखविली. अपेक्षा होती कीं एवढ्या अनुभवानें त्याची उमज पडून तो योग्य मार्गावर येईल. पण पेशव्याचा हा अंदाज चुकला. पुढील दोन वर्षांत पेशव्याचें सामर्थ्य पुष्कळ वाढलें. स. १७६८ त धोडपेवर दादाचा निकाल लागला आणि इतःपर त्याच्या आड लपण्याची सोय भोसल्यांना उरली नाहीं. शिंदे, होळकर, गायकवाड या सर्वांस पेशव्यानें सुतासारखें नरम आणलें. हैदरअलीचें प्रस्थही बरेंचसें आटोक्यांत आलें. शत्रूंचें निर्मूलन करून मराठी राज्याच्या सर्व घटकांना कर्तव्यप्रवण करणें हा माधवरावाचा मुख्य हेतु आरंभापासून हळूहळू पूर्णतेस पोंचत होता. सर्व एका शिस्तींत बांधले जात होते. मरणसमयीं त्याचा एकही सरदार असा नव्हता कीं जो त्याची आज्ञा भक्तिभावानें पाळण्यास तयार नव्हता.

स. १७६६ च्या स्वारींत भोसल्यास शरण आणून पेशव्यानें त्याच्याशीं पुढील वागणुकीचा ठराव केला, त्यास खोलापुरचा तह म्हणतात. त्या करारांत ज्या मर्यादा भोसल्यास पेशव्यानें घालून दिल्या त्या त्यानें बिलकूल पाळल्या नाहींत. दादाच्या भिडेस्तव या प्रसंगीं पेशव्यानें आपला हात आवरला. रघूजी

‡ पे. द. २०-१८३, १८४.

करांडे ( कारंडे ? ) म्हणून भोसल्यांचा सरदार होता, त्याचा पुतण्या राणोजी पेशव्यास सामील झाला या कारणास्तव जानोजीनें त्यास अटकेंत ठेविलें. हा एक प्रकारें पेशव्याचाच अपमान जानोजीनें केला. पुढें घोडपेवरील प्रसंगांत जानोजीनें दादाचें साह्य केलें. त्याची फौज मात्र वेळेवर संग्रामांत येऊं शकली नाहीं. तथापि पेशव्यांचे विरुद्ध जानोजीचीं संधानें सारखीं चालूच राहिलीं. त्यास कडक शिस्त पुनः शिकविल्याशिवाय राज्य निर्वेध चालणार नाहीं, राज्याचे सर्व घटक मध्यवर्ती सत्तेशीं अनुरक्त पाहिजेत, अशी पेशव्याची खात्री झाली, तेव्हां इतर निकडी सर्व बाजूला ठेवून पेशव्यानें पुनः स. १७६८ अखेर नागपूरवर स्वारी करण्याचें ठरविलें. त्या वेळीं उत्तरेंत जाऊन इंग्रजांना आळा घालण्याचा पेशव्याचा प्रथम इरादा असून हा भोसले आयत्या वेळीं इंग्रजांस अनुकूल होऊं नये असा बंदोबस्त करणें अपरिहार्य झालें. जानोजीचा सर्व इतबार देवाजीपंतावर असून तो देवाजी सदा पेशव्याविरुद्ध कारस्थानें खेळवी तें पेशव्यास खपलें नाहीं. जानोजीनें पेशव्याचे मुलखांत धामधूम चालविली, त्याची तपशीलवार बातमी पेशव्यास मिळाली. त्यावरून पेशव्यानें जानोजीस भेटीस बोलाविलें. याचा अर्थ जानोजी समजला कीं पेशवा भेटीचें निमित्त करून आपणास दगा करणार. जानोजी अर्ध्या वाटेंतून परत गेला व युद्धाचे तयारीस लागला. या त्याच्या हालचाली इत्थंभूत पेशव्यास कळल्या, त्याबरोबर त्यानें उत्तरेची वाट चालणाऱ्या आपल्या फौजांना भोसल्यावर चालून जाण्याची आज्ञा केली. दादास आणून पुण्यास कैदेंत ठेवतांच पेशव्यानें भोसल्यास वठणीस आणण्याचा निश्चय मनांत ठरविला आणि युद्धाची तयारी केली. तरी एकदम निकरावर न येतां त्यानें देवाजीपंतास भेटीसाठीं पुण्यास बोलाविलें. जानोजीनें देवाजीपंतास न पाठवितां दुसराच इसम चिमणाजी रुक्मांगद म्हणून पेशव्याची संशयनिवृत्ति करण्यासाठीं पाठविला. जानोजीचा हा लपंडाव ओळखून पेशव्यानें ता. २१ सेप्टेंबर स. १७६८ रोजीं जानोजीस लिहिलें, "चिमणाजी रुक्मांगद आले, त्यांनीं सर्वार्थ निवेदन केला, तथापि दिवाकर पुरुषोत्तम यांसच पाठवावे, त्यांनींच येऊन येथील खातरजमा केली पाहिजे, तरी त्यांस सत्वर पाठवावें." यावरही दिवाकरपंत आला नाहीं. पुनः आणखी एक महिन्यानें २१ ऑक्टोबर रोजीं पेशव्यानें जानोजीस लिहिलें, "दिवाकरपंतास सत्वर पाठवावें, वारंवार संदेह न धरितां त्यांसच पाठवून आपणही निघून भेटीस यावें." *

* पे. द. २०·१९७ ; ऐ. प. ११० – ११३.

पण ह्याही निक्षून केलेल्या आज्ञा जानोजीनें मानल्या नाहींत. उलट दिवाकरपंतानें दादाकडे अनुसंधान चालविलें. पंत हाच मुख्य सूत्रचालक असल्यामुळें पेशवा आपणास अपाय करील अशी भीति त्यास वाटे. इतक्यांत पेशव्यास बातमी आली कीं इंग्रजांचें साह्य घेऊन भोसले पेशव्यावर चालून येतो. तेव्हां पुढें बोलाचालींत वेळ न घालवितां पेशव्यानें एकदम भोसल्यावर स्वारी करण्याचें ठरविलें. नागपुरावर पेशवा चालून येतो तें संकट समोर दिसतांच नाहक देवाजीपंत पेशव्याचे भेटीस आला. पेशवा वऱ्हाडाकडे जात असतां मार्गांतच त्यांची भेट झाली. पंतानें पेशव्याचा रोख ओळखून जानोजीला अंतस्थ पत्रानें इशारा दिला कीं हा प्रसंग युद्धाचाच आहे, तुम्ही तयारी करा. पेशव्याला पंताच्या या खटपटीचा सुगावा लागला आणि त्यानें देवाजीपंतास एकदम अटकेंत ठेविलें आणि नागपुराकडे चाल केली. या प्रसंगीं सखारामबापू पेशव्याबरोबर होता, त्याचाही संशय पेशव्यास आला आणि लगेच त्यास पेशव्यानें कामावरून दूर केलें. त्याबरोबर जानोजी व त्याचे सर्व बंधू यांनीं लगबगीनें इंग्रजांकडे संधान बांधून पेशव्याशीं लढण्याची सिद्धता केली. पेशव्याचा विचार होता कीं जानोजीची समक्ष भेटींत समजूत घालून, स्नेह जोडून लगेच सर्व फौजा रामचंद्र गणेशाबरोबर उत्तरेंत रवाना कराव्या. हा पेशव्याचा बेत जानोजीनें बिघडविला. त्यानें युद्धाचा अवलंब करितांच पेशव्यासही दुसरा इलाज राहिला नाहीं. उत्तरेचा कार्यभाग सोडून त्यास त्याच सर्व फौजा नागपुरावर पाठवाव्या लागल्या. बादशहा इंग्रजांस सोडून दिल्लीस जाण्यास आतुर झाला होता त्यासाठीं इंग्रजांशीं सामना होण्याचा रंग होता. इंग्रज फक्त राजकारणानें मराठ्यांची चढाई थांबवीत होते. त्यासाठीं ते भोसल्यास प्रत्यक्ष मदत कांहींच न करितां उगीचच पेशव्यावर उठण्याची भर देत होते. नागपुर–वऱ्हाडकडे आपल्या फौजा पाठवून पेशव्याशीं युद्धाचा प्रसंग त्यांनीं आणिला नाहीं. पुण्यांतून बाहेर पडतांना पेशव्याची तयारी उत्तरेच्या स्वारीची होती, पण भोसल्याचा रोख पाहून त्याला आपला पहिला बेत बदलावा लागला. रामचंद्र गणेश उत्तरेची व गोपाळराव पटवर्धन कर्नाटकची वाट चालूं लागले होते, त्यांस पेशव्यानें आकस्मिकपणें वऱ्हाडांत आपल्याजवळ बोलावून घेतलें. निजामासही कळवून त्याची फौज आपल्या साह्यास आणिली. निजामाचे सरदार रुक्नुद्दौला व रामचंद्र जाधव पेशव्यास सामील झाले. पेशव्याची तयारी पूर्ण झाली. बरोबर तोफखाना मोठा. सर्वांनीं एकदम नागपुरावर रोख धरिला. " देवाजीपंत

बरोबर अटकेंत आहे. पंधरा लक्ष रुपये देतों म्हणतो. श्रीमंत ऐकत नाहींत. केवळ निग्रहास गोष्ट आली. श्रीमंत सर्व गोष्टी उत्तम करीत आहेत. फौज भारी. आमनेरचे किल्ल्यांत ठाणें बसवून वर्धेअलीकडील भोसल्यांचा अंमल उठवून आपला बंदोबस्त केला. तारीख ७ जानेवारीस नागपुरास आले. रामचंद्र गणेशाची रवानगी भंडाऱ्यावर केली. त्यानें भंडारा काबीज केलें."

डिसेंबर अखेरीस हरिपंत फडके नाना फडणिसास लिहितो, "नारायणरावांस नागपुरास रवाना करून पेशवे भोसल्यांचे मुलखांत जातात. जूज भांडण. श्रीमंतांची प्रकृति नीट नाहीं, म्हणून सौ० रमाबाईस पुण्यास पाठवितात." भोसल्यानें विरोध करून समोर सामना करणें टाळिलें आणि गनिमी काव्यानें पेशव्यास हैराण करण्याचा मार्ग स्वीकारला. मुलेंमाणसें जडजवाहीर गाविलगडावर बंदोबस्तांत ठेवून सर्व बंधु नागपुरच्या दक्षिणेस शंभर मैलांवर वर्धेच्या कांठीं चंद्रपुर ऊर्फ चांदा येथें बंदोबस्तानें राहून बचावाचें युद्ध खेळूं लागले. महिपतराव दिनकर गुप्ते म्हणून जानोजीचा शूर व इतबारी सरदार होता, त्याजला चांद्याच्या बंदोबस्तास ठेवून जानोजी तेथून बाहेर पडला. "त्याचा सरदार नरहर बल्लाळ रिसबूड श्रीमंतांचे सामन्यास आला असतां, त्याजवर विपरीत काळाची छाया पडून वऱ्हाडांत पूर्णातीरीं पंचगव्हाणजवळ १० जानेवारीस लढाई होऊन सूर्योदयीं अंधकार लयास जातो तद्वत नरहर बल्लाळ सहसमुदाय गतप्राण झाले. श्रीमंतांची फौज विजयी झाली." ‡

नागपुरकडील प्रदेश पेशव्याचे कबजांत आला, पण चंद्रपुर येथें भोसल्यांचें सर्व अधिष्ठान असल्यामुळें तें हातीं आल्याशिवाय निकाल पडेना. स्वतः जानोजी फौज घेऊन पेशव्याच्या मुलखांत शिरला, त्यास आळा घालणें हीच मोठी निकड उद्भवली. अल्पावकाशांत भोसल्यास नरम करण्याचा पहिला बेत सिद्धीस जाईना. सबब आतां पेशव्यानें आपल्या फौजेचे दोन भाग केले. एकानें चांद्यास वेढा घालून तोफांचा मारा चालविला आणि दुसरा भाग जानोजीच्या पाठलागावर गेला. वेढ्याच्या कामीं पेशव्याचे सरदार बाबूराव व सखाराम हरि गुप्ते यांनीं फार चांगली मेहेनत केली. "जानोजी भोसले तूर्त झाडींत पळोन गेले. श्रीमंतांचे ताले सिंकदर आहेत. भोसले खराबींत आले. त्यांची फौज सात आठ हजार तर श्रीमंतांची पन्नास हजार आहे. भोसले पेशव्यास भेटत नाहींत.

‡ पे. द. २०. २००–२१५ व २२४.

त्यांचे पाठीवर गोपाळराव व रामचंद्र गणेश लागले.” कांहीं तरी हूल उठविल्याशिवाय चांद्याचा बचाव होत नाहीं असें पाहून जानोजीनें धरमपुरी-जवळ गोदावरी उतरून निजामाचे प्रदेशावर चाल केली आणि इकडे पुणें जाळून खाक करतों अशी खोटीच आवई घातली. देवाजीपंत अटकेंत होता तरी पेशव्याच्या व्यवस्थेची त्याला भरपूर माहिती होती तिचा उपयोग करून, अंतस्थ रीतीनें तो भोसल्यास नाना युक्त्या सुचवीत होता त्यामुळें पेशव्याची तारांबळ उडाली ह्यांत संशय नाहीं. “श्रीमंत चांद्याच्या शहास गुंतले हें फार चांगलें. असेंच त्यांस आणखी थोडा वेळ गुंतवून ठेवावें, तोंपर्यंत आम्ही पुण्यास जाऊन दादासाहेबांस सोडवून पेशव्यावर चालून येतों,” अशा प्रकारचें बनावट पत्र देवाजीपंताच्या सूचनेवरुन जानोजीनें लिहून तें पेशव्याच्या हातीं पडेल अशी तजवीज केली, तेणेंकरून अल्प काळ पेशव्यास मोठा पेच निर्माण झाला. चांद्याचा वेढा उठवून तो परत पुण्याच्या बचावास निघाला. नाना फडणिसास लिहून त्यानें दादाची रवानगी सिंहगडास केली. त्यामुळें पुणें शहरांत एकदम मोठी धांदल उडून गेली. फेब्रुवारी १९ ते २२ पावेतों तीन दिवस तेथें मोठा प्रळय उत्पन्न झाला. लोक वस्तवानी घेऊन चहूंकडे पळत सुटले. बाहेर जाण्यास दर बैलास पंचवीस रुपये भाडें लोक मागूं लागले. ता० २३ फेब्रुवारी रोजीं पेशव्याकडून पुण्यास बातमी आली कीं “ही केवळ लटकी हूल मुद्दाम उठविलेली आहे. भोसले पुण्यास जात नाहींत, लोकांनीं घाबरूं नये.” त्यावरून पुण्यांत परत शांतता झाली. दादासाहेब आदी करून सर्व माघारे आले. देवाजीपंतासारखे शहाणे मुत्सद्दी कसा डाव खेळत, त्याचें हें उदाहरण आहे. त्याच मासल्याची आख्यायिका बुद्धिबळाच्या खेळांतलीं तीन घरें प्यादीं मागें घ्या हें सुचविणारी लक्षांत आणावी. §

जानोजी भोसले झुकांड्या देत पाठलाग करणारांस चुकवीत भालकीवर आला. मागाहून पेशवाही माहुराहून त्याजवर चालून गोंदावरी ओलांडून ब्रह्मेश्वरावरून मेदकपावेतों गेला. ता० ७ मार्चचें वर्तमान. “भोसले मेदकचे सुमारें गेले. गोपाळराव व रामचंद्र गणेश त्यांचे पाठीवर दहा कोसांचे अंतरें आहेत. लोकांची गाळण बहुत जाली. माणूसमात्र रडकुंडीस आलें. देवाजीपंत मागें बुणग्यांत आहे. मांदगी जाली म्हणतो. सरकारचीं बोलावणीं गेलीं, परंतु

§ पे. द. २०. २४१, २६१.

तो भेटीस जात नाहीं. भोसल्याचे लष्करास भाकर मिळत नाहीं. घुगऱ्यांशीं गांठ. घोडीं फार थकलीं. जेथवर गांठ तुटेल तेथवर तोडावी. अंगासीं अंग लागलेंच तर झुंजोन मरावें असा जानोजीचा विचार दिसतो. §

सुमारें महिनाभर अशी धावपळ चालून उत्तरोत्तर पेशव्यानें भोसल्यास घेरीत आणिलें. रामचंद्रपंत व गोपाळराव यांनीं त्यास पुढें जाण्यास अटकाव केल्यामुळें तो मेदकवरून परत गोदावरीकडे वळला. भारी दौडीनें पेशव्याचें अंग चुकवून गोदावरीतीरानें तो पूर्वेस तेलंगणांतील चिनूरच्या जंगलांत शिरला. हरिपंत फडके १३ मार्चला लिहितो, "श्रीमंतांची स्वारी काल कनकापुर गंगा उत्तरतीरीं आली. येथून निर्मळ पूर्वेस दहा कोस आहे. भोसले चिनूरचे सुमारें झाडींत मुक्काम करून आहेत. गोपाळराव गंगातीरीं ब्रह्मपुरीवर आहेत. त्यांस व भोसल्यांस तीन कोसांचें अंतर आहे." *

**५. कनकापुरचा तह व कमाई**—चहूंकडे युद्धाची धुमाकूळ चालू असतांच मुत्सद्दी माराही उभय पक्षीं जोरांत चालू होता. पेशव्यानें परभारें मुधोजीची समजूत पाडून त्यास आपल्या बाजूस वळविलें. शिवाय भोसल्यांचे पक्षांतील ठळक सरदारांचीं वतनें जप्त करून मुलें-माणसें कैद करण्याचे हुकूम पेशव्यानें सोडले. अशा नानाविध उपायांनीं व चार महिन्यांच्या श्रमानें उभय पक्ष टेकीस आले. आतां उन्हाळा वाढला, तेव्हां केव्हां एकदां मोहीम संपते असें लोकांस झालें. गोपाळरावानें तडजोडीचा मार्ग पेशव्यास सुचविला तो त्यास पटला. किल्ली सर्व देवाजीपंताचे हातीं होती, त्यास भेटीस आणून पेशव्यानें गोपाळरावामार्फत बोलणें केलें. "देवाजीपंत लष्करांत आले, आज चार रोज आपले तर्फेनें बोलतच आहेत. त्यांचें बोलणें कीं आतां कांहीं जीव राहिला नाहीं. मुलूक गारद जाला, लुटला, जाळला, गुरेंढोरें मेलीं. फौजेची तलब चढली. आतां पोटासीं धरून कृपा करावी. अपराध क्षमा करावे. चाकरी सांगाल ती करूं, (२२ मार्च)." या विनंतीस पेशव्याचे तर्फेनें गोपाळरावानें मान्यता दिली. त्यावरून कृष्णराव बल्लाळ यांस रुकुदौलाकडे पाठवून त्याचा मनोदय पेशव्यानें काढिला आणि खुद्द जानोजीस पेशव्यानें लिहिलें, "तुम्ही सर्व प्रकारें दौलतीचें उत्तम तेंच इच्छावें, काडीमात्र दुसरा भाव नसावा. येथूनही दुसरा विचार नाहीं. आपण शपथपूर्वक पत्र पाठविलें, त्याप्रमाणें चालावें. यास कै०

---

§ पे. द. २०. २४६-२५०. * पे. द. २०. २५३.

नानासाहेबांची व श्रीगजाननाची शपथ असे. जैसे निष्ठेनें वर्ताल तैसी तुमच्या दौलतेची अभिवृद्धि करण्यांत येईल. " ‡

अशा प्रकारें अनेकांच्या प्रयत्नानें उभयपक्षीं सद्भावना निर्माण झाली तेव्हां मुख्यांच्याच भेटी व्हाव्या असें ठरलें. त्यासाठीं पेशव्यानें देवाजीपंतास जानोजीचे भेटीस पाठवून त्याजबरोबर आपल्या तर्फेनें गोविंद शिवराम यास दिलें. इकडे त्या अवधींत तहाच्या वाटाघाटी व कलमांचे मसुदे तयार जाले. भेटीची वेळ, जागा, मानपान हे सर्व तपशील ठरण्यास वेळ लागला. चैत्र व० ४ सोमवार २४ एप्रिल या दिवशीं श्रीमंतांच्या व भोसल्यांच्या भेटी मेहेकर नजीक झाल्या. बोलणीं होऊन कोणे गोष्टीचा किलाफ राहिला नाहीं. श्रीमंत त्यांजकडे मेजवानीस गेले. उद्यां रुकुद्दौलाचे घरीं जाणार. नंतर दर मजल टोक्यावरून गंगापुरास मातुश्रीकडे जाणार. " §

तहाची वाटाघाट ब्रह्मेश्वर मुक्कामाहून चालू होऊन ता० २३ मार्च स. १७६९ रोजीं उभयपक्षीं करार कायम झाला. ब्रह्मेश्वरचें स्थळ गोदावरी व मांजरा यांच्या संगमावर दक्षिणेस असून पलीकडे उत्तर कांठीं कनकापुर आहे, म्हणून पेशवा जानोजीचा हा तह या दोनही नांवांनीं ओळखिला जातो. त्याचीं १९ कलमें दाखल असून तीं सवालजबाबाच्या स्वरूपाचीं आहेत. त्यांचा इत्यर्थ असा कीं भोसल्यानें स्वतंत्र वागूं नये. पेशव्याच्या आज्ञेंत चालावें, फौज वाढवूं नये. पांच हजार फौज घेऊन सरकार चाकरीस यावें. पूर्वीं दिलेला पंधरा लक्षांचा मुलूख परत द्यावा. दरसाल पांच लक्ष रुपये पेशव्यास खंडणी द्यावी. पेशव्यानें अडीअडचणीस भोसल्याचें साह्य करून सांभाळ करावा. भोसल्यानें बाहेर राजकारण राखूं नये. बदमामली करूं नये. पातशहा, इंग्रज, नजीबखान शुजाउद्दौला यांजकडे परभारें संधान ठेवूं नये. इंग्रज व निमाम यांजकडे वकील ठेवणें ते पेशव्याकडील वकिलाचे मार्फतीनें ठेवावे. त्यांनीं फक्त मामलती-संबंधीं बोलावें, वरकड राजकारण राखूं नये. अशा रीतीनें भोसल्याशीं चार महिने युद्ध करून त्यास पेशव्यानें मराठी राज्याच्या उद्योगांत सामील करून घेतलें. † एकटा भोसलेच या अनुभवानें शहाणपण शिकला असें नसून

‡ पे. द. २०. २५७, २५८, २६३, २६४, २६८, २७०; ऐ. प. ११६. या सर्व कागदांत पेशव्याचें उदात्त धोरण व्यक्त होतें.

§ पे. द. २०. २६७, २७४, २७८ इ० † ऐ. प. ११७ — ११९.

पर्यायानें इतर मराठा सरदारांस आपापल्या कर्तव्याची जाणीव पेशव्यानें या व्यवहारांत उत्पन्न करून दिली आणि सर्वांनीं राज्यसंरक्षणाची जबाबदारी घ्यावी हा मुख्य परिणाम या युद्धानें घडवून आणला, तेणेंकरून शत्रु–मित्रांवर पेशव्याची जरब बसून देशांत मराठ्यांची सत्ता सार्वभौम बनली. पश्चात् ही व्यवस्था मोडली, त्याचा दोष माधवरावाकडे नाहीं.

देवाजीपंतास जरब दाखवून त्याचा उपयोग पेशव्यानें कसा करून घेतला हेंही वरील प्रकरणांत चांगलें नजरेस येतें. जानोजीच्या भेटींत पेशव्यानें मुद्दाम त्यास कानमंत्र शिकविला कीं हा मनुष्य तुमचे आमचे जावसालांत नसावा, नाश करील, सबब आम्ही त्यास समागमें नेऊन पारिपत्य करतों." जानोजीनें कळविलें, "आमचा ताबेदार बरा अथवा वाईट, त्यास आम्हीच शासन करूं." अशी हमी देऊन जानोजीनें पंतास सोडवून आणिलें आणि त्यास दंड करून कैदेंत ठेविलें. पुढें जानोजीनें आपल्या कारभारावर भवानी काळो याची नेमणूक केली. देवाजीपंत दूर झाल्यामुळें जानोजी व मुधोजी यांचा प्रेमभाव जमून आला. खरोखर देवाजीपंताचें बुद्धिबल कसें अप्रतिम होतें हें वरील स्वारींत पेशव्याच्या निदर्शनास चांगलें आलें. या बुद्धीचा उपयोग त्यानें राज्यवृद्धीकडे न करतां उलट केला म्हणून त्याजवर पेशव्याचा राग. नारायणरावाचे वधानंतर भोसल्यांचें साह्य इंग्रजांस मिळवून देण्यांत हा देवाजीपंतच अग्रगण्य होता हें पुढील इतिहासांत दिसून येईल.

कनकापुरच्या तहानंतर जानोजी व पेशवा यांचें रहस्य बरेंच टिकलें. पेशव्याशीं लढण्यांत इंग्रजांनीं आपणास मदत केली नाहीं याबद्दल त्यांस जानोजीनें प्रसंगानुसार चिमटे घेतले. † सन १७७० च्या हैदरावरील स्वारींत जानोजीनें आपली फौज कर्नाटकांत पेशव्याचे साह्यास पाठविली. त्या सालच्या नोव्हेंबरांत जानोजी पेशव्याचे भेटीस येऊन दोन महिने त्याजवळ राहिला. या भेटींत त्यानें भावाचा पुत्र रघूजी यास दत्तक घेऊन नागपुरची पुढील व्यवस्था कशी करावयाची ती पेशव्याशीं बोलून ठेविली. सन १७७२ च्या एप्रिलांत कारभारी भवानी काळो ह्यास घेऊन जानोजी नागपुरहून पुनः पेशव्याच्या भेटीस आला. थेऊर येथें उभयतांच्या भेटी प्रेमपूर्वक होऊन पेशव्यानें जानोजीस मोत्याचा तुरा शिरस्त्या-

† प. कॅ. ३. ४५, २०३, ४६७, ४६८.

बाहेर दिला. भेट संपल्यावर जानोजी पंढरपुरास जाऊन तेथून तुळजापुरास गेल्यावर त्याची प्रकृति एकाएकीं बिघडली. कठिण अवस्था झाली. मुधोजीबावांस जवळ बोलावून आपलें कपाळ त्यांचे कपाळास घासलें आणि बोलले, "तुम्हीं भारी पराक्रमी व शहाणे होतां, पण प्रारब्ध आमचें होतें. तें आतां तुमचे कपाळास घासतों." सर्वांचा निरोप घेऊन भगवत्स्मरण करून वैशाख शु० १५ स (दि. १६ मे स. १७७२) कैलासवासीं शांत झाले. नाटकशाळा सती गेल्या. असें हें जानोजी भोसल्याचें आख्यान माधवराव पेशव्याच्या कर्तबगारीची साक्ष पुरवितें.



## ६. कालसूची – माधवराव व राज्यकारभार

| | | |
|---|---|---|
| स. १६९१ | सेप्टेंबर १० | पुरंदरचे कोळ्यांस राजारामाची सनद. |
| स. १७५२ | | पुरंदर किल्ला महादोबा पुरंदरे यास दिला. |
| स. १७६१ | पावसाळा | मुंबईकर व पेशवे यांची स्नेहकराराची वाटाघाट. |
| ,, | डिसेंबर | सदाशिवरावभाऊचा तोतयाउद्भव; बंडावा ४ वर्षें. |
| स. १७६२ | सेप्टें० २७ | कोल्हापुरकर शिवाजीचें राज्यारोहण. |
| ,, | ऑक्टो० ९ | बाळाजी गोविंद बुंदेले पुण्यांत. |
| ,, | नोव्हें० | पुरंदर किल्ला नीलकंठ आबाचे ताब्यांत दिला. |
| स. १७६३ | | आबा पुरंदरे याचा कोळ्यांशीं बेबनाव. |
| ,, | जाने० | महादजी सिंदे मिरजेच्या संग्रामांत हजर. |
| ,, | सेप्टेंबर | ,, ,, पेशव्याचे मदतीस व भेट. |
| ,, | ,, ११ | भवानराव प्रतिनिधीस वस्त्रें. |
| ,, | नोव्हें० ११ | महादजी सिंदे व जनकोजीचा तोतया. |
| ,, | ,, २३ | ,, ची दिवाणगिरी अच्युतराव गणेशास. |
| स. १७६४ | | गमाजी यमाजीचा मृत्यु; पश्चात् यमाजीचा मृ०. |
| ,, | फेब्रु० | मोरोविठ्ठलची सिंद्याचे फडणिसीवर नेमणूक. |
| ,, | मे ७ | पुरंदर कोळ्यांचा दंगा. |
| ,, | मे २० | पेशव्याचें अंग दंग्यांत नाहीं असा निषेध. |
| ,, | जून २ | महादजी सिंदे आज्ञाभंग करून उज्जनीस गेला. |
| ,, | ऑगस्ट १२ | तोतयाची तपासणी मल्हारराव होळकराकडून. |
| ,, | ऑक्टो० २५ | महादजीचा बेबनाव सखूबाईशीं; दौलतीवर नेमणूक मानाजीची, कारभारी महादाजी गोविंद काकिर्डे. |
| स. १७६५ | जाने० १२ | वासुदेव अनंत प्रतिनिधीचा मुतालिक. प्रतिनिधिबंधूंचा संग्राम. |
| ,, | ,, २७ | इंग्रजांनीं कोल्हापुरकरांचा मालवण किल्ला घेतला. |
| ,, | मार्च | तोतयास पकडला. |
| ,, | मे १२ | हरिदामोदर मृत्यु तोतयाचे संग्रामांत. |
| ,, | जुलई | महादाजी गोविंद काकिर्डे याचा दंगलींत मृत्यु. |

| | | |
|---|---|---|
| स. १७६५ ऑगस्ट १२ | | पासून ऑक्टो० १५, तोतयाचा तपास पर्वतीवर, कैदेची शिक्षा. |
| ,, | डिसें० २ | आबापुरंदरे मृत्यु. |
| स. १७६६ | | भवानराव व भगवंतराव यांची समजूत. |
| ,, | मार्च ९ | बाबूजीनायकाचा बंडावा सोलापुरासंबंधीं ; फितूर, संग्राम व निकाल. |
| स. १७६७ | उन्हाळा | दादाच्या कारवाया सरदारांत फूट पाडण्याच्या. |
| ,, | | सातारा किल्ल्यावर रामराजाच्या इमारती दुरुस्त. |
| ,, | नोव्हें० ३० | इंग्रज वकील मॉस्टिन पुण्यांत. |
| ,, | डिसें० १९ | ,, ,, ब्रोमची दादाशीं भेट. |
| स. १७६८ | जाने० ५ | महादजीस पेशव्याकडून दौलतीचीं वस्त्रें. |
| ,, | फेब्रु० २७ | मॉस्टिन पुणें सोडून परत ; ब्रोम पुण्यांत. |
| ,, | जून १० | दादाचा पाडाव धोडप येथें ; केदारजी सिंदे व साथीदारांस शिक्षा. |
| ,, | ऑगस्ट १८ | दमाजी गायकवाड मृत्यु. |
| ,, | डिसें० २१ | दमाजीच्या पुत्रांची व्यवस्था पेशव्याकडून. |
| ,, | अखेर | दिवाकर पंडितास अटक. |
| स. १७६९ | एप्रि० २ | हैदर-इंग्रज तह. |
| ,, | पावसाळा | निजामाचा भाऊ व दिवाण पुण्यास. |
| स. १७७२ | फेब्रु० ९ | मॉस्टिन पुण्यांत दाखल. |
| ,, | ऑक्टो० | मॉस्टिन पुण्यास राहण्याची पेशव्याची मंजुरी. |
| स. १७७३ | फेब्रु० १७ | कोल्हापुरकर जिजाबाईचा मृत्यु. |
| ,, | डिसें० ४ | यशवंतराव पवाराचा तोतया, तपास व शिक्षा. |
| स. १७७६ | डिसें० १८ | सदाशिवरावभाऊच्या तोतयास मृत्यूची शिक्षा. |
| स. १७८१ | नोव्हें० | दिवाकर पंडित मृ०. |

- ६ -

# माधवराव व राज्यकारभार

१. उदयेच्छु महादजी सिंदे. २. दमाजी गायकवाडाचा मृत्यु.
३. दोन नामधारी छत्रपति. ४. प्रतिनिधींशीं तेढ.
५. बाबूजी नायकाचा बंडावा. ६. पुरंदर गडकऱ्यांचा दंगा.
७. तोतयांचा उद्भव. ८. पहिला इंग्रज वकील.
९. साडेतीन शहाणे.

**दिग्दर्शन**—राज्याला एकमुखी सत्ता आणणें हें चालकाचें आद्य कर्तव्य होय. आरंभींच माधवरावाला आपली हुकमत बसविण्यासाठीं चुलत्याशीं कलह करावा लागला. अशाच प्रकारचा कलह त्याला पुढें नागपुरकर भोसल्यांशीं करावा लागला, तें एका स्वतंत्र प्रकरणांत सांगण्यांत आलें आहे. सिंदे, होळकर, गायकवाड इत्यादींच्या कुटुंबांत नवीन वारस नेमतांना कलह उद्भवले. पैकीं दादासाहेबानें अहल्याबाईशीं तंटा केला त्याचें वर्णन पूर्वी झालें आहे. अशींच आणखी प्रकरणें माधवरावाच्या कारभारांत गाजलीं. पुरंदर किल्ल्यावरील कोळ्यांचें प्रकरणही असेंच अल्पकाळ घुमलें. असे हे सर्व विस्कळित विषय राज्यकारभार नांवाच्या प्रकरणांत एकत्र सांगावयाचे आहेत. प्रथम महादजी सिंद्याची हवाल काय होती तें सांगूं. त्याच्या भावी उद्योगाला ती अनुरूप व स्वतंत्र सांगण्यासारखी आहे.

**१. उदयेच्छु महादजी सिंदे**—महादजीचा जन्मकाळ निश्चित नाहीं. अहल्याबाई एका प्रसंगानें म्हणाली पाटीलबावांचें व आमचें वय सारखें. अहल्याबाईचा जन्म स. १७२७ चा आहे, तोच महादजीचाही होय असें मानण्यास हरकत नाहीं. राणोजीचे पुत्र पांच, निंबाबाईच्या पोटचे चार जयाप्पा, ज्योतिबा, दत्ताजी व तुकोजी, आणि खांडाराणी चिमाबाई इचा एक महादजी. पैकीं चार राष्ट्रकाजांत गारद झाले. फक्त महादजी पानिपतचे रणभूमीवर घायाळ होऊन विव्हळत असतां, पेशव्यांचा भिस्ती राणे खान यानें त्यास वांचविलें, पण तो कायमचा लंगडा बनला. पानिपतपूर्वकालीं वडील बंधूंबरोबर महादजीही निरनिराळ्या कामांत वावरत होता, तरी त्याच्या नांवाचा

स्वतंत्र उल्लेख कागदोपत्रीं आढळत नाहीं. महादजी व नाना फडणीस या दोन व्यक्ति पानिपतच्या संहारांतून परमेश्वरी योजनेनें बचावल्या, त्याच पुढें राज्याचें संगोपन करण्यास समर्थ झाल्या. दोनही पुरुष राक्षसभुवनचे प्रसंगापर्यंत बहुधा अज्ञात होते. माधवराव पेशव्याचें आसन त्या लढाईनें स्थिर होतांच नानास फडणिशी व महादजीस त्याची सरदारी प्राप्त झाली. मात्र त्या बाबतींत महादजीला पुष्कळ गोते खावे लागले. राणोजीच्या पुत्रांनीं राष्ट्रसेवेंत प्राणत्याग केले हा प्रकार माधवराव जाणून होता आणि महादजीलाच एकदम दौलतीवर नेमावें अशी त्याची उत्कंठा होती. पण याच कारणास्तव महादजीवर दादाची गैरमर्जी झाली. दादाला पेशवाईपद मिळवायचें असल्यामुळें आपल्यास अनुकूल होतील असेच इसम त्यानें आपल्या हाताशीं धरले. महादजीला पेशव्यांचे गृहकलहांत भाग घेण्याची बिलकूल इच्छा नव्हती. दोघेही धनी, दोघांचीही सेवा होईल ती करावी, एकाचाच पक्ष स्वीकारूं नये हें त्याचें मुख्य धोरण होतें. शिवाय सरदारीवर नवीन इसम नेमतांना भला मोठा नजराणा घेण्याचा रिवाज त्या वेळीं जारी होता. त्याच्या नेमणुकीबरोबरच त्यास कारभारी नेमून द्यावयाचा त्यासंबंधींही निरनिराळ्या मंडळीची चढाओढ चाले. महादजी स्वतः सर्वथा निष्कांचन होता. कुटुंबांत त्याचा जम बसला नव्हता. तशी अंगची लायकीही प्रगट झालेली नव्हती. कर्ज देणारा सावकार कोणी उभा राहीना कीं जिव्हाळ्याचा सहायकही कोणी मिळेना. दादाचे मनांत नजराण्याचा पैसा उकळण्याचा डाव असल्यामुळें त्यानें महादजीचा पुरस्कार न करतां दुसरे हक्कदार उभे केले. या कारणांमुळें महादजीची परिस्थीति कैक वर्षें अत्यंत बिकट झाली. घोडपच्या संग्रामांत दादा कैदेंत पडला तेव्हांच महादजीही आपल्या सरदारींत स्वतंत्र बनला. पहिलीं सात वर्षें त्याचीं अज्ञातवासांत गेलीं.

कौटुंबिक अडचणीही महादजीला आरंभीं जाचक झाल्या. कर्ते पुरुष गेले, पण त्या सर्वांच्या बायका मागें हयात असून त्यांचे खर्च चालविणें कठिण झालें. राणोजीची वडील बायको मैनाबाई ऊर्फ निंबाबाई, दुसरी खांडाराणी चिमाबाई महादजीची आई, जयाप्पाची बायको सखूबाई, दत्ताजीची भागीरथी-बाई, जोत्याजीची सगुणाबाई या सर्व आपआपल्या परी मोठेपणा मिरविण्याची हौस बाळगून खर्च करीत, त्यांचें नियंत्रण करणारा कैक वर्षें एकच मालक असा कोणी नव्हता. त्यांतही महादजी खांडाराणीच्या पोटचा ही सबब त्यास दूर ठेवण्याची दादाला सहज मिळाली. खांडाराणी म्हणजे तलवारीबरोबर

विवाह लागलेली बायको. या कारणास्तव समाज महादजीला दासीपुत्र समजे. अस्सल मराठ्यांशीं संबंध जोडून आपलें हें वैगुण्य दूर करावें असे प्रयत्न महादजीचे जन्मभर चालू होते. जून स. १७६१ त नानासाहेब पेशवा मरण पावला. पुढें सहा वर्षांनीं म्हणजे जून स. १७६८ त घोडपच्या संग्रामांतील महादजीची करामत पेशव्याचे नजरेंत भरून त्यानें लगेच त्यास उत्तर हिंदच्या बादशाही कामगिरीवर रवाना केलें. या सात वर्षांच्या कालावधींत महादजीला काय कष्ट करावे लागले ते बरेच अज्ञात असून उपलब्ध साधनांवरून प्रथम त्यांची संगति सांगणें अवश्य आहे. कोटा दप्तरांत नवीन माहिती आहे.

राणोजीच्या कुटुंबांत या वेळीं फक्त दोन पुरुष हयात होते एक महादजी व दुसरा तुकोजीचा पुत्र केदारजी. केदारजीच्या बायकोचें नांव तुळजाबाई. सिंद्यांचे दौलतीस कायदेशीर वारस हे दोघेच असून त्यांचें आपसांत बहुधा संगनमत होतें. दासीपुत्र म्हणून महादजीचा पुरस्कार दादानें कधीं केला नाहीं. त्याला दूर ठेवण्यासाठीं दादानें प्रथम केदारजीला हातीं धरलें. पण केदारजीही दादाला अनुकूल पडेना, तेव्हां त्यानें तिसराच एक इसम मानाजी सिंदे यास पुढें आणिलें. हा मानाजी साबाजीचा नातू. § साबाजी सिंदे राणोजीचा नजीकचा आप्त, यानेंच मराठ्यांचे झेंडे अटकेवर नेले. मानाजी पराक्रमी असून तो नाना फडणिसास विरोध करून दादाचे पक्षास अनुकूल असे. उत्तर मराटशाहींत तो फाकडे ह्या नांवानें प्रसिद्धि पावला. स. १७६३ च्या उन्हाळ्यांत भोसले निजामांनीं महाराष्ट्रांत दंगल माजविली तींत हा मानाजी व त्याचा आजा साबाजी दोघेही पेशव्याचे विरुद्ध वागले. अर्थात् महादजीचा जम बसलेला नसल्यामुळें त्याच्या कुटुंबांतील बायांची देखील आबाळ व अन्नान्नदशा झाली. दौलतीचा मालक कायम नाहीं, तेव्हां या बायांचा परामर्ष घेणार तरी कोण ! महादजीची मातुश्री चिमाबाई इची सुद्धां कैक वर्षें अत्यंत अपेष्टा होती अशीं त्या वेळचीं पत्रें आहेत. ता. ८ जुलई स. १७६७ च्या पत्रांत महादजी लिहितो, " मातुश्रीबाईचीं पत्रें देशीहून आलीं कीं घरीं पंचवीस हजार रुपये कर्ज काढून भक्षिले, त्यांस राहावयास जागा नाहीं. कर्जदार निकड करीत आहेत. " म्हणजे पानिपत होऊन सहा वर्षें गेलीं तरी महादजी पेशव्यांच्या कारभाऱ्यांकडे गयावया करीत होता, हें सिद्ध आहे. *

§ मा. रो. १. ३५९ * रा, खं. १२. ७२ ; १३. ३९ व ३९ अ ; पे. द. २०. १४३.

सिंद्यांच्या दौलतीचीं सूत्रें खेळविणारे दादा व माधवराव यांव्यतिरिक्त आणखी पुष्कळच व्यक्ति आपापल्या मतलबास्तव पुढें आल्या होत्या. नारो शंकर, चिंतो विठ्ठल, गंगाधर तात्या हीं धेंडें दादाकडे खटपटी चालवून सिंद्यांचा कारभार हातीं घेण्यास टपलीं होतीं. त्या प्रत्येकाचे आणखी हस्तक होते ते वेगळेच. ज्याची नेमणूक दौलतीवर व्हावयाची त्याजकडून भला मोठा नजराणा हबकावयाचा, प्रत्येकानें त्यांत आपला लाग साधून घ्यावयाचा, हाच चालकांचा मुख्य खेळ बनला. दौलतीच्या कल्याणाची पर्वा कोणासच नाहीं; अशा भीषण स्थितींत महादजीचीं सात वर्षें गेलीं. आपला सहायक कोण व द्वेष्टा कोण हेंच त्याला कळेना. कारभारी, मुतालिक, दिवाण, फडणीस इत्यादि नेमणुका करतांना जो तो आपल्या हस्तकाची वर्णी लावूं लागला. महादाजी गोविंद काकिर्डे, अच्युतराव गणेश, चिंतो विठ्ठलचा भाऊ मोरो विठ्ठल, राघो राम पागे, राघो मल्हार, बाजी नरसिंह, गणोजी कदम अशीं किती तरी नांवें त्या वेळच्या महादजीच्या व्यवहारांत येतात, त्यांची बरोबर संगति लावणें आणि त्यावरून महादजीच्या पहिल्या हालचाली ठरविणें हें काम बिकट होतें. स. १७६६ त तर पुष्कळ दिवस महादजीबद्दल त्याच्या नातेवाइकांस मोठी चिंता लागलेली होती. * त्याचें लक्ष सदैव आपली पिढीजाद सरदारी सुधारण्यांत खिळलेलें असून पेशव्याच्या गृहकलहांत त्याचा ओढा पक्षातीत होता. प्रसंग येईल तसा तो आपलें कर्तव्य करी. पुढें अनुभवानें दादाच्या हीन वृत्तीची त्याला पारख झाली.

पानिपत संग्रामानंतर पहिले चार सहा महिने तो आजारीच होता. हिंडूं-फिरूं लागल्यावर लगेच त्यानें होळकरांशीं संगनमत करून राजपुतान्यांत व बुंदेलखंडांत मराठी सत्ता टिकविली. स. १७६२ चे पावसाळ्यांत पुण्यास माधवराव व दादा यांचा कलह लागला तेव्हां सिंदे-होळकरांस त्यांनीं पुण्यास बोलाविलें. त्यावरून केदारजीसह महादजी दक्षिणेंत आला. ता० ९ ऑक्टोबर स. १७६२ च्या पत्रांत बाळाजी गोविंद पुण्याहून उत्तरेंत लालाजी बल्लाळास लिहितो, "महादजी बावा थोरल्या श्रीमंतांची आज्ञा घेऊन मजल दर मजल उज्जनीस येतात." § म्हणजे महादजी व बाळाजी गोविंद बुंदेले दोघेही त्या सालीं पुण्यास आले होते हें सिद्ध आहे. स. १७६३ च्या जानेवारींत उभय सिंदे मिरजेवर होते. यानंतर ते लगेच उत्तरेंत गेले.

* पेठे.द. १. ४३. § को. द. अप्रकाशित; रा. खं. १३-१.

त्या सालच्या उन्हाळ्यांत जानोजी व निजाम पुण्यावर चढाई करून आले, तेव्हां महादजी उज्जनीस होता, त्यास माधवरावानें आज्ञा केली, तुम्ही तावडतोब दक्षिणेंत येऊन भोसल्याचा वऱ्हाड प्रांत काबीज करावा. तदनुसार महादजी फौजेसह चालून येतो या बातमीनेंच जानोजी भोसले निजामाचा पक्ष सोडून पेशव्याकडे आला, आणि पेशव्याला महादजीच्या साह्याची अपेक्षा उरली नाहीं. मात्र महादजीच्या येण्यानें दादा अस्वस्थ झाला, कीं पुतण्याशीं महादजीचें संगनमत बनलें. निजामाचा तह उरकून पेशवा गोदावरीवर परत आला तेव्हां महादजीनें टोकें येथें येऊन त्याची भेट घेतली. महादजीची फौज चांगली तयारींत पाहून पेशव्यास संतोष झाला. नंतर दोघे बरोबरच पुण्यास आले. पेशव्याचा निरोप घेऊन महादजी श्रीगोंद्यास गेला. *

स. १७६३ तच जनकोजी सिंदे नांवाचा इसम करकुंब येथें प्रगट होऊन त्यानें दोन हजार फौज जमा केली. मोठा भ्रम लोकांस उत्पन्न झाला. जनकोजी प्रमाणेंच त्याच्या खाणाखुणा पटल्या. गोपिकाबाईनें विश्वासु माणसें पाठवून तपास केला. भापकर, गराडे, सरलष्कर, गाढवे, जाधव इत्यादि सिंद्यांच्या माणसांनीं त्यास ओळखून एकताटीं भोजन केलें. संगमाजवळ आणोन उतरविला. "दुसऱ्या दिवशीं २ नोव्हेंबर रोजीं पेशव्याची स्वारी मुहूर्तानें पुण्यांत दाखल झाली. संध्याकाळीं तोतयास आणून नानांच्या दिवाणखान्यांत बसविला. नाना पुरंदरे व गोविंद शिवराम यांनीं तपास करून हा रघूजी थोरात असा निर्णय दिला. कैद करून ठेविला. साथीदार सांपडले त्यांसही अटकेंत ठेविलें. सखारामबापूचे चुलत बंधु गिरमाजीपंत तोतयाजवळ कारभार करीत होते, त्यावरून यास सखाराम बापूनेंच उभा केला असा संशय माधवरावास तर आलाच, पण तूर्त सिंद्यांचे कुटुंबांत मोठी गडबड उडाली. रघूजी थोराताची बायको, भाऊ व माय अशा सर्वांस आणिलें. त्यांनीं त्यास ओळखलें. बायकोनें व सर्वांनीं हा रघूजी थोरात, जनकोजी नव्हे, असें सर्वतोमुखीं खरें करून श्रीमंतांनीं त्याजला सजा पोहोंचविली. दोनही कान बेनासिक समग्र घेतलें. व्यंग करून सोडून दिला. दुसरे दिवशीं विहिरींत उडी घेऊन मृत्यु पावला. श्रीमंतांनीं दहनास आज्ञा दिली." §

---

* ख. ३२५, ३७०, ३७३, ३७९, ३८८; फाळके ३·४१५.

§ पे. द. १९·३३; ख. ३८१, ३८२.

या वेळीं पेशव्याचे मार्फतीनें दौलतीचा ताबा आपल्या नांवें करून घ्यावा अशी खटपट महादजीनें फार केली. पण दादानें महादजीला बाजूस टेवून केदारजीच्या नांवें सनदा करून आठ लाख नजराणा घेण्याचा ठराव केला. अच्युतराव गणेश म्हणून नारो शंकराचा नातेवाईक होता त्यास सिंद्याची दिवाणगिरी दिली, ( ता० २३ नोव्हेंबर स. १७६३ ). दादाची ही व्यवस्था माधवरावानें मान्य न करतां दुसरी सनद त्यानें महादजीच्या नांवाची स्वतंत्र करून दिली ती पुढें पाऊण महिन्याची १५ डिसेंबरची आहे. पण हा द्वैती कारभार टिकला नाहीं. अच्युतराव व बाजी नरसिंह या दोन विरोधी कारभाऱ्यांचें पटेना. †

पेशव्यांच्या घरांतील कलहाची झळ सिंद्यांस बाधूं लागली, त्यामुळें गोंधळ माजला. त्या वेळीं चिंतोविठ्ठलाचें प्रस्थ मोठें असून त्याच्याशिवाय राजकारणाचें पान हालत नसे. त्याच्याच तंत्रानें महादजी वागत गेला. जवळ पैसा नाहीं आणि हातांत मालकी नाहीं, तर त्याचा निभाव कसा लागावा ! स. १७६४ चे आरंभीं माधवराव कर्नाटकचे स्वारीस गेला आणि दादानें सिंद्याची फडणिसी चिंतो विठ्ठलाचा भाऊ मोरो विठ्ठल यास दिली. गंगाधर यशवंत चंद्रचूड दादास लिहितो, " महादजी सिंदे यांस हुजूर यावयाकरितां पत्रें पाठविलीं, परंतु त्यांचा यावयाचा प्रकार न दिसे. तितक्यांत सखूबाई हुजूर आली, तों महादजीही येऊन भेटले. त्यांजला आज्ञा केली कीं सखूबाईची कृपा संपादून घेणें. हें महादजीला अनुकूल न पडे, तेव्हां सखूबाईचे मर्जीस्तव मानाजी सिंदे यांस सरदारीचीं वस्त्रें देऊन महादाजी गोविंद ( काकिर्डे ) कारभारी करून दिले. महादजीस चार हजारांची सरदारी देत होतों ते अमान्य करून उठोन आले, ( ता. २५ ऑक्टो० १७६४ )." हा सर्व कारभार दादानें गंगाधर यशवंताचे आग्रहास्तव केला. महादजीचा कलह सखूबाईशीं उद्भवला. *

" दासीचें दास्यत्व करावें लागतें " असें वाक्य सखूबाईचे पत्रांत आहे. याचा अर्थ असा कीं महादजीची मातुश्री चिमाबाई इची सेवा सखूबाईस मान्य नव्हती. " चार महिने येथें ( श्रीगोंद्यांत ) बसले आहेत. त्यांच्या जाचणुकेपासून आम्हांस सोडवावें " अशी करुणा सखूबाईनें दादाकडे भाकली. महादजीच्या जन्मकथेचा वर्मी घाव बसला. दादानें त्याचा छळ आरंभिला.

† मा. रो. १५९, १६० ; इ. सं. पे. द. ले. ४६, पृ. १९६ ; पे. द. २९·७८.

* पे. द. २९·४८, ५३, ६५, ९२ ; रा. खं. १४·७१ ; मा. रो. १६३ ; पे. द. २०·१४३.

मानाजी सिंद्याची नेमणूक सरदारीवर झाल्यामुळें महादजी संतापून दादाची आज्ञा न घेतां स. १७६४ च्या जून महिन्यांत माळव्यांत चालता झाला. त्यास पकडून पारिपत्य करावें अशा आज्ञा दादानें अशीरगडच्या व इतर किल्लेदारांस सोडल्या. "रात्रीचा दिवस करून फौज सुद्धां जातीनसी जाऊन पोहोंचणें. साहेबनक्ष करणें. होळकरांच्या सरदारांसही आज्ञापत्रें गेलीं आहेत. त्यांस तापीपार होऊं देऊं नये. एक घटकेची सुस्ती न करणें." अशा निकडीच्या आज्ञा दादानें चहूंकडे सोडल्या. पण या सर्वांस न जुमानतां महादजी थेट उज्जनीस जाऊन पोंचला. २ जून स. १७६४ चें त्याचें पत्र कोटा दप्तरांत आहे, त्यांत तो आजारी असल्याचें सांगतो. जातांक्षणीं त्यानें उत्तरेंतील आपलें मुलूखगिरीचें काम चालू केलें. द्रव्यार्जनासाठीं तो खंडण्या वसूल करूं लागला. इतउत्तरची त्याची संपूर्ण इभ्रत स्वकष्टार्जित आहे. दादाला मात्र जाग्यावरून कागदी हुकूम सोडण्यापलीकडे दुसरें कांहीं करतां आलें नाहीं. पुढें स. १७६६ त दादा उत्तरस्वारीस गेला तेव्हां मागचें सर्व विसरून महादजी दादाचे आज्ञेंत तत्पर राहिला. * दरम्यान त्यानें मुख्यतः आपली स्वतःची भरंवशाची फौज व अनेक कर्तव्यनिष्ठ हस्तक तयार केले. महाराष्ट्रांतून फौजेंत नवीन भरती करण्याचा त्याचा उद्योग सतत चाललेला दिसतो. बाजी नरसिंह, गणोजी कदम, अच्युतराव गणेश हे महादजीच्या कारभारांत अव्वलपासून दिसतात. खानाजी जाधव हा दुसरा एक महादजीचा सरदार खंडण्या वगैरे वसूल करण्याचे कामीं महादजीशीं निष्ठेनें वागत होता. दादाच्या उत्तर हिंदचे स्वारींत सिंदे–होळकर दोघेही एकविचारानें कामें उरकीत होते. स. १७६७ त दादाचा व अहल्याबाईचा खटका उडाला त्या वेळची महादजीची व्यवस्था दादानें ठरविलेली नजरेस येते. "बाजी नरसिंहाकडून पत्रें आलीं त्यांत मजकूर कीं दादासाहेबांनीं तुकोजीचे पुत्र केदारजी यासी सरदारीचीं वस्त्रें दिलीं, दिवाण अच्युतराव गणेश, मुज्मु विष्णु महादेव आणि कारभारी गणोजी कदम ऐसें ठरून जुनें मंडळ महादजीबावा सुद्धां राहिलें." (ता० ७ जून १७६७). § याचा निष्कर्ष इतकाच कीं महादजीचा पुरस्कार दादानें पुष्कळ दिवस केला नाहीं. नेमणुकांचे हे बदल केव्हां कोणाकडून होत गेले हें संगतवार जुळविणें अवघड आहे. मात्र त्याकाळीं महादजीची दशा अत्यंत कष्टमय होती. तो स्वप्रयत्नानेंच निभावला.

---

* पे. द. २९·१४६. § पे. द. २९·१८२.

केदारजी व महादजी यांजमध्यें फूट पाडून महादजीला हलकें बनविण्याचा उद्योगही दादानें करून पाहिला. होळकरांच्या बरोबरीनें सिंद्यांना उत्तरेंत वावरूं न देतां त्यांस दक्षिणेंत अडकवून ठेवावें असाही दादाचा डाव होता. ता० ४ ऑगस्ट स. १७६४ रोजीं केदारजी दादास लिहितो, "हुजूर दर्शनास येणें, हुजूर आलियावरी जो बंदोबस्त करणें तो केला जाईल, म्हणून आज्ञा लिहिली, ऐशास स्वामीचे सेवेंत ती० नाना बावा (महादजी) आलेच आहेत. त्यांसच जे आज्ञा करणें ती केली पाहिजे. आम्ही त्यांचे आज्ञांकित असों. आज्ञेप्रमाणें सर्वही सेवा करूं. तीर्थरूपांत व सेवकांत द्वैतार्थ न जाणावा." * या वेळीं महादजी उज्जनीस होता. त्यास दादानें कळविलें, "तुम्ही हुजूर यावें, चाकरी करून दाखवावी. तुमचें सामान पाहून आणीक सरंजाम लावून दिल्हा जाईल. तिकडे गैर हुकमी राहिल्यास तुमची फजिती व सावकारांकडून घरबूड होईल. हुजूरचे मर्जीप्रमाणें वर्तणूक करणें. नाहीं तर तुमचे शासनास फौज येतच आहे. सत्वरच फळ पावाल." या धमकीस महादजीनें दाद दिली नाहीं.

महादजीचा कारभारी म्हणून दादानें नारोशंकरास नेमून दिलें होतें आणि त्याच्याच सल्ल्यानें तो अखेरपर्यंत वागला. महादाजी गोविंद काकिर्डे व मोरोविठ्ठल (चिंतो विठ्ठलाचा भाऊ) हे दोन गृहस्थ दादाच्या मर्जीतले नारोशंकरानें महादजीजवळ राहून प्रत्यक्ष काम करण्यासाठीं नेमून दिले. महादजी सन १७६४ त उज्जनीस गेला तो तिकडे आपला जम बसवूं लागला. मागें दिवाण, फडणीस, मज्मुदार अशा नेमणुका पेशव्यांनीं केल्या आणि सरदारी कायम करण्याचा नजराणा दादानें मागितला. "श्रीमंतांची मर्जी लोभावर आहे. दाहा लाख आम्ही देतों परंतु श्रीमंतांचे मर्जीस न आलें," अशा भानगडी चालल्या. मे स. १७६५ त महादाजी गोविंद सिंद्याची दिवाणगिरी करण्याच्या ईर्षेनें उज्जनीस गेला. दादाच्या पाठिंब्यावर त्यानें अरेरावी चालविली. उज्जनीजवळचे गांव मारूं लागला. "तेव्हां गावकरी अर्धरात्रीं दग्यानें जाऊन महादाजीवर पडले. त्या प्रसंगांत चार जखमा लागून काकिर्डे शांत जाले. बायकोनें सहगमन केलें," जुलई स. १७६५. या बनावानें दादा महादजीवर अत्यंत संतापला. त्याची समजूत झाली कीं माझ्या माणसास मुद्दाम महादजीनें मारिलें. त्याबद्दलचा सूड दादा महादजीवर उगवूं लागला. ह्या प्रकरणांत

* पे. द. २९·६६; पे. द. १९·९

महादजीचें अंग मुळींच नव्हतें. * पण त्यामुळें माधवरावाचाही राग महादजीवर झाला. ही एक नवीन आपत्ति महादजीला उत्पन्न झाली.

हिंदी राजकारणांतील क्रान्तीची क्लाइव्हच्या दिवाणीची ही वेळ होती. मल्हारराव इंग्रजांचा मार खाऊन परत आल्यानें मराठ्यांचा अंमल लंगडा पडला, त्या प्रसंगांत महादजीची ही दुर्दशा आणखी भर घालण्यास कारण झाली. महादजी कोट्याजवळ होता. तो तावडतोब होळकराचे बचावास धावून गेला. दरम्यान त्यानें नारोशंकराचीं आर्जवें चालविलीं. " आमचे सरदारीचें व तुमचे दिवाणगिरीचें स्वरूप राहे तें करावें, " असें तो सारखें नारोशंकरास सुचवीत होता. उलट पक्षीं महादजीकडून पैसा उपटून त्यास निर्वीर्य बनवावें असा डाव नारोशंकरचे सल्लागार खेळत होते. " आपल्या तेजापुढें ह्या शूद्राचें सामर्थ्य किती ? " असें बोलून ते त्यास चढीं लावीत. महादजी मात्र धैर्यानें आपलें काम चालवीत होता. " येथें सर्व महादजीबावांच्या जिवाचे सोबती झाले आहेत. श्रीमंतांचे पायांशीं एकनिष्ठेनें राहून वडिलांनीं स्वामिसेवेस देह अर्पण केले तीच धारणा हे धरून आहेत. " § असा सेवाक्रम महादजीनें चालविला.

अनेक कारणांनीं सिंद्यांच्या दौलतीचें प्रकरण वर्षानुवर्ष रेंगाळत गेलें. महादजी आर्जवें करून थकला. आर्जवें तरी कोणाचीं किती करावयाचीं ? कोणाचा पायपोस कोणाचे पायांत नाहीं. स. १७६६ त दादाची स्वारी उत्तर हिंदच्या कामगिरीवर दाखल झाली ; अर्थात् महादजीची सरदारी पूर्णपणें दादाच्या कक्षेंत गेली, त्यांत माधवरावाला कार्यभाग उरला नाहीं. मानाजीची नेमणूक सरदारीवर होती, पण त्याला तसा पाठिंबा कोणाचाच नव्हता. महादजी व केदारजी हळू-हळू आपली छाप बसवूं लागले. फौजेचा व सावकारांचा भरंवसा महादजीवर बसत चालला. खंडण्या वसूल करून त्यानें आपली निकड भागविली. एका कोट्याच्या खंडणीचा पत्रव्यवहार भरपूर उपलब्ध आहे, त्यावरून महादजीची कर्तबगारी व्यक्त होते. दादासाहेबानें गोहदवर चाल केली, त्या कामीं महादजीनें त्याचें साह्य मनापासून केलें. दरम्यान मल्हारराव होळकर मयत होऊन उत्तरेंतील राजकारणांत गंगाधर तात्या चंद्रचूड यास नवीन तेज चढलें. जुना अनुभवी सर्व अनुसंधानें ओळखणारा हा एकटाच पुरुष आतां दादाचा आधार व

* रा. खं. १३.१५–२० ; पे. द. २९,९६ ; ख. ५७५ . § रा. खं. १३.२२.

मुख्य हस्तक बनला. सिंदे-होळकर हे दोन औत्तरीय दौलतीचे मुख्य खांब, ते कबजांत घेऊन आपली छाप बसविण्याचा खटाटोप गंगाधर तात्यानें आरंभिला. दादाला स्वयंप्रज्ञा नव्हतीच त्यामुळें तात्याची घमेंड वाढली. या दृष्टीनें आतां नवीन रचना उत्तरेंत बनूं लागली. मालराव मेल्यानें होळकरशाही तात्याचे कबजांत आली. पण अहल्याबाई व महादजी यांचें तेज त्यासमयीं सुप्त होतें, त्याची कल्पना तात्यास आगाऊ नव्हती. ह्या उपद्व्यापी कारस्थानाची पूर्ण भरपायी माधवराव पेशव्यानें कां केली, त्याचें हें बीज लक्षांत ठेवलें पाहिजे.

दादाला गोहदेवर नामुष्की पदरांत घेऊन परत फिरणें भाग पडलें, कर्जाचे डोंगर वाढले. दक्षिणेंत जाऊन काय पराक्रम सांगावा यासंबंधीं शरम वाटून त्यानें गंगाधर तात्यास हाताशीं धरलें. त्यांत अहल्याबाईचें तेज झळकलें तें वाचक जाणतात. उज्जैनजवळ देपाळपुरास मुक्काम दादाचा होता, तेथील वर्तमान स. १७६७ ता. १२ मे चें बातमीदार लिहितो. "तुकोजी होळकरास सरदारीचीं वस्त्रें दिल्हीं. नजर पंधरा लाख घेतले. सिंद्याचे सरदारींत चिवडा फार जाला. केदारजी व महादजी यांस घरीं बसवावें, आपण कारभार करावा याप्रमाणें घरफूट करून बोलूं लागले." ता. १८ मे चें वर्तमान. "महादजी व केदारजी या उभयतांत फूट पडोन केदारजी दोन तीन हजार फौजेनशीं अच्युतराव कारभारी ह्यांसह श्रीमंत दादासाहेबांजवळ राहिले. श्रीमंतांनीं सरदारीचें कामकाज केदारजीचे निसबतीस लाविलें. बाजी नरसिंह वगैरेस अटकेंत ठेवून जेरतलब केलें. कांहीं पैसे घ्यावे हें मानस आहे." अशा अनेक भानगडी महिना दोन महिने माळव्यांत झाल्या त्यांचा विस्तार फार आहे. यावर पुनः "सिंदे मंडळीस वस्त्रें द्यावयासीं चार घटका रात्रीं आणिलें. हत्ती घोडे वस्त्रें सर्व आणविलीं. मुख्यांनीं कचेरींत येऊन द्यायचीं तों चिंतो विठ्ठलांनीं श्रीमंतांस जाऊन काय सांगितलें न कळे, प्रहर रात्र जाहल्यावरी सांगोन पाठविलें तुम्ही डेऱ्यास जावें. वस्त्रें सर्व परत पाठविलीं." ता. २१ जूनचें वर्तमान. "श्रीमंतांनीं सिंद्यांची दिवाणगिरी नारोशंकरास व मुतालकी अच्युतरावास दिली. याप्रमाणें सिंद्यांस निरोप जाला. श्रीमंत आनंदवल्लीस गेले. *"

दादा व माधवराव यांचा कलह जेव्हां पुन्हा जोरांत उसळूं लागला, त्या प्रसंगांत महादजीनें स. १७६७ ता० ८ सेप्टेंबर रोजीं चिंतोपंतास लिहिलें,

---

* पे. द. २९·१८०, १८४; पे. द. ३९·८४, ८५.

" देशीं उभयतांत विरुद्ध भाव ऐकतों, त्यास तुम्ही तेथें असतां ऐशा गोष्टी नसाव्या. घरकलह कामाचा नाहीं. दौलतीस अपाय होतो. आम्ही तिकडे येतच असों. तुमचें बोलणें जालें तें प्रमाण आहे. या सरदारींत अर्थ-ऐवज किती आहे हें सर्व तुम्हांस उमजलेंच आहे. लोकांच्या देण्यापासून मुक्त होण्याचें संकट त्यास दहा लक्ष कोठून आणावे. " यानंतर महादजीनें खुद्द पेशव्यास कळविलें, " आतां सेवेसीं येतच आहों. खावंद आज्ञा करतील तशी वर्तणूक करूं. आज्ञापत्र हुजूर यावयाशीं आलें त्यावरून सत्वर येतों. * "

दरम्यान माधवराव व दादा यांचा सभेट आनंदवल्लीस जाला तरी सिंद्यांचे सरदारीचा निकाल नव्हता. ता० ९ डिसेंबर स. १७६७ रोजीं माधवरावानें चिंतो विठ्ठलास लिहिलें, " सिंद्यांचे येण्याची मुदत होऊन गेली. ते उज्जनीस आहेत. सरकारचें काम नासतें. त्यास बाजी नरसिंह यास सिंद्यांची दिवाणगिरी देऊन सरदारीचा बंदोबस्त केला आहे. " पण हा निकाल महादाजीस बिलकूल रुचला नाहीं. त्यानें लगेच पेशव्यास लिहिलें, " लौकर येण्याविशीं पांच सात पत्रें आलीं त्यास कळेल तसा निर्गम करून बऱ्हाणपुरास दाखल जालों, तों बाजी नरसिंह व राघोराम यांनीं नजर दहा लक्ष करार करून सरदारीचीं वस्त्रें आमचे नांवची दिल्हीं. दुसरेच उभे राहून त्यांनीं हा कारभार मध्येंच केला. खावंदांनीं ही दौलत दुसऱ्याच्या जिम्मा केल्यास आमचा गुंता नाहीं. आम्ही खावंदांच्या आज्ञेप्रमाणें येत असतां हा प्रकार न घडावा. "

महादजी येण्यापूर्वींच पेशव्यानें त्याचे सरदारीचा निकाल केला. " केदारजीची सरदारी दूर केली, पांच लाख रुपये नजर करार केले आणि महादजीस सरदारीचीं वस्त्रें द्यावीं असें ठरविलें. बाजी नरसिंह यास दिवाणगिरी सांगून त्याजकडून पांच लाख रुपये करार केले. होळकर-सिंद्यांनीं एकविचारें वागावें अशी आज्ञा केली. " यानंतर लवकरच महादजी येऊन पेशव्यास भेटला. ता० १५ जानेवारी ( स. १७६८ ) रोजीं वस्त्रें जालीं. चुलत्याशीं संग्राम होणार त्यांत महादजीचें साह्य आपणांस निश्चित मिळावें अशी ही सिंद्याचे सरदारीची कायम व्यवस्था पेशव्यानें अगोदर ठरविली. या योगानें दादाला वैषम्य वाटलें. त्यानें लगेच केदारजीला आणून आपलेजवळ ठेवून घेतलें. मग तो स्वखुषीनें दादाकडे गेला कीं दादानें पकडून ठेवला हें कळण्यास मार्ग नाहीं. पुढें संग्राम

* रा० खं. १२. ४४, ४५, ४७.

झाला त्यांत महादाजीनें पेशव्याची बाजू चांगली सांभाळिली. संग्रामापूर्वी हरिपंत फडके व महादजी यांच्या भेटी होऊन लष्करी हालचाली ठरविण्यांत आल्या. § तुकोजी होळकरानें स्वतः त्यांत भाग घेतला नाहीं. गंगाधर यशवंतानें होळकरी फौजेचा पूर्ण पाठिंबा दादास दिला. धोडपेवर युद्ध होऊन दादा जीव बचावण्यासाठीं किल्ल्यावर गेला त्याजबरोबर केदारजीही पळून गेला, नंतर दादा व त्याचे साथीदार सर्व पकडले गेले. त्यांस माधवरावानें शिक्षा केल्या. सामील होते त्यांचें नांवनिशीवार पारिपत्य केलें. केदारजीस मार देऊन महादजीचे हवालीं केलें, त्याची सरदारी दूर केली; आणि महादजीस हिंदुस्थानचे कामगिरीवर रवाना केलें. यावरून केदारजीनें दादाचें साह्य केलें असें दिसतें. महादजीनें श्रीगोंद्यास जाऊन सखूबाईची समजूत काढिली. तिच्या नेमणुकीचा करार स्वहस्ताक्षरीं लिहून दिला. इत उत्तर केदारजीचा उल्लेख कागदांत आढळत नाहीं. महादजीचीं स्वहस्ताक्षरी मोडी पत्रें कोटा दप्तरांत पुष्कळ आहेत. * इत उत्तरचा महादजीचा उद्योग यथास्थलीं दाखल आहे.

**२. दमाजी गायकवाडाचा मृत्यु**—सिंदे, होळकर, गायकवाड व नागपुरकर भोसले हे चार मराठे सरदार या वेळीं राज्यांत प्रमुख होते. छत्रपतींची सत्ता पेशव्यांचे हातीं आल्यानें अशा समस्त सरदारांस आपल्या हुकमतींत वागविण्याची जरूर पडली. पैकीं सिंदे व होळकर यांचे व्यवहार आपण नुकतेच पाहिले. पूर्वी स. १७५२ त दमाजी गायकवाडास नानासाहेबानें राज्याचे शिस्तींत आणिल्यापासून त्यानें आपलें कर्तव्य यथायोग्य बजावलें. शिवाय उत्तरेस पालनपुरपासून पश्चिमेस द्वारकेपर्यंतचा सर्व काठेवाड प्रांत जिंकून मराठी सत्ता समग्र गुजरातवर भक्कम लागू केली. दादा-माधवरावाच्या गृहकलहांत त्यानें आपण होऊन फारसा भाग घेतला नाहीं. दमाजी हा दादाबरोबर अनेक स्वाऱ्यांत व कारभारांत वागलेला असल्यामुळें दादानें अमुक एक काम त्यास सांगितलें तर तें नाकबूल करणें त्याच्या जिवावर येई. दादाचा खर्च नेहमींच अवास्तव असून सत्ता गाजविण्याच्या अभिमानानें तो पुष्कळदां सरदारांकडून पैशाची मागणी करी. दमाजीकडून अशीच एक मागणी केल्याचा उल्लेख उपलब्ध आहे. † माधवरावालाही दमाजीनें विरोध

§ को. द. अप्रकाशित. * रा० खं. १३. ६०; पे. द. १९. ८९, ९२; पे. द. २९. २२८; ख. ७४९ व ७५५; त० क० पृ० १५२. † पे. द. २९-७६.

असा कधीं केला नाहीं. पेशव्याच्या कर्नाटकांतील व इतर स्वाऱ्यांत दमाजी आपलें पथक पुत्र सयाजीबरोबर पाठवीत असे. एकंदरींत तत्कालीन मराठे सरदारांत दमाजीनें आपली इभ्रत पाळून राज्याची कामगिरी जागरूकपणें केली, सिंदे-होळकरांप्रमाणें पेशव्यांशीं खटका असा कधीं येऊं दिला नाहीं. दादासाहेबाच्या स. १७६६ च्या उत्तरस्वारींत त्यानें पुत्र सयाजी व कारभारी रामचंद्र बसवंत यांस पाठविलें. त्यानंतर घोडपेवर गृहकलह उद्भवला. उभयतांकडून दमाजीस फौजेसह सामील होण्याचीं बोलावणीं गेलीं. दमाजीनें सयाजीरावास पथकासह रवाना केलें, † तो पुढील संग्रामांत दादाचे पक्षांत मिळाला. त्यावरून माधवरावाची इतराजी झाली. "गायकवाड हरवख्त दादासाहेबांस मिलाफी होतात त्यांस जरब द्यावी असा विचार केला. सयाजीरावास अटकेंत ठेवून दंडाचें बोलणें चाललें." दरम्यान दमाजीराव बडोदें येथें ता. १८ ऑगस्ट स. १७६८ रोजीं मरण पावला, तेणेंकरून दौलतीच्या वारसाचा प्रश्न उत्पन्न होऊन दोनही बाबतींचा निकाल पेशव्यानें करून दिला.

दमाजीस चार पुत्र कमी अधिक पराक्रमी होते. सयाजी, गोविंदराव, फत्तेसिंग व मानाजी ह्या सर्वांचा संबंध पुढील इतिहासांत येतो. तूर्त माधवरावानें निकाल केला त्यासही वर्ष सहा महिने लागले. ता. २१ डिसेंबर स. १७६८ रोजीं पेशव्यानें खालील खरमरित पत्र फत्तेसिंगास लिहिलें, "दमाजी गायकवाडांकडून सरकारलक्षांत अंतर पडलें, त्याच अवसरांत त्यांचा काळ जाला. तूर्त तुम्ही भावाभावांत कलह करून सरंजामांत बखेडा कराल तें कार्यास नये. हाल्लीं सरकारांतून जप्ति करावयास माणसें रवाना केलीं आहेत, तरी तुम्ही सर्व ठाणीं त्यांचे स्वाधीन करून देखत पत्र हुजूर येणें. गोविंदराव येथें आहेत. सारे बंधूंनीं येथें यावें. योग्यतेनुरूप आज्ञा केली जाईल. दौलतींत बखेडा कराल तर कार्यास येणार नाहीं. वांकडी गोष्ट कराल तर फळ समीप आहे. मुलाहिजा होणार नाहीं. सयाजीराव व तुम्ही जलद हुजूर येणें. आज्ञा अमान्य केल्यास पारिपत्य होईल." *

माधवरावानें गायकवाडांचा सर्वच सरंजाम कबजांत घेतला. राज्याचे कामास विरोध करणाऱ्या सरदारांस माधवराव किती निष्ठूरपणानें वागवीत होता, त्याचें हें स्पष्ट उदाहरण आहे. आपाजीगणेश व त्याचा पुत्र (?) चिटको आपाजी

---

† पे. द. २९.९३; पे. द. ३९ पृ. ९४. * इ. सं. पे. द. पृ. १५८.

यांस पेशव्यानें गुजरातेंत रवाना केलें. * त्याच वेळीं तो भोसल्यांवर युद्ध पुकारून नागपुरावर चालून जात होता. दादास प्रतिबंधांत ठेवतांच त्यानें सर्व सरदारांस शिस्तीचा कठोर धडा शिकविला. भीपण दंड गायकवाडाचें गळ्यांत बांधला. गायकवाड चपापून नम्र झाले म्हणून निभावले. पुढें दहा वर्षांनीं हाच फत्तेसिंग सहजासहजीं इंग्रजांस कां मिळाला, त्याची उपपत्ति या बनावावरून लागते. राज्य सुरळित चालण्यास सर्व घटकांनीं मनापासून झटलें पाहिजे, ही शिस्त माधवरावानें राज्यांत उत्पन्न केली. गायकवाडाकडून एकंदर आगळिकींचा हिशेब करून साठ लक्ष घेण्याचा ठराव माधवरावानें केला. "दमाजींनीं अन्यथा वर्तणूक केली ते तुम्हांवर नजर देऊन माफ करून दौलत बहाल केली. तुम्हांकडे अंतर पडल्यास क्षमा होणार नाहीं. सयाजी गायकवाड यांस सेनाकर्ते व गोविंदरावास वडीलपण सेनाखासखेल सांगितली. सयाजींनीं कारभार करावा, फतेसिंगांनीं त्यांच्याशीं एक विचारें चालावें," असें ठरलें ( ता. २४ डिसेंबर स. १७६८ ). तात्पुरता निकाल लागला पण त्याचें शल्य कर्जाचें ओझें मागें राहिलें, त्याचा कडेलोट पुढें गंगाधरशास्त्र्याचे खुनांत घडून आला. †

३. **दोन नामधारी छत्रपती**—दोन छत्रपतींना सांभाळून पेशव्यांना आपली हुकमत चालवावी लागे. अर्थात् त्यांत सेव्यसेवक भाव फक्त प्रदर्शनांत आणावयाचा. एका छत्रपतीचें वास्तव्य सातार्‍यास व दुसर्‍याचें कोल्हापुरास. दादा-माधवराव कलहांत रामराजाची आबाळ पुष्कळच झाली. माधवरावाचे मनांत त्याला किल्ल्याखालीं शाहूनगरांत राहूं द्यावें आणि स्वतःच्या व्यवस्थेपुरतें त्यास पूर्ण स्वातंत्र्य द्यावें असें होतें. स. १७६३ त जानोजी भोसल्याला छत्रपति करण्याचें घाटत असतां रामराजाला काय वाटत असेल तें कल्पनेनें जाणावें. पुढें सातारचा किल्ला आपल्या ताब्यांत ठेवण्याचा हट्ट स. १७६७ त रघुनाथरावानें धरला तेव्हां पर्यायानें त्याला छत्रपति आपल्या कबजांत हवा होता. तो प्रसंग संपल्यावर माधवरावानें रामराजाची व्यवस्था सढळ हातानें ठरवून दिली, त्यास कांहीं उणें पडूं दिलें नाहीं. स. १७६४ त महाराजाची स्त्री जानकीबाई मृत्यु पावली. किल्ल्यावरील वाडे व घरें मोडकळीस आलीं त्यांची दुरुस्ती पेशव्यानें स. १७६७ त करविली. कर्नाटकस्वारीस जातां येतां माधवराव सातार्‍यास जाऊन छत्रपतीची भेट घेत असे. तथापि एकंदरींत छत्रपति रामराजा पुरा दुर्दैवी बनून पेशव्याच्या ताबेदारींत वागला.

* पे. द. ३९-११९. † त. क. पृ. १६९; ख. ८२८; मा. रो.१४५.

कोल्हापुरकर छत्रपतीचा प्रकार याहून अगदीं भिन्न आहे. रामराजाइतकी पेशव्याची ताबेदारी कोल्हापुरकरांस सहन करावी लागत नव्हती. संभाजीचा मृत्यु व तदुत्तरच्या भानगडी यांचें वर्णन पूर्वी आलें आहे. स. १७६२ च्या विजयादशमीस ( २७ सेप्टेंबर ) शिवाजी पदापन्न झाला, तेव्हां जिजाबाईचें धोरण गाजलें. तिनें माधवराव पेशव्याशीं गोडीनें वागून निभाव केला. दक्षिणेस जातां येतां माधवराव तिची भेट घेत असे. सावंतवाडी, इचलकरंजी, कागल इत्यादि ठिकाणचे सत्ताधीश कोल्हापुरला उपद्रव देत त्यांचा बंदोबस्त माधवरावानें करून दिला. करवीरकर शंकराचार्यांचा व जिजाबाईचा तंटा कैक वर्षे चालला तो राजकारणापेक्षां सामाजिक महत्त्वाचा असून तत्कालीन मनोभावनांचा निदर्शक आहे. माधवरावाचे पश्चात् नारायणराव पेशवा असतां कोल्हापुरकर जिजाबाई स. १७७३ च्या १७ फेब्रुवारीस मृत्यु पावली, तेव्हांपासून कोल्हापुरच्या व्यवस्थेस निराळें वळण लागलें.

**४. प्रतिनिधीशीं तेढ** — प्रतिनिधींची उत्पत्तिच मुळीं पेशव्याला वरचढ होती. आपण पेशव्याहून श्रेष्ठ या भावनेमुळें ते सदा पेशव्यांच्या ताबेदारींत राहण्यास नाखूष असत. जगजीवन परशुराम ऊर्फ दादोबा वारल्यावर भवानरावाची नेमणूक झाली तो प्रकार पूर्वी सांगितला आहे. पेशव्यांचा एकमुखी कारभार पुण्यास चालू झाल्यावर प्रतिनिधींना स्वतःच्या जागिरीपलीकडे काम उरलें नाहीं; आणि ती जागीर टिकविण्यासाठीं देखील त्यांना पेशव्यांशीं विरोध करण्याची सोय नव्हती. पेशव्यांनीं स्वारीस बोलावल्यावर ते येत नसत किंवा संधि आली तर त्यांच्या विरुद्धही वागत. त्यांना दुखविण्याचें धाडस पेशव्यांना नव्हतें, तरी शक्य तितका त्यांचा ताठा नरम करण्याचा उद्योग पेशव्यांचा सारखा चालूच होता. पेशव्याला छत्रपतीपासून वस्त्रें घ्यावयाचीं असत तेवढ्या वेळेपुरती त्याला प्रतिनिधीची जरूर भासे. सन १७६२ त दादानें भवानरावास पुण्यास राहण्यास बोलाविलें तें त्यानें मान्य केलें नाहीं, म्हणून सातान्यास जाऊन दादानें प्रतिनिधिपद आपल्या मुलाच्या नांवें करून घेतलें; आणि नारो शंकरास त्याचा मुतालिक नेमिलें. पुढें तीन महिन्यांनीं तो मुलगा मरण पावला, तेव्हां नारो शंकरासच दादानें प्रतिनिधि नेमिलें. पद गेलें म्हणजे जागीर गेली, सत्ता गेली, हा अपमान प्रतिनिधि झाले म्हणून कसा सहन करणार ? प्रतिनिधींबरोबर त्यांचे मुतालिक यमाजी शिवदेव व त्याचा पुत्र गमाजी हे पेशव्यांवर बंड

करून उठले. जानोजीस व निजामास भेटून त्यांनीं पुण्याची वाट लाविली. † गोपाळराव पटवर्धनही त्यांस सामील झाला. राक्षसभुवनावर निजामाचा संहार होऊन माधवरावाचे हातीं सत्ता आली तेव्हां त्यानें ता० २१ सेप्टेंबर स. १७६३ रोजीं भवानरावास प्रतिनिधिपदावर स्थापून गमाजीस मुतालकी दिली, त्याचीं वस्त्रें उभयतांस दसऱ्याचे मुहूर्तावर दिलीं (ता० १६ ऑक्टो०). पटवर्धन व प्रतिनिधि या दोन घराण्यांचा प्रेमसंबंध या प्रसंगीं निर्माण झाला तो अखेरपर्यंत कायम होता. गमाजी यमाजी मुतालिक हा स. १७६४ त मरण पावला. §

भवानरावाची स्थापना करितांना पेशव्यानें त्याला आपलें पथक घेऊन स्वारींत नोकरीस बोलाविलें. पण पेशव्याचे हाताखालीं काम करणें प्रतिनिधीस अपमानकारक वाटून फौजेच्या खर्चाबद्दल दरसाल पाऊण लाख रक्कम रोख देण्याचें भवानरावानें कबूल केलें आणि पेशव्याचे आग्रहास्तव चुलत बंधु भगवंतराव यास पेशव्याबरोबर हैदरअलीच्या स्वारींत पाठविलें. मागें भवानराव व गमाजी यांनीं पेशव्यांचे मुलखांत उपद्रव चालू केला. इतक्यांत गमाजी मृत्यु पावला, तेव्हां पेशव्यानें त्याचा चुलत बंधु वासुदेव अनंत यास मुतालकीवर दाखल करून करार लिहून घेतला. " तुम्ही प्रतिनिधींचे मुतालिक. तुमचेच हातें कारभार घेऊं. फौजेनिशीं आमचे समागमें चाकरी करीत जावी. इकडील लक्ष धरून सांगितल्याप्रमाणें वर्तावें. " *

भवानराव प्रतिनिधि पेशव्याची चाकरी करण्यास कबूल नव्हता. त्यास अशा रीतीनें पेशव्यानें बाजूस सारून वासुदेव अनंतास हाताशीं धरलें. पेशवा या वेळीं कर्नाटकांत होता. परत येतांना त्यानें भवानरावास प्रतिनिधिपदावरून काढून त्याचे जागीं भगवंतरावाची नेमणूक केली आणि मुतालिक वासुदेव अनंतासह उभयतांस छत्रपतीकडून पदाचीं वस्त्रें देवविलीं. ‡ यावरून पुढें भवानराव व भगवंतराव यांचा आपसांत झगडा सुरू झाला. दोघेही शूर व फौजबंद. दोघांनाही प्रांतांतले दंगेखोर मिळाले. वाई, सातारा, कऱ्हाड, पाटण एवढा

---

† ऐ. टि. १·३२; पहा प्रतिनिधींचा इ० २ पृ. ३५८. § ख. ले. ५४० (ता. १० जून स. १७६४) यांत तो जिवंत आहे. इ. सं. पे. द. पृ. १६६ (ता. १२ जाने० १७६५) यांत तो मयत आहे. * इ. सं. पे. द. पृ. १६५. (ता. १२ जाने० १७६५) ‡ ख. ५७२.

मुलूख त्यांच्या हालचालींनीं बेजार झाला. याचा बंदोबस्त करून भवानरावास पकडण्यासाठीं पेशव्यानें रामचंद्र गणेशास रवाना केलें. भवानरावास बाबूजी नाईक सामील झाला. दोघांचाही रामचंद्र गणेशानें पाठलाग करून धुव्वा उडविला. भवानरावाला किंवा बाबूजी नायकाला कोठेंच थारा राहिला नाहीं. पेशव्याचा मुक्काम स. १७६६ च्या उन्हाळ्यांत गोदावरीकडे असून हरिपंत फडक्याचे मार्फत भवानरावानें पेशव्याकडे शरणागति कळविली. “ कांहीं खात नाहींत. श्रीमंतांचें दर्शन झाल्याखेरीज अन्नोदक घेत नाहींत म्हणतात.” * हा कानमंत्र भवानरावास कोणी तरी सांगितला, तो त्यास पटला. माधवराव शिस्तीचा भोक्ता, त्याची आज्ञा मान्य केली कीं तो कोणाचेंही वाकडें करणारा नव्हे. भवानरावही तसाच आर्जवी होता. त्यानें पेशव्याची भेट घेऊन स्पष्टपणें बोलून त्याचे मनांतील अढी काढून टाकिली. पण भगवंतराव आजपर्यंत निष्ठेनें वागला त्यालाही दूर करणें पेशव्याचे जिवावर आलें. तूर्त त्यानें तोड काढिली कीं भवानरावानें पुण्यास पेशव्याजवळ राहावें. त्यास खर्चास सालाचे पन्नास हजार पेशव्यानें द्यावे; आणि भगवंतरावाची व्यवस्था आहे तशी तूर्त चालू राहावी. भवानराव कांहीं वर्षें पुण्यास वास्तव्य करून राहिला. त्याचें म्हणणें मी प्रतिनिधीचे गादीचा मालक, भगवंतराव आमचा मूल त्याचा बंदोबस्त मी पाहिजे तसा करीन. हा तंटा चालू असतांच पेशवा मरण पावला आणि पुढील व्यवहारांत भवानरावाचें तेज चढलें, तो प्रकार यथास्थलीं येईल.

**५. बाबूजी नायकाचा बंडावा**—प्रतिनिधि, बाबूजी नाईक वगैरे कित्येक पेशव्यांचे विरोधी सदा रुष्ट राहून संधि सांपडताच ते केव्हां पृथक्पणें केव्हां संगनमतानें दंगल उडवून देत. त्यांतून माधवरावाचा तडकाफडकी निस्पृह कारभार चालू झाला तेव्हां त्याजपुढें जुन्या गमजा चालेनाशा झाल्या. त्यांतून राक्षसभुवननंतरचीं दोन तीन वर्षें गृहकलहामुळें धामधुमीचींच गेलीं. पेशव्यानें हळूहळू आपलें आक्रमण चहूंकडे स्थापित केलें, त्याची जाणीव बाहेरच्यांस होण्यास वेळ लागला.

बाबूजीनायकाचें सर्वच चरित्र विचित्र आहे. नानासाहेबाचें त्याचें कधीं पटलें नाहीं. दादा माधवरावांच्या घोडनदीवरील संग्रामांतून गोपाळराव पटवर्धन,

---

* का. सं. प. या. २१०; ख. ५९०.

गोविंद शिवराम वगैरे माधवरावाचे सहायक जीव घेऊन पळून गेले, त्यांचा बचाव नायकानें बारामती येथें केला, म्हणजे त्या वेळीं तरी तो माधवरावाचे पक्षांत होता. पुढें उत्तरोत्तर नायकानें फौज वाढवून प्रसंग पडल्यास पेशव्याशीं दोन हात करण्याची तयारी चालविली. सोलापुरचा किल्ला त्याचे कबजांत होता तो बंदिस्त करून नायकानें पेशव्याशीं विरोध सुरू केला. त्याचा बंदोबस्त करण्यासाठीं पेशव्यानें नायकाकडून सोलापुरचा किल्ला आपल्या कबजांत मागितला. त्यावरोवर प्रकरण वर्दळीस आलें. माधवरावानें रामचंद्र गणेशाच्या हाताखालीं नायकावर फौज रवाना केली, तो प्रकार असा.

ता० ९ मार्च स. १७६६. "बाबूजी नायकांनीं हदर नायकाशीं स्नेह केला, कागद पत्र यांचे त्यांस, त्यांचे यांस आले, घोडे राऊत चाकरीस पाठविले, संशय आल्यावर त्यांचे अंगीं लाविलें आणि सोलापुर व वंदन हे दोन किल्ले त्यांजकडे होते ते मागितले. त्यांनीं चिठ्या लिहून दिल्या असतां अंतस्थें किल्ले न सोडण्याबद्दल किल्लेदारांस लिहिलें. किल्लेकरी किल्ला सोडीत नाहींत अशीं पत्रें आलीं. उदइक नायकास पुसावें, निग्रह करणें तर करावा असा विचार असतां दीड प्रहर रात्रीं जीन ठेवून पळून गेले. बातमी येतांच पागापथकें पाठीस लाविलीं. धारूरच्या घाटांतून नाईक कळंबचे देशमुख दत्ताजी टाकूर याजकडे गेले. रामचंद्र गणेशांनीं कळंबास चौकी बसविली. तेथून नाईक सोळा स्वारांनिशीं सोलापुरांत गेले. पुंडावे करतील तर त्यांचा उपद्व्याप निर्फळ होय तें करावें लागेल."

पेशव्यापुढें नायकाचा निभाव लागूं शकला नाहीं अल्पावकाशांत सोलापुर व वंदन दोनही किल्ले पेशव्यानें घेतले. त्याचें साह्य केल्याबद्दल "कळंबचे देशमुखास धरून बेडी घातली. यादवराव जगथाप मातबर माणूस यानें नायकास धीर देऊन काढून दिल्हें, ब्राह्मण पाऊणशें वर्षांचा शंभर जखम अंगावर होती, त्याचा शिरच्छेद केला. नायकाचीं मुलें माणसें जिंदगी जवाहीर बारामतीस होते ते सर्व कैद करून पुण्यास आणले." पुढें गोविंदशिवराम ह्याचेमार्फत बोलणें करून समजूत घातली. नाईक शरण आले तेव्हां त्यांची व्यवस्था पेशव्यानें न्यायाचे रीतीनें ठरवून दिली. दोन महिने टोक्यास काढून मग नाईक पुनः बारामतीस जाऊन राहिला. नाना फडणीस, हरिपंत फडके, रामचंद्र गणेश अशा अनेक जवळच्या कर्त्या माणसांना देखील पेशव्याकडे

वजन खर्च करण्याची आज्ञा झाली नाहीं. इतकी कठोर पण न्यायी वृत्ति पेशव्याचे अंगची ह्या लहानशा प्रकरणांत देखील चांगली व्यक्त झाली.*

**६. पुरंदर गडकऱ्यांचा दंगा** — चुलते-पुतण्यांचा बेबनाव चवाठ्यावर येण्याजोगीं जीं कित्येक प्रकरणें घडलीं, त्यांत हें पुरंदर किल्ल्यावरील कोळ्यांचें प्रकरण पुष्कळ गाजलें. पुण्यास राज्याचा कारभार सुरू झाला तेव्हां त्याचे दोन संरक्षक किल्ले पुरंदर व सिंहगड स्वतःच्या कबजांत ठेवण्याची निकड पेशव्यांस उत्पन्न झाली. अडी अडचणींत नुसतें पेशव्यांचें कुटुंबच नव्हे तर तेथील शेटसावकार देखील आपली मत्ता या किल्ल्यांवर नेऊन ठेवीत. ह्यास्तव तेथील शिबंदी व नोकर सर्व विश्वासु, पिढीजाद निष्ठा दाखविणारे असावे लागत. राजाराम छत्रपतीच्या वेळेपासून ही परंपरा चालत आली होती. ता. १० सेप्टेंबर सन १६९१ चा उल्लेख लक्षांत ठेवण्याजोगा आहे, तो असा. "कोळी व बेरड लोकांनीं मोगलांकडून पुरंदर हस्तगत करून द्यावयाची उमेद धरल्यावरून राजाराम छत्रपतींनीं त्यांची सर्फराजी करून त्यांस बंदोबस्ताचें काम वंशपरंपरेनें ठरवून दिलें, तेव्हांपासून किल्ल्यावरचे कोळी व बेरड वतनी हक्कदार बनून राज्याची सेवा करीत आले." §

स. १७५० त नानासाहेबानें हे किल्ले सचिवाकडून आपल्या कबजांत घेतले, तेव्हां हे पूर्वींचे हक्कदार संरक्षक तसेच कामावर राहिले. लष्करचे अंमलदार कोळी असले तरी किल्ल्याचा कारभार पाहणारा सबनीस म्हणून असे त्याची हुकमत सर्वांना पाळावी लागे. पूर्वी सचिवाचा सबनीस असे तो आतां पेशव्याचा झाला. ही सबनिशी पुढें पुरंदऱ्यांकडे आली. स. १७५२ त नानासाहेबानें पुरंदरची सबनिशी महादोबास दिली. पुढें महादोबा मरण पावला आणि कुटुंबांत कलह माजले, त्यांत नीलकंठ आबा पुरंदरे दादाशीं अनुसंधान ठेवी तर धोंडोबा आपा व त्रिंबकनाना माधवरावाचें लक्ष संभाळून वागूं लागले. हें पुरंदरच्या दंग्यांतलें मूळ बीज होय. घोडनदीच्या संग्रामानंतर सखारामबापूचे हातीं कारभार आला, तेव्हां त्यानें पुरंदर किल्ल्याचा संपूर्ण ताबा आबा पुरंदऱ्याला देऊन, लगतचा वज्रमाळ किल्ला आपल्याकडे घेतला. त्यानंतर वर्ष सहा महिने महाराष्ट्रांत निजामची दंगल माजून सर्वत्र अस्वस्थता उत्पन्न झाली,

* पे. द. ३७. ९५, १०१ अथवा ले. ७५ पासून पुढचे; का. सं. प. या. २०९.

§ रा. खं. १५. ३५२, ३५३.

तिचें निरसन झाल्यावर दादा नाशकास व पेशवा कर्नाटक स्वारीस गेले, त्या संधीस आबा पुरंदरे व तेथील मूळचे रखवालदार कोळी ह्यांजमध्यें वेबनाव उत्पन्न होऊन, आबानें पूर्वीच्या त्या वतनदार कोळ्यांना नोकरींतून काढिलें आणि त्यांचे जागीं आपल्या पसंतीचे नवे इसम दाखल केले. ज्यांना नोकरींतून काढलें त्यांचीं घरेंदारें त्या टापूंत कायमचीं असल्यामुळें तीं ते कशीं सोडून जाणार! ते घरीं बसले इतकाच फरक निर्माण झाला. आबाच्या कृतीला विरोध म्हणून त्या कोळ्यांनीं निश्चय केला कीं ह्या नवीन लोकांचा व आबाचा अंमल किल्ल्यावर बसूं द्यावयाचा नाहीं.

आबाचे गैरहजिरींत त्याचा हस्तक राघो गंगाधर अत्रे गडावरचा व्यवहार पाही. धोंडोबा आपा पुरंदरे ह्याचें व आबाचें वैमनस्य असून ह्या धोंडोबाचा कारकून विसाजी केशव साने हा चळवळ्या गृहस्थ आबाचा अंमल उखडून काढण्यास उत्सुक होता. आबानें जुन्या लोकांस काढून आपलीं नवीं माणसें नेमलीं आणि जुने लोक दंगा करतील तर पुरंदरा भोवतीं आपल्या चौक्या बसवून पाईचे माणूस दोन हजार सभोंवार ठेवून दिले आणि बाजार वगैरे भरविण्याची बंदी केली. स्वतः आबा सासवडास आपल्या वाड्यांत बंदोबस्तानें राहूं लागला. ही नवीन व्यवस्था जुन्या कोळ्यांस दुःसह झाली आणि कसेंही करून पिढ्यानुपिढ्या चालत आलेलीं वतनें परत मिळविण्याचा त्यांनीं निश्चय केला. अशा स्थितींत स. १७६४ च्या उन्हाळ्यांत आबा पुरंदरे दादासाहेबांस भेटण्यासाठीं नाशकास गेला असतां, मागें ता. ७ मे (स. १७६४) रोजीं किल्ल्यावर कोळ्यांनीं दंगा सुरू केला. पावसाळ्याच्या घरशाकारणीसाठीं किल्ल्यावर पानभारे जात ते घेऊन चारशें जुने कोळी गडावर गेले. त्या वेळीं त्यांनीं भाऱ्यांत हत्यारें लपवून गुप्तपणें बरोबर नेलीं. इतक्यांत हूल उठली कीं वाघानें गाय मारली, त्यासाठीं पुष्कळसे लोक धावले असतां भारेवाल्यांनीं हत्यारें हातीं घेऊन कचेरीवर चाल केली. पुढें येईल त्यास ठार मारूं लागले. युद्ध फार जालें. बरेच लोक मारले जाऊन कोळ्यांनीं गड ताब्यांत घेतला. पांचवे रोजीं रुद्रमाळ घेतली; आबाचा अंमल उठवून आपला बसविला. विसाजीपंत साने त्यांचा मुख्य चालक बनला. पहिल्या हातघाईंत चहूंकडे दंगल माजली तेव्हां राघोपंत अत्रे तटावरून उडी टाकून पळून पंढरपुरास गेला, त्यामुळें कोळ्यांना रान मोकळें सांपडलें. त्यांनीं आबाचे नवे लोक

काढून आपला पिढीजाद मामला पूर्ववत् चालू केला. कोळी विसाजीपंताचे सल्ल्यानें वागूं लागले. गडावरील लोकांस लुटून व सासवडकरांवर जबरदस्ती करून कोळयांनीं ऐवज जमविला आणि आपले पगार भागविले. आबास हें वर्तमान नाशकास कळतांच तो तावडतोब परत आला आणि पुनः आपली व्यवस्था पाहूं लागला.

वास्तविक हा पुरंदरचा एकंदर बनाव इतिहासांत गाजण्याइतका महत्त्वाचा नाहीं. परंतु कारभारांत चुलते-पुतण्यांची तेढ चालू असतांना जे दोन पक्ष राज्यांत उघड उत्पन्न झाले, त्यांनीं आपआपल्या समजुतीप्रमाणें ह्या बाबतींत एक-मेकांवर आळ घेतली आणि अद्यापि देशस्थ कोंकणस्थांच्या जातिद्वेषानें भारलेलीं मनें आपापल्या विकृत दृष्टीनें ऐतिहासिक विवेचन करितात. पेशवा त्या वेळीं कर्नाटक स्वारींत होता आणि सखारामबापूही त्याच्याच जवळ तिकडे होता. दादाला पुतण्याविरुद्ध कुभांडें रचण्याची सवय असल्यानें, हा कोळयांचा दंगा खुद्द पेशव्यानें विसाजी केशवाला हाताशीं घेऊन त्याचे मार्फत मुद्दाम उभा केला असा प्रवाद दादानें जाहीर केला. दोनही पक्षांतील मंडळींचा जो पत्रसंभार बनला तो आज आपल्यासमोर विपुलतेनें विद्यमान आहे. वास्तविक दंगा झाला आबा व कोळी ह्यांच्या आपसांतील चुरसीनें, परंतु पुतण्याविरुद्ध आपल्या हातांत कांहीं हत्यार असावें ह्या हेतूनें दादानें आपल्या हस्तकांकरवीं लेखांत व बोलण्यांत पेशव्यावर त्याची आळ घातली. साधल्यास तो किल्ला आपल्याच हातीं ठेवून पुतण्याविरुद्ध बचावाचें साधन बनवावें असाही त्याचा अंतस्थ डाव असेल. चिथावणी देऊन आपण नामानिराळें राहावें ही हुलकावणी त्याच्या अंगवळणी पडलेली होती. नाशकास बातमी पोंचतांच दादानें आबास तावडतोब पुरंदरास पाठवून कोळयांचा बंदोबस्त करण्याची आज्ञा केली आणि चहूंकडे ताकिदी पाठवून तन्निमित्त फौजा जमविल्या. त्यामुळें चार दोन महिने प्रांतांत मोठी धामधूम माजली. हे प्रकार जेव्हां माधवरावास स्वारींत कळले तेव्हां त्याच्या अंगचा मोठा जळफळाट झाला. त्रिंबकराव पेठे नाशकास होता त्यानें दादाच्या हालचालींची इत्थंभूत हकीकत पेशव्यास लिहून कळविली; तेव्हां त्यास सर्व गोष्टींची उमज पडून दादानें आपल्यावर उगाच हा गहजब उडविल्याबद्दल त्याची पेशव्यानें चांगली कानउघाडणी केली. स. १७६४ ता० २० मेच्या पत्रांत माधवराव चिंतो विठ्ठलास लिहितो, " पुरंदरचे जुने कोळयांनीं

आमचें नांव पुढें करून दग्यानें किल्ला घेतला म्हणोन परभारें वर्तमान विदित जालें त्यास हे गोष्ट आम्हांस किमपि ठाऊक नसतां मध्येंच लबाडी करून कर्म केलें, त्यांचे पारिपत्याविशीं तीर्थरूपांस लिहिलें आहे. तुम्हीही विनंती करून लबाडांचें पारिपत्य करविणें. " तथापि पेशव्याच्या सूचनेनें हा प्रकार घडला असा प्रवाद 'सर्वत्र चालू होऊन पेशव्याजवळच्या अनेक लोकांस तशाच मजकुराचीं पत्रें आलीं, तेव्हां त्यानें प्रत्यक्ष दादास ठासून लिहिलें, " पुरंदरचा प्रकार येथील संकेतानें किमपि न जाहला. कोळी बेरड स्थाईक कदीम तिसां वर्षांचे चाकर त्यांस दूर करून आबांनीं अन्नास यजीद केलें, त्यासाठीं त्यांनीं दावा धरून हें कृत्य केलें. विसाजीपंत आमचे आज्ञेशिवाय कोळ्या बेरडांत मिळाले. तरी किल्ला ज्याचे त्याचे स्वाधीन करणें अशा ताकिदी येथून दिल्या आहेत. " खुद्द विसाजीपंतानेंही सर्व कच्चें वर्तमान दादासाहेबांस लिहून कळविलें, " धनी मेहरबान होऊन सेवकास कौल सादर केला तो ताइतांत घालून हृदयीं धरिला. " या विसाजीच्या लिहिण्यावरून तो दादाच्या आज्ञेबाहेर मुळींच वागत नव्हता हें उघड आहे. तरी पण त्याजवरही दादानें सूड उगविण्यास कमी केलें नाहीं, हें पाहून विसाजीनेंही नम्रपणानें त्या प्रकरणाचें माप दादाचे पदरांत घातलें. आबाला तर दादाचे कृतीचा तिटकाराच आला. दादानें त्याला पुनः नाशकास बोलावलें असतां तो भेटीस गेला नाहीं. त्यानें उत्तरीं कळविलें, " दादासाहेबीं माझी ममता सोडून द्रव्याचा लोभ धरून राजकारणें केलीं. किल्ला व गोरगरिबांचा पैका सरकारांत घेणार तेव्हां हें काळें तोंड घेऊन नाशकास कशास जावें ? "

सारांश पुरंदर दंग्याची ही विपरीत कारवाई दादानें आपल्या मतलबास्तव मुद्दाम उभी केली. तोच सर्व सूत्रचालक. पेशव्यानें मात्र त्याची सारखी आळवणी चालविली. ता० २४ जून १७६४ चें त्याचें पत्र वाचावें म्हणजे पेशवा कसा निर्लेप होता त्याची खात्री होते. तो लिहितो, " वडिलीं पत्रें पाठविलीं तीं पावोन लिहिला अर्थ सविस्तर कळों आला. धोंडो मल्हार यांच्या कारकुनानें किल्ला घेतला म्हणजे धोंडोबाचे संदर्भानेंच घेतला यांत संशय नाहीं. ते आपणाजवळ आहेत. आपणांस पुसून घेतला किंवा न पुसतां घेतला हें कळत नाहीं. न पुसतां घेतला म्हणावा तरी आपण त्यांस शिक्षा करीत नाहीं. पुसून घेतला म्हणावा तरी आपण शपथपूर्वक लिहिलें. आपले आज्ञेशिवाय किल्ला

घेतला असेल तर परिच्छिन्न त्यास अटक करून किल्ला आबाचे हवालीं करावा. आम्हासीं तरी आपण कृत्रिम करूं नये. जाला मजकूर पूर्वी शपथपूर्वक सेवेसीं लिहून पाठविलाच आहे. प्रथमतः बेरड कृष्णातीरीं आम्हांस भेटले. त्यांनीं कळविलें, आम्ही पुरातन वतनदार बहुत दिवसांचे वतनी चाकर असतां आबांनीं आम्हांस दूर केलें. आम्ही उपाशीं मरतों. आम्ही त्यांस सांगितलें तूर्त तुम्ही घरास जाणें. आम्ही स्वारीहून परत आल्यावर आबास सांगून तुमची सोय करून देऊं. तूर्त सखारामपंत येथें आहेत त्यांस सांगून सोय निघाली तरी काढितों. त्यावर कोळी बोलले बापूस कळल्यावर आबास कळेल. ते आमचीं डोकीं मारावयास चुकणार नाहींत. ऐसें कित्येक हरद्र सांगितलें व कांहीं पोटास मागितलें, त्यास खर्चास चारशें रुपये देऊन वाटेस लावलें. हेतु इतकाच कीं जुने पुरातन लोक दुसरीकडे न जावे म्हणोन आशेस लावून ठेविले. धोंडोबाचे कारकुनानें किल्ला घ्यावयास तुम्हांस सांगितलें कीं काय म्हणून पुसलें, तेव्हां ते म्हणाले आम्ही त्यांस सांगितलें नाहीं. आमचा दस्तैवज निघाल्यास पारिपत्य करावें म्हणून त्यांनीं शपथ वाहिली. दुसरा कारकून किल्ल्यावर घेतला हें वर्तमान आम्हांस कळतांच त्यास आम्ही दरबार मना केला तेव्हां सखाराम-पंतांनीं सांगितलें, तूर्त त्याची अब्रू घेऊं नये, वडिलांस लिहून आज्ञा येईल तसें करावें. किल्ला कोठें जात नाहीं. महिना दोन महिने अधिक लागले तरी हरकत नाहीं. मनसुब्यानें काम करावें. ह्यास्तव त्याचें पारिपत्य तूर्त राहिलें. कच्चा मजकूर वडिलांस कळावयास्तव लिहिला असे. सारांश वडिलांचेमर्जी पेक्षां दुसरें अधिक आम्हांस कांहीं वाटत नाहीं. वडिलांचे मर्जीशींच मजला दरकार आहे. त्यांतच माझें सर्वात्मना कल्याण आहे. मी वडिलांसीं कृत्रीम कधीं करणार नाहीं. किल्ला घेऊन आबाचे हवाला करावा हाच निश्चय आहे. मी वडिलांस लटकें सर्वथा लिहिणार नाहीं. जालें वर्तमान सखारामपंतास सांगितलें आहे. " §

ह्या पत्रावरून पुरंदर प्रकरणीं पेशव्यानें यत्किंचित् कारवाई केलेली नाहीं, हें सिद्ध होतें. जो काय प्रकार झाला तो सर्वथा दादाचे मार्फत झाला. पुरंदरचे कोळ्यांनीं दंगा करून किल्ला घेतला ह्याबद्दल दादानें मोठा रागाचा आवेश दाखविला. त्यानें तावडतोब कोळ्यांस नाशकास बोलावून घेतलें. त्यांनीं समक्ष दादास भेटून आपली बाजू समजावून दिली; आपला कांहीं गुन्हा नाहीं

§ ऐ. व. २८. सं० निबंध खं. २ आषाढ आश्विन १९४७. ले. ५.

अशी त्यांनीं त्याची खात्री केली. दादानें त्यांस ता० ३० ऑगस्ट स. १७६४ रोजीं स्वतंत्र करार लिहून आश्वासन दिलें, तें पाहिलें म्हणजे यांत पेशव्याकडे कांहींच दोष येत नाहीं. दादा आपल्या करारांत कोळ्यांस सांगतो, " ज्या गोष्टी तुम्ही न कबूल कराव्या त्यांचें इमान तुम्हांजवळ आबा मागूं लागले, तुम्ही कबूल न केलें म्हणोनि तुम्हांसी आकस धरून आबांनीं तुम्हांस खालीं घालवून दुसरे लोक किल्ल्यावर चढविले तेव्हां तुम्हांस जागा हस्तगत करणें जरूर झालें, खूनखराब्या जाल्या, त्यास तुम्हीं पहिल्यापासून सरकारचे एकनिष्ठ इमानी चाकर, पुढें ही आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणार हें जाणून तुम्हांवर कृपा करून झालेल्या गोष्टी माफ केल्या असत. तुमचे अर्जाप्रमाणें किल्ला मजकूर कोणाकडे न देतां हुजूर ठेवून तुमचेच हातें सेवा घेतली जाईल. तुम्ही निर्धास्त राहणें. " *

मिळून ह्या प्रकरणाचा दोष सर्व दादाचे कारस्थानीला येतो. बिचारा आबा पुरंदरे दादाचा एकनिष्ठ सेवक मधल्या मध्यें फसला गेला. कोळ्यांकडे त्याची पत राहिली नाहीं आणि नाकर्तेपणाचा डाग त्याच्या कपाळीं कायमचा जडला. तदुत्तर झुरणीस लागून लवकरच तो ता. २ डिसेंबर स. १७६५ रोजीं मरण पावला. दादाला तो किल्ला पचला नाहीं. कर्नाटकांतून परत आल्यावर पेशव्यानें पुरंदरची सर्व व्यवस्था आपल्याकडे घेतली. दादानें मात्र आपल्या स्वभावास अनुसरून पुरंदरची कारवाई पेशव्यानें केली अशी जाहिरात चहूंकडे फैलावली. नारोकृष्ण दर्वे ह्यास लिहिलेल्या पत्रांत दादा सांगतो, " पुरंदरचे संबंधांत चिरंजिवांनीं आंत एक व बाहेर एक असा जाहिराणा दर्शविला, तसें तुम्हीं करावें " †

**७. तोतयांचा उद्भव**—स. १७६५ चा पावसाळा राजकारणाच्या दृष्टीनें पेशव्याला मोठ्या चिंतेचा व धामधुमीचा बनला. पुरंदर कोळ्यांचें प्रकरण मिटण्यापूर्वींच सदाशिवराव भाऊच्या तोतयाचें प्रकरण पुष्कळांना जिव्हाळ्याचें वाटूं लागलें. याच वेळीं उत्तरेंतील मराठ्यांची सत्ता क्लाइव्हच्या दिवाणीनें डळमळत चालली. त्यांत दादानेंही राज्याची वांटणी मागून पुतण्याचा

---

* पु. द. ३. ३९. † पे. द. १९·२०, २४, २६, ३२, ५२; ख. ४३४, ४३५, ४६० ५७६–५७८; रा. खं. १२·६९; १४·३०, ४८, ६८, ७४; पु. द. ३·३२–३९; त्रै. व. २८·१–२.

उच्छेद चालविला. पेशव्यासारख्या एका माणसानें कोणीकडे म्हणून लक्ष द्यावें ! मात्र अनुभवानें त्यास माणसांची व व्यवहारांची पारख बिनचूक येत गेली. आप्त, सरदार, कारभारी वगैरेंपैकीं विश्वासास पात्र कोण, दगेखोर कोण, याची खात्री होऊन त्यानें आपली एकजूट निर्माण केली, तितक्यापुरता चुलत्याचा पक्ष हळूहळू दुर्बल बनत गेला. स. १७६४ अखेर सखारामबापूस त्यानें जवळ जवळ घरीं बसविल्यासारखें केलें, त्यामुळें तो उद्विग्न होऊन आपले खाजगी व्यवहार पाहत हिवरे येथें राहिला. दादाचीं अनुसंधानें भोसले व निजाम ह्यांजकडे चाललेलीं पाहून, प्रथम त्या दोघांचा अंतस्थ ठाव घेण्यासाठीं दादास उत्तरेस जाण्याची सूचना करून पेशव्यानें आपण स. १७६५ च्या दसऱ्याचे मुहूर्तानें वऱ्हाडच्या बाजूस गोदावरीकडे प्रयाण केलें.

यापूर्वींच महाराष्ट्राला अपरिचित असें एक नवीन प्रकरण निर्माण झालें. पानपतावर पुष्कळ लोक गारद झाले. त्यांचा पुढें तपास लागला नाहीं. या कारणास्तव कित्येक माणसांचे तोतये उत्पन्न झाले. अंधश्रद्धेच्या भाविक लोकांनीं किंवा कित्येक जाणत्या मंडळींनीं अशा लोकांना पाठिंबा दिल्यामुळें मराठी राज्यांत एक नवीनच चिंता प्रगट झाली. जनकोजी शिंदे, यशवंतराव पवार व मुख्यतः सदाशिवरावभाऊ यांचे तोतये उद्भवले, त्यांचा निर्णय करणें हें एक महत्त्वाचें काम उपस्थित झालें. जनकोजीच्या तोतयाची हकीकत महादजीच्या प्रकरणांत सांगितली आहे. यशवंतराव पवाराचा तोतया निघाला त्याचा निर्णय पुष्कळ पुढें झाला. पकडून ४ डिसेंबर १७७४ रोजीं रतनगड किल्ल्यावर त्यास कैदेंत ठेविलें. *

परंतु सदाशिवरावभाऊच्या तोतयाचें प्रकरण पुष्कळ वर्षें गाजलें. त्याजवर नाटकें लिहिलीं गेलीं आणि अद्यापि संशोधकांस व साहित्यिकांस तें प्रकरण पुरून उरलें आहे. सदाशिवराव व विश्वासराव यांचीं प्रेतें शोधून त्यांना यथोक्त अग्निसंस्कार झाला असा प्रकार काशीराज शिवदेवासारख्या जबाबदार इसमांनीं पेशव्यास कळविला असतांही त्यांजबद्दल पुष्कळांची व प्रत्यक्ष पार्वतीबाईची खात्री पटली नाहीं. नानासाहेब उत्तरेंत असतांच भाऊसाहेब जिवंत असल्याच्या बातम्या त्यास येत होत्या. त्यानें तपासही केला. भाऊसाहेब जिवंत असता तर त्यास असें अज्ञात लपून राहण्याचें कारणच नव्हतें.

* स. मा. रो. १.२४७.

“ बुंदेलखंडांत छत्रपूरजवळ कनोलगांवीं सुखलाल नांवाचा एक कनोजी ब्राह्मण राहत असे. त्याच्या बापाचें नांव रामानंद, आईचें अन्नपूर्णा व आजीचें मन्मथा. ह्या सुखलालचा भाईबंदांशीं वतनासंबंधीं तंटा लागून वैताग आल्यानें तो देशांतरास जाण्यासाठीं गोसाव्याचा वेष घेऊन नरवर येथें आला. तेथें एका दुकानांत बसला असतां दोनतीन दक्षिणी गृहस्थ जवळ जमा होऊन म्हणूं लागले, ‘ तूं भाऊसाहेबासारखा दिसतोस. ’ समागमें अतीत मंडळी होती. हें वर्तमान तेथील सुभेदार विश्वासराव लक्ष्मण यांस कळलें. त्यांनीं बोळखोन करेरियास घेऊन गेले. नंतर त्यांस सिप्री येथें गणेश संभाजी भेटले. बंदोबस्त करून दोनतीन हजार फौज जमली. सर्वांनीं खुशाली करून साखर वांटली. गोसावी सारखा म्हणत होता कीं मी भाऊ नव्हें, उगाच मजवर जुलूम कां करितां ? मी नागा अतीत योगाभ्यासी. परंतु जवळच्यांनीं अति आग्रह केला. धोत्रें चुणून द्यावीं, नेसवावीं, पाय तलाथावे, पिकदाणी धरावी, चवरी उडवावी असें करूं लागले. मग हत्तीवर बसवून कामें काजें करवूं लागले. शिक्के व निशाण केलें. जबरदस्तीनें भाऊ म्हणवून बक्षीगिरी, दिवाणगिरी, चिटणिसी, फडनिसी वांटून घेतली. ”

स. १७६१ च्या डिसेंबरांत हा प्रकार सुरू होऊन दोन वर्षेपर्यंत उत्तर हिंदुस्थानांत पसरला. “ खासे यांचे नांवाचीं पत्रें येतात. स्वतः लिहीत बोलत नाहींत. कोणी मायेचा गृहस्थ जाऊन ठीक करीत नाहीं. चोहोंकडे दंगा माजत चालला. देशीं पत्रें पार्वतीबाईस गेलीं. गणेश संभाजी व विश्वासराव लक्ष्मण या दोन जाणत्या सरदारांनीं त्या गृहस्थाचा पुरस्कार करून पत्रें पाठविलीं तेणेंकरून दक्षिणेंत मोठी चळवळ उडून गेली. महालोमहालींचे कमावीसदारांकडून पैका घेऊन फौज चाकरीस ठेविली. ग्वाल्हेर, झाशी, भेलसा या प्रांतांत कोणास शंका राहिली नाहीं. असें करतां डेरे, राहुट्या, हत्ती, पालख्या, नौबती, निशाणें, बाजार अशा थाटानें हा गृहस्थ नर्मदा उतरून अलीकडे आला. स. १७६४ त पेशवा धारवाडवर असतां ही बातमी त्यास कळली. रघुनाथराव त्यावेळीं कर्नाटकची वाट चालत होता, त्यानें महादजी सिंद्यास लिहून कळविलें, “ भाऊसाहेब असल्यास बरोबर घेऊन यावें. तोतया असेल तर पारिपत्य करावें. ” ता० १४ जानेवारी स. १७६५ रोजीं माधवरावानें “ खऱ्या लटक्याचा शोध करून कळवावें, ” असें लिहून पाठविलें. खानदेशच्या सुलतान-

पुर परगण्यांत जयनगर येथें ता. १२ ऑगस्ट स. १७६४ रोजीं मल्हारराव होळकरानें हजीर मजालस भरवून तपास केला, तेव्हां तो खोटा असें ठरलें. "तथापि समागमें तीन चार सहस्र गोसावी, त्यांजपासून एकीकडे काढण्यासाटीं पंचवीस हजार रुपये देण्याचा करार करून गोसावी फोडले, भाऊनामें पुरुष कैद केला," असें पत्र पुण्यास नाना फडणिसास स. १७६५ च्या मार्चांत आलें. त्यास पकडण्याचें हें काम हरि दामोदर नेवाळकर ( झांशीचे राणीचा पूर्वज ) व त्याचा पुत्र रघुनाथ हरि ह्यांनीं केलें. ता. १२ मे स. १७६५ च्या पत्रांत रघुनाथ हरि लिहितो, "तोतयाचे मसलतींत मेहेनत बहुत करावी लागल्यामुळें वडील हरि दामोदर व्यथित होऊन तापीतीरीं समाधिस्त जाले." नंतर हा घोळका पुण्यास आला. पूर्वी जनकोजी सिंद्याचा तपास केला तसाच माधवरावानें ह्याही इसमाचा तपास करून खोटा ठरला म्हणून किल्ल्यावर अटकेंत घातला. त्यावर "अनुबाई घोरपडे म्हणूं लागली, हे भाऊसाहेब खरे. त्यावरून किल्ल्यावरून आणून अनुबाईचे घरींच ठेविला. त्यांनीं पंधरा दिवस घरांत ठेवून चौकशी बहुत केली. कृत्रिम प्रकार त्यांचे ध्यानांत आला. तोतया बोलला कीं जनकोजीस आणा, तो सांगेल, त्यावरून जनकोजीचा तोतया होता तो आणला. दोघे एक जागां करून पुसलें. तेव्हां सर्व खोटा प्रकार सर्वांचे ध्यानास आला. अनुबाईनीं तोतयास बाहेर काढून दिला. मग श्रीमंतीं दुसरे दिवशीं प्रातःकाळपासून तृतीय प्रहरपर्यंत बुधवार पेठेच्या हौदापाशीं उभा केला, कीं सर्वांनीं खरा खोटा मनास आणावा. सर्व जनांनीं खोटा केला. दुसरे दिवशीं तोफखान्याचे हवालीं केला. सर्वांनीं इत्यर्थ केला कीं पर्वतीस जाऊन निकाल करावा. मग मंगळवारीं ( १५ ऑक्टोबर स. १७६५ ) थोरले मुत्सद्दी व शास्त्री मिळोन पर्वतीस जाऊन त्या गृहस्थास गोशाळेंतून आणला. देवापुढें बसवून रामशास्त्री यांणीं बोलवला कीं तूं भाऊ तों नव्हस, परंतु न कळे, त्यास तूं खरें असेल तें सांग. बेलभंडार त्याचे पुढें ठेविला. तेव्हां त्यानें साफ सांगितलें कीं मी कनोजा ब्राह्मण. मग सर्वांची निशा शपथेवरून झाली. बेडी अद्याप तर तशीच कायम आहे. लोहगडाहून जनकोजीस आणून एकदम चौकशी केली. निर्णय झाल्यावर सुखलाल ह्यास नगरचे किल्ल्यावर अटकेंत ठेविलें." तथापि पार्वतीबाई वगैरे कित्येकांची समजूत न होतां तिनें सौभाग्यचिन्हें टाकून दिलीं नाहींत. अशाखालीं दहा वर्षें गेलीं. या काळांत इंग्रज, हैदरअली, दादासाहेब इत्यादींनीं आपापल्या मतलबास्तव तोतयाचा बखेडा उठविला, म्हणून त्याची वेळोवेळीं निरनिराळ्या

इंग्रजांनीं अडथळा आणिला. "मराठ्यांच्या वाढत्या सत्तेचा आम्हांस मोठा खेद होतो" हा त्यांचा सिद्धांत होता. +

मुंबईकरांस मोठा हेवा वाटे मद्रास किंवा कलकत्तेकरांचा. हे तीन इंग्रजांचे प्रांत त्या वेळीं एकमेकांपासून अलग होते. मद्रास व बंगाल हे प्रांत इंग्रजांच्या कक्षेंत आले आणि आपण मुंबईकर कांहींच पराक्रम करूं शकत नाहीं हें त्यांस लाजीरवाणें वाटूं लागलें. वसई नाहीं तर नाहीं, निदान शिवाजीनें बांधलेला मालवणचा सिंधुदुर्ग किल्ला तरी आपले हातीं असावा असें वाटून त्यांनीं तो कोल्हापुर छत्रपतीचा जलदुर्ग कांहींएक सबब न सांगतां ता० २७ जानेवारी स. १७६५ रोजीं अचानक हल्ला करून घेतला आणि त्याचें नांव फोर्ट ऑगस्टस ठेविलें. या कृत्यानें पेशव्याचें प्रत्यक्ष नुकसान नसलें तरी इंग्रजांचा शह जवळ आला त्याचें निवारण करणें ओघास आलें.

मुंबईकरांची ही चढाई इतरांनाही बाधूं लागली. वाडीच्या सावंतावर इंग्रजांनीं जबरदस्ती चालविली. 'मालवणापासून रांगण्यापावेतों मुलूख द्यावा, सर्व गलबतें द्यावीं' अशी मागणी इंग्रजांनीं सावंतावर केली, ती त्यानें मान्य केली नाहीं, तेव्हां त्यांनीं सावंतांचा रेडीचा किल्ला यशवंतगड काबीज केला. जिजाबाई व सावंत दोघेही चिडून गेले. "कोंवळा मोड आहे, तों मोडल्यानें उत्तम, भारी जाहलेनें सर्वांचें वाईट" असें जिजाबाईनें पेशव्यास कळविलें, (मार्च १७६५). परंतु इतर व्यवधानांमुळें इंग्रजांकडे लक्ष पुरविण्यास या वेळीं पेशव्यास सवड नव्हती. इंग्रजांचें सामर्थ्य ओळखून त्यांचा प्रतिकार करणें त्याच्या मनांत सारखें डांचत होतें. पुढें जिजाबाईशीं स्वतंत्र बोली करून किल्ला तिचा इंग्रजांनीं परत दिला; परंतु वखार घालण्याच्या निमित्तानें तिजवर त्यांनीं कांहीं बंधनें घातलीं आणि मराठमंडळांतून कोल्हापुरकरांस अलग करण्याचा प्रयत्न केला. नागपुरकर भोसले व रघुनाथराव दादा यांनाही आपल्या बाजूस वळविण्याचे प्रयत्न इंग्रजांनीं चालविले. ही इंग्रजांची कारवाई माधवरावानें चांगली ओळखून त्यांच्यावर अवलंबून राहण्यांत केवढा घात होतो हें त्याच्या पूर्ण निदर्शनास आलें. एकदां कर्नाटक स्वारींत त्यानें इंग्रजांकडून तोफा घेतल्या. त्या तपासून घेण्यास महाप्रयास पडले. हातीं आल्यावर त्या रणक्षेत्रावर

+ "The growing power of the Marathas is a subject much to be lamented." Forrest Maratha series, p. 141.

पोंचविण्यास अनेक अडचणी आल्या आणि ठिकाणीं आल्यावर लागू करितांना असें आढळून आलें कीं इंग्रजांनीं निरुपयोगी झालेल्या तोफा आपल्या गळ्यांत बांधल्या. हा अनुभव आल्यामुळें इंग्रजांचा नाद माधवरावानें सोडून तोफा दारूगोळ्यांचे स्वतःचे कारखाने ठिकठिकाणीं बनविले, तो प्रकार अन्यत्र सांगितला आहे.

इंग्रजांचीं धोरणें चुलते-पुतण्यांच्या तेढीवर उभारलेलीं असत. कोणीकडून तरी मराठ्यांच्या सत्तेस ग्रहण लागावें, ही त्यांची इच्छा माधवरावाच्या प्रभावानें दुरावत चालली, तेणेंकरून ते अस्वस्थ बनले. स. १७६७ त इंग्रजांचें व हैदरअलीचें इतकें फाटलें कीं मराठे हैदर एक होऊन ते पुढें जड होतील तर शक्य झाल्यास हैदराविरुद्ध पेशव्यांची मदत आपण मागावी अशी इच्छा मुंबईकरांस झाली. साधल्यास रघुनाथरावास आपल्या कच्छपीं लावावें, अशा उद्देशानें त्यांनीं आपला इतबारी वकील टॉमस मॉस्टिन यास पेशव्याचे भेटीसाठीं पुण्यास पाठविलें. ब्रोम नांवाचा एक सहायक त्याजबरोबर दिलेला असून त्यानें परभारें रघुनाथरावास भेटावें अशी योजना ठरवून, हे वकील नजर करण्याच्या अनेक वस्तु बरोबर घेऊन स. १७६७ नोव्हेंबर ता. १९ रोजीं मुंबईहून निघाले, ते दहा दिवसांनीं पुण्यास पोंचले. तेथून ब्रोम दादाचे भेटीसाठीं त्रिंबकास गेला. डिसेंबर १९ पासून कित्येक दिवस दादा व ब्रोम यांचीं बोलणीं होऊन तो परत पुण्यास आला. ता. १९ जानेवारीस ब्रोमनें आपल्या भेटीची हकीकत मॉस्टिन-कडे रुजू केली, तिचा इत्यर्थ दादाचे प्रकरणांत दिला आहे. नंतर मॉस्टिन २७ फेब्रुवारी स. १७६८ रोजीं पुणें सोडून ३ मार्चला मुंबईस पोंचला. त्याच्या निवेदनांत इंग्रज-मराठ्यांचे संबंध स्पष्ट दिसून येतात.

या इंग्रज वकिलांनीं पुण्यास प्रमुखांच्या भेटी घेऊन शिवाय अंतस्थ कारवाईनें पुष्कळशी भली बुरी माहिती मिळविली. हैदराविरुद्ध लढण्यासाठीं तुमच्या फौजा आमचे साह्यास द्या अशी मागणी मॉस्टिननें केली, तेव्हां तूर्त आम्हांस आपल्या फौजा बाहेर पाठविण्याची सोय नाहीं असा जबाब त्यास पेशव्याकडून मिळाला. मॉस्टिन लिहितो, “ हैदरनायकाचा बेदनूर प्रांत घेण्यास ही संधि उत्कृष्ट असतां, दादासाहेब केव्हां काय करतील याचा नेम नसल्यामुळें आम्हांस फौजा संनिध पाहिजेत असें उत्तर मला मिळालें. दादासाहेब फौज जमविण्यासाठीं हिंडत आहे. मी ब्रोमच्या भेटीचीं दस्तकें मागितलीं तीं मिळण्या

पांच दिवस लागले. डिसेंबर ३ ला माझी पेशव्याची पहिली भेट झाली ती केवळ औपचारिक असून बोलणें कांहीं झालें नाहीं. ”

पुढें आठ चार दिवसांनीं वकिलाच्या व पेशव्याच्या भेटी होत गेल्या, पण पोटांतील उद्देश कोणीच सफाईनें बोलेना. इंग्रजांचा कावा दरबारनें पूर्णपणें ताडला आणि आपल्या व्यवहारांची फारशी दाद त्यास लागूं दिली नाहीं. सन १७६७ च्या मार्चांत हैदराचें ठाणें मदगिरि मराठ्यांनीं काबीज करून बिदनूर संस्थान हाताखालीं घातलें. मदगिरीवर बिदनूरची राणी व तिचा दत्तक पुत्र हैदरानें कैदेंत ठेवले होते, त्यांस सोडवून पेशव्यानें पुण्यास आणिलें. वाटेंत राणी मृत्यु पावली, पण तिचा पुत्र त्या वेळीं पुण्यास राहत होता त्याची भेट मॉस्टिननें घेतली. त्याचें मन वळवून बिदनूर संस्थान आपण घ्यावें अशी खटपट मॉस्टिननें केली, पण ती यशस्वी झाली नाहीं. * एकट्याचीच स्वतंत्र भेट अशी मॉस्टिनला पुण्यास कोणाचीच होऊं शकली नाहीं. गोविंद शिवराम, रामाजी मल्हार चिटणीस, सखारामबापू, मोरोबा दादा, पेशव्याचा हकीम महंमदअली वगैरे कोणी तरी भेटीच्या प्रसंगीं पेशव्याबरोबर हजर असत. मॉस्टिन लिहितो, “ येथील दरबारची मंडळी मला कांहीं थांगपत्ता लागूं देत नाहींत, उलट माझ्याकडूनच शक्य तितकी माहिती ते काढून घेतात. जंजिऱ्याचे सीदी व हैदरअली ह्यांच्याशीं आमचे व्यवहार काय चालले आहेत तें समजून घेण्याची त्यांस मोठी उत्कंठा वाटते. उत्तरेंत जाठ, दक्षिणेंत हैदर व पुण्यांत राघोबा हीं तीन मोठीं दडपणें आज पेशव्यावर आहेत. ता० १ जानेवारी सन १७६८ रोजीं राघोबाचा वकील गोपाळ चक्रधर मला येऊन भेटला. तो म्हणाला, आमच्याशीं बळकट दोस्तीचा करार करून पुतण्याचा पाडाव करण्याचा राघोबाचा विचार आहे. ता० ४ जानेवारीस महादजी सिंदे हिंदुस्थानांतून पुण्यास आला, त्याचा सत्कार पेशव्यानें संगमापावेतों सामोरा जाऊन केला. तुळाजी आंगऱ्याचे मुलास आम्ही मुंबईस आश्रय दिला याबद्दल पेशव्यास भारी राग येतो. ता० ५ रोजीं पेशव्यानें मला भोजनास बोलाविलें. ता० १५ रोजीं महादजीस पोषाख देऊन पेशव्यानें हिंदुस्थानांत पाठवणी केली. बेदनूर व सोंधें हस्तगत करण्याचा आमचा विचार मी पेशव्यास कळविला त्याबद्दल त्यानें आमचा सडकून निषेध केला. ता० ११ फेब्रुवारी रोजीं भेट झाली

* बानर्जीकृत माधवराव, पृ० १२०.

त्या वेळीं माधवरावानें मॉस्टिन यास सांगितलें, " तुमची आमची कायम दोस्ती व्हावयाची तर, तुम्हीं आमच्या शत्रूंस कोणत्याही प्रकारें साह्य करतां नये, मग ते शत्रु आमच्या घरांतले नात्याचे असले तरी त्यांस तुम्ही हाताशीं धरूं नये." यावर मॉस्टिननें जबाब दिला, " जोंपर्यंत तुम्ही आमच्याशीं स्नेहानें वागाल तोंपर्यंत आम्ही देखील तुमच्या विरोधकांस साह्य करणार नाहीं." नारायण-रावाच्या खुनानंतर या वचनांची प्रचीति आली.

सोंधेंबेदनूर संबंधानें माधवरावानें मॉस्टिनजवळ गोष्ट काढली, तेव्हां मॉस्टिन म्हणाला, "तुम्ही आम्हांस वसई व साष्टी या म्हणजे सोंधें बिदनूर जिंकण्यास आम्ही तुम्हांस मदत करूं. साष्टी व वसई या स्थलांची आम्हांस अत्यंत निकड आहे." सुरतपासून विजयदुर्गपर्यंतचे समुद्रकांठचे सर्व किल्ले स्वतः तपासण्याचा माधवरावाचा विचार आहे असें मॉस्टिन यास पुण्यास कळलें. पेशव्यानें मॉस्टिनकडे तक्रार केली कीं मुंबईकरांचा आमचा असा दृढ स्नेहसंबंध असतां, मद्रासकर व कलकत्तेकर हा संबंध कां पाळीत नाहींत. आरकाटच्या महंमदअलीकडून नागोजीराव म्हणून वकील पेशव्याकडे येण्यास निघाला होता, तो आल्याशिवाय कर्नाटकसंबंधीं कांहींच बोलणें पेशव्यानें केलें नाहीं. मॉस्टिननें पेशव्यास विचारलें, तर मग गोपाळराव पटवर्धनाच्या हाताखालीं आतांच मोठी फौज कर्नाटकांत कां जात आहे? पेशव्यानें जबाब दिला, ही फौज दरसालच्या खंडण्या वसूल करण्यासाठीं जात आहे. अन्य तऱ्हेनेंही माधवरावास दहशत घालण्याची मॉस्टिननें शिकस्त केली. त्यानें कळविलें, " जानोजी भोसले उघडपणें आमच्याशीं स्नेह जोडीत आहे, म्हणून तुम्ही जर साष्टी वसई देऊन आमचा स्नेह न स्वीकाराल तर जानोजीस मदत करणें आम्हांस भाग पडेल व तुमचें नुकसान होईल." नंतर पेशव्याचा खास हकीम महंमदअली म्हणून त्याचे मर्जीतला होता त्यास मॉस्टिननें भेटीस बोलावून पुष्कळ बोलणें केलें, पण त्यावरून विशेष कांहीं निष्पन्न झालें नाहीं. मात्र इतर हिंदु वकिलांपेक्षां असले मुसलमान गृहस्थ इंग्रजांस जास्त जवळचे व सोयीचे वाटत हें लक्षांत येतें. ता० ५ जानेवारीस मॉस्टिनला पेशव्यानें रात्रीं भोजनास बोलाविलें, तीच त्यांची चौथी भेट होय. एकंदरींत या वकिलातीपासून कोणासच कांहीं नफा नुकसान झालें नाहीं. थोडीशी तेढच वाढली असावी. तुळाजी आंगरे याचे पुत्रास इंग्रजांनीं आश्रय दिला आणि जंजिऱ्याचे सीदीस मराठ्यांविरुद्ध चढविलें, यांत इंग्रजांचे हेतु काय होते ते पेशव्यास स्पष्ट कळलें.

ब्रोम: नाशकास दादाकडे गेला होता, त्याचीही तिकडे डाळ शिजली नाहीं. जानेवारी २७ ला मॉस्टिन व पेशवा यांची पांचवी भेट झाली, बोलणें मात्र काय झालें असेल तें फक्त गोविंद शिवराम व रामाजी मल्हार चिटणीस यांजपाशीं झालें. बेदनूरच्या राजास पेशव्याविरुद्ध चिथविण्याची खटपट मॉस्टिननें पुष्कळ केली पण तो पेशव्याचे कबजांत पूर्णपणें आल्यामुळें इंग्रजांची कारवाई चालली नाहीं. एवंच मॉस्टिनच्या वकिलातीपासून एकच गोष्ट मनांत भरते कीं मराठे, निजाम, हैदर व इंग्रज हे सर्व एकमेकांस फसवून आपापले मतलब साधूं पाहात होते. त्यांजमध्यें स्नेह किंवा प्रेम यांस थारा नव्हता. त्यांतल्या त्यांत माधवरावाची प्रतिष्ठा व दरारा चहूंकडे बसलेला मॉस्टिन यास स्पष्ट दिसला. चुलत्यानें घात केला नसता तर मराठ्यांची सत्ता सर्व देशभर अविच्छिन्न बसण्याचा योग आला होता हा प्रकार मॉस्टिनच्या लेखांत दिसून येतो. मॉस्टिन परत गेला परंतु एकटा ब्रोम मागें पुण्यास वर्ष सहा महिने राहिला. अर्थात् धोडपचा प्रसंग व दादाची इतिश्री ब्रोमनें स्वतः त्या वेळीं पाहिली. हैदरानेंही त्यावेळीं मद्रासवर चाल करून इंग्रजांची त्रेधा कशी उडविली तोही प्रकार वाचकांचे लक्षांत पाहिजे. माधवरावास पेशवाईवरून काढण्याचा व्यूह इंग्रज रचीत होते, पण हैदराच्या चढाईमुळें तो साधला नाहीं. इंग्रजांनीं हैदरास शरण जाऊन त्याशीं जोडलेला ता. २ एप्रिल स. १७६९ चा तह आणि त्याच संधींत ता. २३ मार्च स. १७६९ रोजीं माधवरावानें भोसल्याशीं ठरविलेला कनकापुरचा तह हे दोन बनाव त्या वेळचें राजकारण उत्कृष्ट व्यक्त करितात. †

त्या वेळचे स्नेह किंवा गट हे आजकालच्या प्रमाणेंच वाळूच्या भुसभुशीत पायावर उभारलेल्या इमारतीसारखे डळमळीत असत. § पेशवा, निजाम, इंग्रज व हैदर हे चार सत्ताधीश त्या वेळीं हिंदी राजकारणांत प्रमुख असून ते वेळ पडेल त्याप्रमाणें पाहिजे तसे करार लिहून देत आणि आपले मतलब साधीत. प्रेमाची घोषणा केवळ शब्दांत व्यक्त करायची पण अंतःकरणांत बुडाशीं कपट असा प्रकार चाले. हैदर व निजाम यांनीं संगनमत करून मद्रासकर इंग्रजांस जेरीस आणिलें. इंग्रजांचें आक्रमण त्या वेळीं चहूंकडे स्पष्ट दिसूं लागून त्यांज-

---

† पहा बानर्जी कृ० माधवराव टीप पृ० १२७ चें विवेचन.

§ " It was an age of shifting alliances and treacherous friendships, " Bannarji in Peshwa Madhaorao I, pp. 121–125.

बद्दल देशांत द्वेष पसरत चालला होता. त्यांचा पाडाव करण्यासाठीं विरुद्ध कारस्थान बनूं लागलें. निजामअलीचा मुख्य कारभारी व सल्लागार त्याचा भाऊ मीरमोगल ऊर्फ रुक्नुद्दौला या कारस्थानाच्या वाटाघाटीसाठीं स. १७६९ च्या पावसाळ्यांत पुण्यास आला. आरकाटकर महंमदअलीच्या तर्फेनें चंदासाहेबाचा पुत्र राजासाहेबही त्या वेळीं पुण्यास माधवरावाकडे आला. इंग्रज वकील ब्रोम पुण्यास येऊन बसला त्यानें या भीषण कारस्थानाची बातमी वरिष्ठांस कळवून लिहिलें कीं हैदरअलीचे वकील पेशव्याचें साह्य मागण्यासाठीं पुण्यास आले आहेत. पण माधवरावानें धूर्तता वापरून आपली तयारी पूर्ण होईपर्यंत अंतःकरणाचा ठाव लागूं न देतां इंग्रजांविरुद्ध शस्त्र उचललें नाहीं. भोसल्याचें पारिपत्य त्याला यासाठींच करावें लागलें. मराठमंडळाची भक्कम एकी बनविल्यावर इंग्रज व निजाम या दोघांसही उखडून काढण्याचे विचार पेशव्याच्या मनांत घोळत होते. आरकाटच्या महंमदअलीजवळ मराठा वकील होता, त्यानें त्यास एकदां प्रसंगानें असेंही कळविलें कीं निजामअलीच काय, पण आसोफजाच्या समस्त कुटुंबाचा दक्षिणेंतून उठावा करून शहाआलम बादशहाच्या मुलास हैदराबादची सुभेदारी देण्याचा विचार पेशव्यानें केला आहे. सारांश हें राजकारण आहे. अनेक विचार मनांत खेळतात, त्यांतून अंतीं घडेल तें खरें असा परिणाम होतो. †

पुढील वर्ष दोन वर्षांत माधवरावाचा प्रभाव देशांत चहूंकडे व्यक्त झाला. बादशहा मराठ्यांचे आश्रयास येऊन राहिला. तेव्हां पुण्यास आपला कायम वकील ठेवण्याची निकड मुंबईकरांस उत्पन्न झाली. लंडनाहूनच त्यांस तसा हुकूम आला. तेव्हां पुनरपि त्यांनीं मॉस्टिन याची त्या कामीं नेमणूक करून त्यास पुण्यास पाठविलें. ता० ९ फेब्रुवारी स. १७७२ रोजीं मॉस्टिन पुण्यास पोंचला, त्या वेळीं माधवराव बाहेर स्थलीं उपचारासाठीं राहत असून ऑक्टोबरांत त्यानें मॉस्टिनची ही नेमणूक मंजूर केली. पुढें माधवरावाचा मृत्यु, नारायणरावाची स्थापना व आठ महिन्यांनीं त्याचा वध हे प्रसंग घडले, ते मॉस्टिन पुण्यास बसून स्वतः पहात होता.

**९. साडेतीन शहाणे**—पेशवाईच्या कारभारांत साडेतीन शहाण्यांची प्रख्या प्रचलित असलेली लौकिकांत आढळते, तिचा उगम बहुधा माधवरावाचे वेळीं झाला असावा. म्हणून त्याची स्पष्टता येथें करणें युक्त होईल. देशांत

† बानर्जीकृत माधवराव पे०, पृ० १०२.

एकच सार्वभौम सत्ता नसतांना निरनिराळ्या सत्ताधीशांमध्यें एकमेकांना हाणून पाडण्याची स्पर्धा लागते, असा हा माधवराव पेशव्याचा काळ असून प्रत्येक सत्ताधीशाजवळ सूत्रचालक म्हणून कोणी तरी नामांकित सल्लागार राजकरणांत पुढाकार घेई. प्रत्येकानें आपल्या बुद्धिकौशल्यावर इतरांस आहारीं आणावें अशी चढाओढ चाले. शहाआलम, शुजाउद्दौला अशा उत्तरेच्या सत्ता सोडल्या तरी दक्षिणेंतच पेशवे, निजाम व नागपुरकर भोसले या तिघांचा निकट शेजार एकमेकांना खुपल्याशिवाय राहत नसे. त्यांच्या पदरच्या तीन व्यक्ति त्या वेळीं लौकिकांत प्रसिद्ध होत्या, पेशव्यांचा सखारामबापू बोकील, निजामाचा विठ्ठल सुंदर परशुरामी व भोसल्यांचा दिवाकरपंत चोरघोडे. ही देशस्थ ब्राह्मणत्रयी कांहीं काळ दक्षिणचें राजकारण खेळवीत असतां पेशव्याचे दरबारीं फडणीस, पटवर्धन वगैरे कोंकणस्थ मंडळी माधवरावाचा पुरस्कार करण्यांत अग्रेसर होती. हळूहळू निजाम व भोसले या दोघांवरही माधवरावानें आपल्या कर्तबगारीची छाप बसविली. याचा परिणाम लौकिकांत असा झाला कीं अल्पबळ कोंकणस्थांपुढें देशस्थ शहाणे हलके पडले. नाना फडणिसासारख्या अर्ध्या शहाण्यानें तीन देशस्थ शहाण्यांना निष्प्रभ केलें असा भावगर्भ ह्या साडेतीन शहाण्यांच्या आख्यायिकेंत सूचित आहे. यास्तव तत्कालीन प्रसिद्ध व्यक्तींनीं राजकरण कसें खेळविलें हें समजून घेणें इतिहासास जरूर पडतें. सखारामबापू व नाना फडणीस यांचा परिचय वाचकांस पूर्वीं आहेच. दुसऱ्या दोघांची थोडी स्पष्टता सांगितली पाहिजे.

**दिवाकर पुरुषोत्तम** ऊर्फ देवाजीपंत हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण कोन्हेरराम कोल्हटकर याजपाशीं शागीर्द असून केवळ अंगच्या बुद्धिमत्तेनें नागपुरकरांच्या कारभारांत उदयास आला. रघूजी भोसल्याचे पश्चात् सेनासाहेब सुभा हें पद जानोजीस मिळवून देण्याची खटपट देवाजीपंतानें नानासाहेब पेशव्याकडे केल्यामुळें त्याजवर जानोजीचा विश्वास बसला, त्या कामीं सखारामबापूशीं त्याचा स्नेह जमून त्या दोघांनीं पुढें माधवरावाचे वेळेस दादाचा पुरस्कार केला. त्यांनीं निजामाकडील विठ्ठलसुंदरास सामील करून कांहीं अंशीं माधवराव पेशव्यास पेचांत आणिलें. पैकीं विठ्ठलसुंदराचा निकाल राक्षसभुवनावर लागला; परंतु दिवाकरपंतानें जानोजीचे मार्फत माधवरावास अडचणींत आणण्याचा प्रयत्न चालविला. जानोजी भोसले पेशव्याची हुकमत मानीनासा झाला, तेव्हां त्याजला युद्धांत नरम करून माधवरावानें नवीन शिस्त शिकविली त्या प्रकरणांत

पेशव्याची पंतावर वक्रदृष्टि झाली. स. १७६८ त तो तडजोडीस आला असतां पेशव्यानें त्यास अटकेंत ठेविलें आणि कनकापुरचा तह आपल्या मर्जीप्रमाणें सिद्धीस नेला. त्या प्रकरणांत कलहाचें मुख्य बीज देवाजीपंत होय अशी पेशव्यानें जानोजीची खात्री पटवून त्यास कारभारांतून काढविलें. माधवराव व जानोजी दोघेही पुढें दिवंगत होऊन नारायणरावाच्या वधानें इंग्रज-मराठ्यांचें युद्ध जुंपलें, त्यांत दिवाकरपंतानें अनेक उलाढाली केल्या, त्यांचें वर्णन यथास्थळीं येईल. हा दिवाकर ऊर्फ देवाजीपंत ता. १५ जुलई स. १७८१ रविवारीं नागपुर येथें मृत्यु पावला. §

तिसरा शहाणा विठ्ठल सुंदर परशुरामी, यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण, मूळ वसती संगमनेर, रामदासपंताचे विद्यमानें निजामअलीजवळ नोकरीस राहिला, मोठा बुद्धिमान, महत्त्वाकांक्षी, उलाढाली करण्यांत निष्णात. पेशवाईंतील घडामोडींचें निरीक्षण करून त्यानें निजामअलीचा जम बसवून दिला. सिंदखेडची मोहीम, इब्राहीमखान गार्द्याचा पुरस्कार, सलाबतजंगाचा निकाल अशा महत्त्वाच्या प्रकरणांत धूर्ततेनें वागून निजामअलीची व्यवस्था लाविली, म्हणून त्याजवर त्या सत्ताधीशाची मर्जी कायम झाली. पानिपतावर मराठ्यांचा संहार झाला त्या संधीचा व पेशव्यांच्या अंतःकलहाचा फायदा घेऊन त्यानें निजामाची सत्ता वाढवून मराठ्यांच्या राज्यास अपाय करण्याचा उद्योग आरंभिला. लष्करी डावपेचांतही तो निष्णात होता. गमाजी यमाजी मुतालिक विठ्ठल सुंदराचा व्याही असून त्याचे मार्फत प्रतिनिधीस व देवाजीपंताचे मार्फत जानोजी भोसल्यास वळवून विठ्ठल सुंदरानें पेशवाईचा भयंकर उच्छेद केला. या अडचणीनें मराठ्यांच्या प्रखर तेजास पाणी चढून माधवराव पेशव्यानें राक्षसभुवनावर विठ्ठल सुंदर व त्याचा पुतण्या विनायकदास या दोघांची इतिश्री केली, तो वृत्तांत पूर्वी सांगितलाच आहे. "राजबहादूर प्रतापवंत" असा किताब विठ्ठल सुंदरास निजामशाहींतून मिळाला तो चालू आहे. याची जागीर निजामशाहींत 'गणेश' नांवानें ओळखली जाते.

वरील तिघेही पूर्ण शहाणे जवळजवळ समवयस्क सन १७६३ त सुमारें ४५ उमरीचे असावे. अर्धा शहाणा नाना फडणीस त्यांचेहून वीसपंचवीस वर्षांनीं लहान. नाना प्रकारच्या कारस्थानांनीं एकमेकांचे डाव मोडून काढावे; आचारी, पुजारी वगैरेंच्या द्वारें बातम्या काढून शहास प्रतिशह द्यावा, मोठ्या

§ Forrest p. 463; ख. २६३८; रा. खं. १०.२६५; पर० द० म० व० ६ पृ. ४३; ऐ. सं. सा. ३.११८.

माणसांस अडचणींत गांठून पैसे काढावे, धन्यास रडकुंडीस आणून आपल्या-शिवाय तरणोपाय नाहीं अशी त्याची भावना करावी, अशा प्रकारचे या मुत्सद्द्यांचे खेळ चालत त्यांस शहाणपण म्हणत! बुद्धिबळाचे खेळांतील प्यादें मागें घ्या, कानावर जानवें ठेवा, सचिवपंताकडे नथ पाठवा, अशा सांकेतिक क्लृप्त्या यांच्या अकलेच्या निदर्शक होत. * राज्याची अनास्था उघड दिसत असतां ती सुधारण्याकडे बुद्धीचा व्यय न करितां, त्यांतून स्वतःचा मतलब साधण्याची तत्कालीनांची प्रवृत्ति असे. मुख्यतः पेशवाईतील चुलते-पुतण्यांच्या कहलांत यांचे हे खेळ विशेष गाजले, तेणेंकरून समाजांत ब्राह्मण जातीबद्दल अनादर उत्पन्न झाला.

नाना फडणीस माधवरावाचे शिस्तींत वाढला. माधवरावानें या शहाण्यांच्या खटपटी हाणून पाडतांना नानाचा उपयोग केला. एकास स्वर्ग दाखविला, दुसऱ्यास कैदेंत घातलें, तिसऱ्यास निर्माल्य बनविलें. सत्य, निष्पक्षपात, हुकमाची बजावणी, वचन पाळणें अशा गुणांनीं माधवरावानें राज्यकारभारास उच्च व निर्मल स्वरूप आणिलें, हा प्रकार नाना फडणिसानें शक्य तितका पुढें चालविला. त्यावरून अर्ध्या कोंकणस्थ शहाण्यानें तीन देशस्थ शहाण्यांस जिंकलें अशा उपरोधिक अर्थाचा जातिनिष्ठ भाव या साडेतीन शहाण्यांच्या आख्यायिकेंत अभिप्रेत आहे. सख्या, देवा, विठ्ठला हीं तीन नांवें पूर्ण-शहाण्यांचीं प्रचलित असलीं तरी रायरीकर, चंद्रचूड, काळे अशी कित्येक मंडळी त्याच मासल्याची होती. उलट पक्षीं रामशास्त्री प्रभुणे देशस्थ असूनही माधव-रावाच्या रेखीव पद्धतीचा गुरुच म्हटला तरी चालेल. साडेतीन शहाणे या शब्दप्रयोगांतच मराठ्यांचें बुद्धिवैभव व्यक्त होतें. त्या बुद्धीचा उपयोग स्वराज्य-संवर्धनाकडे झाला कीं तो मुत्सद्दी ठरतो. पण तीच बुद्धि तो राज्याला अपाय करण्यांत वेचूं लागला म्हणजे इतिहासांत त्याला राजद्रोही संज्ञा प्राप्त होते. या देशस्थ शहाण्यांचा कैवार घेणारे टीकाकार ही वरील कसोटी विसरतात. बारभाईच्या कारस्थानांत सखारामबापूनें पुढाकार घेऊन राज्यसंरक्षण केलें याबद्दल त्याला सर्वतोमुखीं शाबासकीच मिळते. पण माधवरावाचे कारभारांत दादाचा पक्ष घेऊन या मंडळींनीं राज्यास अपाय केला, म्हणून हे शहाणे दोषास प्राप्त होतात.



---

* रा. खं. ६·४३२ आख्यायिका.

## ७. कालसूची – मृत्यु व योग्यता

| | | | |
|---|---|---|---|
| स. १७४५ | फेब्रु० | १६ | माधवराव जन्म. |
| ,, १७५३ | डिसें० | ९ | ,, लग्न रमाबाईशीं. |
| ,, १७६१ | जुलई | २० | ,, पेशवाईचीं वस्त्रें. |
| ,, १७६७ | जाने० | | लष्करी गोठांची गणति घेतली. |
| ,, १७६८ | मार्च | ४ | सरंजामीयांचे धारे बांधून दिले. |
| ,, १७६९ | ऑगस्ट | | नारायणरावास चालचलाऊ कारभार दिला. |
| ,, ,, | डिसें० | ३० | पुण्यास शतचंडी अनुष्ठान. |
| ,, ,, | जून | ८ | कृष्णेवर चंद्रग्रहणार्थ सुवर्णतुला. |
| ,, १७७० | डिसें० | | मिरजेवर प्रकृति बिघडून परत पुण्यास. |
| ,, १७७१ | | | वर्षभर हवाफेर पुण्याबाहेर. |
| ,, ,, | एप्रिल | १८ | गोपिकाबाई पुण्यास पेशव्याच्या भेटीस. |
| ,, ,, | जून | २६ | कटोऱ्यास सुवर्णतुला. |
| ,, ,, | ऑगस्ट | ३० | नारायणरावास खास उपदेश. |
| ,, ,, | ऑक्टो० | ८ | फिरंगी वैद्याचें औषध. |
| स. १७७२ | मार्च | | दादाचा प्रतिबंध दूर केला. |
| ,, | एप्रिल | ४ | रमाबाईची हरेश्वरची यात्रा. |
| ,, | मे | १६ | जानोजी भोसले मृ०. |
| ,, | जून | २० | नारायणराव व सखारामबापू ह्यांस कारभार दिला. |
| ,, | ऑगस्ट | ४ | बाबूराव फडणीस व रामाजी महादेव मृ०. |
| ,, | सेप्टेंबर | ३० | माधवरावाची मृत्युपत्रवजा शेवटची आज्ञा. |
| ,, | ऑक्टो० | ६ | दादाचा फितूर, पुनः प्रतिबंध. |
| ,, | ,, | १० | थेऊर येथें पटवर्धनांची भेट. |
| ,, | नोव्हें० | १ | रमाबाईस सहगमनाचा आदेश. |
| ,, | ,, | ६ | भूमिशय्येवर काढले. |
| ,, | ,, | ७ | सर्व प्रायश्चित्त घेतलें. |
| ,, | ,, | १८ | महाप्रयाण, रमाबाई सती. |

# मृत्यु व योग्यता

## स. १७७२

१. अंतकाल. २. निरवानिरव. ३. शेवट.
४. कौटुंबिक, रमाबाई. ५. मातुश्री गोपिकाबाई.
६. कर्तृत्वाचा आढावा. ७. हिशेबी कारभार.
८. कडक शिस्त. ९. लायक माणसांची पैदास.
१०. विहंगमावलोक.

**१. अंतकाल** — माधवरावाच्या शारीरिक व मानसिक शक्तीस अल्पावधींत केवढा ताण पडला असावा याची कल्पना वाचकांस सहज होईल. कौटुंबिक व बाह्य उपाधि, स्वाऱ्यांचे व प्रवासाचे श्रम, राज्यकारभाराच्या अविरत विवंचना यांत त्याचें ऐन वाढीचें तारुण्य खर्च झालें. आश्चर्य वाटायचें तर इतका तरी ताण त्यानें कसा सहन केला असेल याबद्दल. अकरा वर्षांच्या त्याच्या कारभारांत निदान सात तरी मोठ्या व पांचचार लहान स्वाऱ्या निर्दिष्ट आहेत. स्वारींत असतांनाही रोजचीं राज्यकारभाराचीं कामें तो नित्याप्रमाणें चालवी. शिवाय सेनानायकाचें व तहाच्या बोलाचालीचें काम तो स्वतःच करी. स. १७७० अखेरीस कर्नाटकाकडे प्रयाण करीत असतां प्रकृति बिघडल्यामुळें त्यास मिरजे-वरून परत यावें लागलें, तेव्हांपासून त्याच्या बाह्य हालचाली बहुधा बंद पडल्या. शेवटचीं हीं दोन वर्षें पुणें, नासिक, नगर एवढ्या टापूंत प्रकृतीचे उपचार व हवाफेर करण्यांत गेलीं. पहिल्या नऊ वर्षांत पावसाळ्याचे चार महिने मात्र त्याचे पुण्यास जात, पण त्यांतही विश्रांति अशी त्यास थोडीच मिळे. हिशेब, सरदारांच्या भानगडी, राज्यकारभाराचे प्रश्न हे विषय पुण्याच्या मुक्कामांत तो उरकीत असे.

माधवरावानें स्वतः कर्नाटकांत चार स्वाऱ्या केल्या आणि राहिलेलें काम त्याच्या हस्तकांनीं पुरें केलें. शेवटच्या अडीच वर्षांत उत्तर हिंदुस्थानांत फौजा पाठवून तिकडील कारभार पेशव्यानें पुरा केला आणि पानिपतपूर्वीचे वडिलांचे संकल्प सिद्धीस नेले. दोन छत्रपती, प्रतिनिधि, नागपुरकर व अक्कलकोटकर भोसले, सिंदे, होळकर, गायकवाड हे प्रमुख व दाभाडे, मुरारराव घोरपडे असे दुसरे

अनेक सरदार यांचे बंदोबस्त न्यायनिष्ठुरतेनें परंतु दयार्द्र अंतःकरणानें त्यानें ठरवून दिले. निजाम, दिल्लीचा बादशहा, अयोध्येचा वजीर, राजपूत राजे, शीख, जाठ, इत्यादि परकीय मंडळीचे व्यवहार स्वराज्यपोषणाच्या दृष्टीनें निर्गमांत आणिले आणि पानिपतानें बिघडलेली मराठी राज्यकारभाराची घडी पुन: बसवून दिली. थोडक्यांत सांगायचें तर पूर्वीच्या तीन पिढ्यांच्या कारभारांत राहिलेली अपूर्तता व उघडकीस आलेल्या चुका सुधारून माधवरावानें राज्याचा गाडा सुरळीत मार्गावर आणून ठेविला. एवढें काम करण्यांत त्यास किती त्रास व केवढे श्रम पडले असतील याची कल्पना करावी. हा जो अपरिमित ताण प्रकृतीवर पडला त्यानें क्षयरोगाच्या सुप्त बीजांस अंकुर फुटून तो उत्तरोत्तर अनावर झाला. नाना उपचार केले ते व्यर्थ जाऊन शेवटीं त्यासच हा थोर व तरुण पेशवा अकालीं बळी पडला. त्याची शरीरयष्टि उंच, थोराड व बळकट होती, परंतु ह्या व्याधीमुळें तिला मांसलता अशी कधींच आली नाहीं. त्यांत कदाचित् विषयवासनेची भरही पडली असल्यास नकळे. स्वारींत बायको बरोबर असून प्रकृति ठीक नसल्यामुळें तिला परत पाठविल्याचे उल्लेख आढळतात. † आरंभीचें कोमल, गौर, नयनमनोहर रूप श्रमानें, काळजीनें व कठोर निग्रहानें पुढें पुढें निस्तेज व निःसत्व बनलें. डोळे पाणीदार व चेहरा उग्र होता. कोणासही समोर जाऊन वर पाहण्याची छाती होत नसे. बहुधा पुढें जाण्यास लोक कांपत असत. राजयक्ष्मा हा रोगच असा आहे कीं मनुष्य त्यामुळें तिरसट, चिरचिरा व दुराग्रही बनतो, पण स्वतःविषयीं बहुधा निराश होत नाहीं. सर्वांनीं आशा सोडल्यावरही ह्या पेशव्यानें आणखी सहा महिने जास्त काढले. या आजाराचें व अखेरच्या सर्व घडामोडींचें वर्णन या ठिकाणीं समकालीन लेखांतून जास्त तपशीलवार सांगणें जरूर आहे.

स. १७६९ चे पावसाळ्यांत प्रकृतीचे कारणानें कामें उरकत ना म्हणून महादाजीपंत गुरुजींनीं नारायणरावाजवळ बसून ताकीदपत्रांवर मखलाशी करावी, म्हणजे अखेरचे निकाल द्यावे, असा ठराव पेशव्यानें केला. पुढें दसरा होऊन पेशवा कर्नाटकचे स्वारीस निघाला तेव्हां प्रकृति सुधारण्यास्तव पुण्यांत शंभर ब्राह्मणांकडून मृत्युंजयाचा कोटिजप करण्यांत आला. या जपासंबंधीं गोपिकाबाईनें नाना फडणिसास सक्त ताकीद लिहून पाठविली कीं, "ब्राह्मण

---

† पे. द. २०. २०८.

लावले ते अनुष्ठान समाप्तीपर्यंत वाड्यांतच गहूं द्यावे. त्यांनीं यजमानास आरोग्य होण्याविषयीं प्रार्थना करीत जावी. कोणी त्वरेनें जप करतो, कोणी सावकाश करतो, तर आठ पंधरा दिवस जास्त लागले तरी हरकत नाहीं, पण जप सांग करावा. अनुष्ठानावर नजर ठेवण्यासाठीं शिष्ट ब्राह्मण कोण ठेविले त्यांचीं नांवें लिहून पाठवावीं. कांहीं व्यंग पडूं न द्यावें. ब्राह्मणांनीं वाड्यांतच निजावें, व्रतस्थ राहावें, उत्तम परीक्षेनें ब्राह्मण लावावे." नानानें या आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था ठेवून तसें बाईस नाशकास लिहून पाठविलें. स. १७७० च्या एप्रिलांत कर्नाटकांत पेशव्याची प्रकृति बिघडली तरी त्याचा विचार छावणीस तिकडेच राहण्याचा होता, इतक्यांत निजगल किल्ल्यावरील हल्ल्यांत नारायणरावास जखम झाली, तेव्हां लोकांच्या आग्रहास्तव त्रिंबकराव पेठ्यास स्वारीचें काम सोंपून माधवराव जूनचे आरंभीं पुण्यास परत आला. रस्त्यांत ज्येष्ठ शु० १५ च्या ग्रहणास ( ८ जून १७७० ) सुवर्ण तुला केली. उभयतां बंधू शरीरें-करून बरे आहेत असा उल्लेख जुलईंतला आहे. उपरांत श्रावणमासची दक्षणा थाटांत झाली. ब्राह्मण पुष्कळ जमले म्हणून दक्षणा दरसालपेक्षां कमी दिली. ऑगस्टांत पेशव्यास कळून चुकलें कीं आपल्या हातून काम रेटत नाहीं, आणखी ताण पडल्यास प्रकृति टिकणार नाहीं, म्हणून त्यानें नारायणरावास दिवाणगिरीचीं वस्त्रें देऊन सखारामपंतास मुतालकीचीं वस्त्रें दिलीं; उभयतांनीं एकत्र बसून सर्व कारभार करावा असें ठरविलें. आपलें काम कमी होऊन नारायणरावास अनुभव मिळावा असा यांत दुहेरी हेतु होता. परंतु सखारामबापूनें कारभारांत झटून मन घातलें नाहीं. गंगाधरतात्या, चिंतोविठ्ठल इत्यादींची अपेष्टा पाहून सखारामबापूच्या जिवास मोठी धास्ती वाटे. हैदरास पुरा करून कर्नाटक तरी संपूर्ण ताब्यांत आणावें ही चिंता पेशव्यास अहर्निश लागलेली होती. कारण अद्यापपावेतों त्याचा एकही कार्यभाग निर्वेध तडीस गेला नव्हता. स. १७७० त सेप्टेंबरच्या आरंभीं डेरे दाखल होऊन कर्नाटकांत निघणार इतक्यांत जानोजी भोसले भेटीस येणार म्हणून पेशव्याचें जाणें लांबलें. कार्तिकांत त्यांची भेट जेजुरीस होऊन दोघे महिनाभर बरोबर होते. उभयतांचें सौरस्य चांगलें झालें. पण पेशव्याची प्रकृति घटकोघटकीं बिघडूं लागली. स्वारींत मेहनत निभावणार नाहीं असें त्याचें त्यासच कळून चुकलें. औषध उपचार एका जागीं बसूनच केले पाहिजेत सबब परत जाणें प्राप्त आहे, असें त्यानें ता० १२ डिसेंबरास पेठ्यास लिहून कळविलें आणि मातुश्रीसही

लिहिलें कीं, "आज्ञेप्रमाणें पथ्य करीत आहें. जेवण औषध मोरोबा व राजेश्वरभट यांचे सांगितल्याप्रमाणें करतां. यानंतर दिवसेंदिवस समाधान वाटल्यास वडिलांचे सेवेसीं यावें हेंच मानस आहे." पूजेस फुलें व पथ्यास भाजी वगैरे लागे त्याची तजवीज स्वारींत सुद्धां दक्षतेनें ठेवण्यांत येत असे. मातुश्रीनें पुण्यास येऊन आपलेजवळ राहावें असें पेशव्यानें तिच्या कारभाऱ्यास लिहिलें. "माझे वाटची बहुत विनंती करून लवकर येणें होय तें करणें. जसें त्यांस गंगापूर सोडून यावेंसें वाटत नाहीं, तसेंच आम्हांस घरीं आल्यावर बाईसाहेब नसल्यास कठिण होतें. सबब विनंती करून लवकर येत तें करणें." परंतु गोपिकाबाई पुण्यास आली नाहीं. माधवराव नाशकास जाऊन तिला भेटून परत आला असें दिसतें.

स. १७७१ चें साल हवाफेर व औषधोपचार यांतच खर्च झालें. नासिक, नगर, पुणें ह्या दरम्यान त्याचे मुक्काम झाले. दादास मुक्त करून कलह मिटवावा असेंही अनेक प्रयत्न चालले. पेशवा सिद्धटेकास असतां "दादांकडे मुत्सद्दी जाऊन बोलून आले. सात लक्षांची जागीर व त्र्यंबक किल्ला द्यावा असा मनसबा आहे." पुढें थेऊर येथें उभयतांची भेट होऊन माघारे पुण्यास बरोबर आले. दादा आनंदवल्लीस जाणार अशी स. १७७१ फेब्रुवारीची नोंध आहे. अर्थात् सौरस्य झालें नाहीं. एप्रिलचें वर्तमान. "प्रकृति आहे तशीच आहे. दरबार सवाल जाब होत नाहीं. चित्त स्वस्थ नाहीं. पेशव्यास पुण्यांत राहणें गोड वाटत नाहीं. मर्जीस येतें तेव्हां बाहेर निघावें, कोणाचें फारसें ऐकूं नये, अशी क्षणभंगुर मर्जी झाली आहे. मातुश्री गंगापुराहून आल्या हा उल्लेख * खरा असेल तर गोपिकाबाई स. १७७१ च्या एप्रिलांत थोडे दिवस पुण्यास येऊन भेटून गेली असावी. पुढील जुलईंत तिचा मुक्काम गंगापुरास होता. जून महिन्यांत प्रकृतीस बराच आराम पडला. "पंधरावीस दिवस पोटांत तिडीक उठत नाहीं. मोरोबादादाच्या बागांत राहिले आहेत. तेथून थेऊरास जाणार." आरामाची वातमी ऐकून लोकांस आनंद झाला. §

गोदावरीच्या कांठीं टोक्याजवळ कटोरें म्हणून गांव आहे, तेथें माधवराव हवाफेरासाठीं कांहीं दिवस जाऊन राहिला. "गोविंद शिवराम व हरिपंत फडके

---

* ख. ११३५; पे. द. ३७·१७१.

§ पोटदुखीचा राजयक्ष्मा म्हणजे Intestinal T. B. हाच माधवरावाचा व्याधि होय.

बरोबर होते. रमाबाईसुद्धा मातुश्री गंगापुरास गेली. पुण्यास नारायणरावांजवळ मोरोबा फडणीस सर्व कारभार करितात. नाना फडणीस देखील कांहीं करणें तें मोरोबांस पुसून करितात. कृष्णराव बल्लाळ व महादाजीपंत गुरुजी नेहमीं दरबारांत असतात. श्रीमंतांबरोबर फारसे कोणी नाहींत. औषध घेत आहेत. कटोऱ्यास आषाढ शु० १, २६ जून ला सुवर्णतुला झाली. सप्तशृंगीचे स्वामी व कटोऱ्याचे स्वामी उभयतां अंगारा व तीर्थ देत असतात. उभयतां स्वामींची अट आहे कीं दादास मोकळिक करावी. हकीम, वैद्य वगैरे औषधें देतात. कटोऱ्यास कांहीं गुण वाटत आहे." ( जुलई स. १७७१ ).

२. **निरवानिरव** — प्रकृतीस बरें वाटूं लागल्यावरून माधवरावानें नारायणराव व इतर कारभारी यांस कटेरें येथें निकडीनें बोलावून घेतलें. तेथें नारायणरावास उपदेश केला त्याची नोंध ता. २८ ऑगस्ट स. १७७१ ची आहे ती अशी: ( १ ) बचाजीपंतावर कृपा करावी ; ( २ ) नाना फडणिसांशीं बहुत सख्य ठेवावें ; ( ३ ) रमावहिनीशीं सख्य असावें ; ( ४ ) पुण्यकर्म विशेष करावें ; ( ५ ) उदासीनता व क्रोध किंचित् कार्याकारण धरावा ; ( ६ ) इंद्रियनिग्रह करावा ; ( ७ ) पुस्तकांचा बंदोबस्त करावा ; ( ८ ) तीर्थरूपांची भेट झाल्यावर बोलून कृपा संपादन करावी ; ( ९ ) त्रिपदी पाठ करावी. नारायणरावाचा जन्म ता. १० ऑगस्ट स. १७५५ चा म्हणजे या उपदेशप्रसंगीं तो सोळा वर्षांचा होता. वरील प्रत्येक कलम सहेतुक स्पष्ट सांगितलें असल्यामुळें नारायणरावाचा स्वभाव पेशव्यास नापसंत पडून त्याजबद्दल भारी चिंता वाटत असली पाहिजे असें दिसतें. त्याच्या पुढील भवितव्याचें गमक या वरील नवविध आदेशांत थोडेंबहुत मिळतें.

ता. ८ ऑक्टोबर १७७१ ला पेशवा मातुश्रीस लिहितो, "शरीर-संरक्षण विशेष करावें, बाबा वैद्यांस व सखारामपंतांस सत्वर समीप आणावें म्हणून आज्ञा, त्यास सखारामपंत मागेंच येऊन तीर्थरूपांकडे गेले. बाबा वैद्यही सत्वरच येतील. माझें पत्र दुसऱ्यास कळूं न देणें म्हणून आज्ञा, त्यास मर्जीप्रमाणें करतों. प्रस्तुत माझी प्रकृति बरीच आहे. उरांत दुखत होतें तें बरें झालें आहे. पोटांतही फिरंग्याचें औषध घेतों."*

---

* हा गोव्याचा पोर्तुगीज गृहस्थ नांव "फ्रेड लियांद्र द माद्रिद द देऊस." ऐ. टि. २·२९ व ४-६.

यापुढें पांचसहा महिने पेशव्याची प्रकृति थोडी बरी झाली. १७७१ अखेर सरदारांनीं बादशहास दिल्लीस आणून तख्तनशीन केलें. कर्नाटकचा कार्यभागही त्रिंबकरावानें बरा उरकला. ह्यामुळें पेशव्याचें भाग्य शिखरास चढून त्याच्याही मनास धीर आला. पानिपतचा कार्यभाग सिद्धीस गेल्यानें मराठी राष्ट्रांत पेशव्याच्या कर्तृत्वाबद्दल उत्कट आदर उत्पन्न झाला. एप्रिलांत जानोजी भोसले येऊन माधवरावास भेटला. दादास मुक्त करावें, म्हणजे आपणांस आरोग्य पडेल असा आग्रह जानोजीनें पेशव्यास केला तदनुसार फाल्गुनांत पेशव्यानें दादाचा प्रतिबंध दूर केला. तो पेशव्याविरुद्ध अनुष्ठान करतो असा समज होता.* जानोजीनें दुसरी विनंती पेशव्यास केली कीं आपले पश्चात् पुतण्या रघूजीस सेनासा०सुभा करून दौलत त्याचे नांवें चालवावी. अशी व्यवस्था ठरून जानोजी पंढरपुरास जाऊन तेथून पुढें तुळजापुरास गेला असतां निजामाचा सरदार धौशा याची भेट घेऊन परत आल्याबरोबर अंगाची काईल होऊन जानोजी भोसले ता. १६ मे १७७२ रोजीं अकस्मात मरण पावला. $

स. १७७२ च्या जूनपासून पेशव्याची प्रकृति पुनः बिघडत गेली. सर्वकाळ अंगाचा दाह. केळीच्या पानांच्या सुरळ्या आणून त्यांजवर निजवावें. त्याच संधीस गोपिकाबाईची प्रकृति गंगापुरास बिघडून गंगा विष्णु वैद्य यास तिच्याकडे पाठविलें. पालख्यांची डाक बसवून खुद्द माधवराव तिला भेटण्यास जाणार होता. पण आतां तशी शक्ति त्यास नव्हती म्हणून बेत राहिला. गोपिकाबाईनें काशीयात्रेस जाण्याची तयारी केली, तेव्हां दादानें गंगापुरास जाऊन तिला राहविलें. पुण्यांत कारभाऱ्यांनीं आपापले घरीं कामें न करतां सर्वांनीं वाड्यांत कचेरींत बसून कामें करावीं अशी आज्ञा पेशव्यानें फर्माविली. “स्वतः श्रीमंत २० जून रोजीं पुण्यास वाड्यांत आले. सखारामपंतास कारभार सांगितला. नारायणरावांनीं द्यावें देणें करावें. दादा आनंदवल्लीहून आले.” शतचंडीचें अनुष्ठान सिद्धीस नेण्यासाठीं नारायणराव थेऊरास गेला. भुतांग्रहांची बाधा काढण्यासाठीं खुद्द पेशवाही थेऊरास निघाला, परंतु तितकी ताकद नसल्यामुळें तो थेऊरास जाऊन राहिला. तेथें “प्रकृति जास्त बिघडली, त्यांत राग, लहर, श्रीमंती, घटकेंत डेरे उभारणें, घटकेंत पाडणें, मध्यरात्रीस कूच करणें, माणसें

---

* पु. द. ३ पृ. ११०. $ वैशाख शु. १५ श. १६९४ (ना. भो. ब.); पे. द. २०·३००, ३०१; भा. व. शा. इत्यादि.

नाहीं मिळालीं म्हणजे वैतागणें, असे प्रकार चालले. एके दिवशीं थेउरास मध्यरात्रीं निघून गेले. देवदर्शन व एक प्रदक्षिणा करून पथ्य घेतलें. रात्रीं लोक बरोबर गेले नाहींत त्यांस दुसरे दिवशीं मारहाण केली. ज्वरांश असतो. म्लान वदन आहे. दिवसेंदिवस मर्जी कठिण, पथ्य करीत नाहींत. वैद्यानें खाऊं नका म्हणावें तोच पदार्थ खावा, न दिल्यास शिवीगाळ करावी, (ऑगस्ट, १७७२)." याच संधीस ता. ४ ऑगस्ट रोजीं बाबूराव फडणीस,× मोरोबाचे वडील व कोंकणचे सुभे रामाजी महादेव मरण पावले. श्रीमंतांजवळ जिव्हाळ्याचा मनुष्य एक हरिपंत फडके. पुण्यांत दक्षणा वांटली, खर्च तीन लक्ष चार हजार झाला." पुण्याचा कारभार नारो आपाजीकडे होता.

"प्रकृति ठीक नाहीं तरी प्रातःकाळीं चार घटका व सायंकाळीं एक प्रहर दरबार व कामकाजें होतात. मोरोबादादाचा कारभार सखारामबापूकडे गेल्यामुळें तो रुसून पंढरपुरास गेला. आपली निभावणूक नाहीं असें पाहून पेशव्यानें कांहीं विशिष्ट करारावर चुलत्यास बंधमुक्त केलें. 'नजरबंद ठेवल्यानें उग्र अनुष्ठान करतात. सर्व काळ सूर्य अवलोकन करून हरणाचें दूध भक्षावें, हें कृत्य पुतण्यास बाधतें' असा सार्वत्रिक समज होता, त्यास मान देऊन पेशव्यानें चुलत्यास बंधमुक्त केलें. पण अशा संकटकाळीं सुद्धा दादाचा मूळ स्वभाव गेला नाहीं. ता० ६ ऑक्टोबर "विजयादशमीस बाहेर पडले आणि दोन हजार स्वार व गार्दी चाकरीस ठेवून निजाम, हैदर, भोसले यांस पत्रें लिहून आपल्या कुमकेस बोलाविलें. तुळापुरास पोंचले तों मागून लोक जाऊन फितुराचे कागदपत्रांसह पकडून आणिले. शागीर्दमंडळी सात असामी धरून बेड्या घालून किल्ल्यांवर पाठविले. कृष्णराव बल्लाळ तुळापुरास जाऊन दादा-साहेबांस आणून पहिल्याप्रमाणें सक्त नजरकैदेंत ठेविले. अमृतराव आनंदीबाई यांसही जप्तींत ठेविलें. कोणे गोष्टीची अनुपत पडूं देत नाहींत. दादासाहेब सूर्योदयीं स्नान करून अनुष्ठान करीत म्हणून." *

दादासाहेब कलिपुरुष, त्याचीच विवंचना माधवरावास अंतकाळीं मोठी लागली. शांतपणें तो पेशव्यास मरूंही देणारा नव्हे. सामदामानें दादास निभावून घेण्याची माधवरावानें पराकाष्ठा केली. कलह पेटल्यानें राज्याचें नुकसान कसें होतें हें तोच चांगलें समजून होता. घोडपचे संग्रामापासून दादास आला

× पु. द. ३, पृ. १०९. * म. सा. छो. ब.

बसल्यानंतरच माधवरावानें अनेक मोठीं प्रकरणें सिद्धीस नेलीं. स. १७७२ च्या मार्चांत दादास मोकळें करून पुढें २२ जून रोजीं सखारामबापूनें नारायणरावाजवळ बसून कारभार करावा असें पुण्यास येऊन ठरविलें आणि पुनः पेशवा थेउरास गेला. माझी व्यवस्था ठरवून द्या हा आग्रह दादानें चालविला, तेव्हां रामशास्त्री समवेत त्यास थेउरास आणवून पेशव्यानें आश्विन शु० ४ ता० ३० सेप्टेंबर रोजीं नऊ कलमी लेख पुरा करून दिला आणि त्यावर कारभाऱ्यांची लेखी कबुलात घेतली. * या यादीचा सारांश —

१. दौलतीस कर्ज आहे तें वारावयाचें, त्यास गुरुजीजवळ ऐवज आहे तो घेऊन तूर्त निवळ कर्जास द्यावा. दुसरा ऐवज, दौलतसंबंधी मसलत न करतां आधीं कर्ज वारावें. "कर्ज वारण्याविषयीं चित्तापासून जलदी करून वारूं. कदाचित् जरुरीची मसलत पडल्यास करावी लागेल. शपथपूर्वक लिहिल्याप्रमाणें करूं. दौलतसंबंधी ऐवजानें व गुरुजीकडील ऐवज माफक कर्ज वारून राहील तेव्हां ऐवज घेऊन रोकडीनें कर्ज वारूं."

२. कोंकणांत व देशांत इजारे झाल्यामुळें रयतेस सुख नाहीं, त्यास बारकाईनें मनांत आणून वाजवीचें रीतीनें जसें जाहलें असेल तें नीट करून प्रजापालन करावें.

३. श्री काशी प्रयाग हीं दोन स्थळें सरकारांत यावीं असा तीर्थरूपांचा हेतु होता. त्यास प्रस्तुत करण्याजोगे दिवस आहेत. प्रयत्न करून दोनही स्थळें हस्तगत करावीं.

४. मातुश्रींचा हेत काशीस जावयाचा आहे. त्यास सुपथ पडल्यावर यात्रा घडवावी.

५. भाऊसाहेबांची क्रिया माघमासीं जरूर उत्तम प्रकारें करवावी. काकूबाई जाऊत वा राहूत.

६. काशीचे ब्राह्मणांस वर्षासनें आहेत तीं पिढीजाद करून देऊन वर्षास पावतीं करीत जावीं.

७. काशीस दोन लक्ष ब्राह्मणभोजन करावें. दक्षणा दोन पैसेप्रमाणें द्यावी.

८. दादासाहेबांस पांच लक्षांची जागीर निवळ लावून द्यावी. याहून थोडें बहुत अधिक मागितल्यास त्यांचा संतोष व मर्जी प्रसन्न राखावी. "निदान सात लक्षांची जागीर देऊन मर्जी राखूं. अधिक मागूं लागल्यास ऐकूं नये."

---

* ए. स्फु. ले. ३·२३; पे. द. ३९·१३४.

९. श्रावण मासचा धर्मादाय पूर्वींपासून चालत आहे तसा चालवावा. पांच लक्षांची दौलत राही तावत्कालपर्यंत चालवावा. यासी अनमान करूं नये.

नऊ कलमें लिहिले अन्वयें श्रीगणपतीची शपथपूर्वक करूं. " या कलमावरून माधवरावाची मनोभावना व प्रजापालनदक्षता हे गुण चांगले व्यक्त होतात. कर्ज वारण्याविषयीं कटाक्ष आहे. हें कर्ज पन्नास लाखपावेतों असावें,‡ तरी खासगी ऐवज वगैरे देऊन एक कोटपावेतों कर्जें वारलीं असे लेख आढळतात. नाना फडणिसानें रामचंद्रपंत परांजप्याचे मार्फत सावकारांच्या सोडचिठ्या आणवून मरणापूर्वीं पेशव्यास कर्जमुक्त केलें. बाकीच्या कलमांपैकीं काशी-प्रयाग क्षेत्रें कधींच सुटलीं नाहींत; गोपिकाबाईची काशीयात्रा व भाऊसाहेबांची क्रिया या गोष्टी झाल्या नाहींत. पार्वतीबाई मेल्यावर क्रिया एकदम झाली. तत्पूर्वी सहगमन किंवा वपन करण्यास बाईनें विरोध दाखविला. वडील म्हणून दादास पोसावें, त्यानें स्नानसंध्या करून स्वस्थ चित्तें राहवें, याहून कारभारांत त्यास कांहींएक अधिकार माधवरावानें ठेवला नाहीं. सखारामबापू व नाना फडणीस यांनीं नारायणरावास घेऊन कारभार करावा अशीच व्यवस्था माधवरावानें अंतसमयीं ठरविली. वरील नऊ कलमी याद म्हणजे माधवरावाचें मृत्युपत्रच होय. यानंतर दीड महिन्यानें पेशवा मरण पावला. अखेरच्या दिवसांतील त्याच्या यातना किती तीव्र व दुःसह झाल्या असतील त्या कल्पनेनेंच जाणल्या पाहिजेत. तात्पर्यार्थ असा.

**३. शेवट**—ता० १० ऑक्टोबर रोजीं मोरोबा पटवर्धन लिहितो, " थेउरास भेटीस यावें म्हणून सांगून आल्यावरून आश्विन शु० ४ स निघोन गेलों. ते दिवशीं मर्जी ठीक नव्हती, म्हणून भेट न जाहली. दुसरे दिवशीं श्रीमंतांनींच स्मरण करून बोलावूं पाठविलें, तेव्हां सर्व मंडळी घेऊन गेलों. दर्शन झालें. एक घटका आंत होतों. श्रीमंतांनीं पुसलें, तुमची प्रकृति कशी आहे ? औषध घेत असतां कीं नाहीं ? वरकडांसही हे कोण, हे कोण म्हणून विचारलें. उपरांतिक सर्वांस विडे दिले. " रमाबाई बहुतेक पुण्यास असे. थेउरास नव्हती. तेथें संनिध नेहमीं हरिपंत फडके, कारकून इच्छाराम ढेरे व हुजऱ्या चापाजी टिळेकर असत. शेवटीं शेवटीं प्रकृतिमान विकोपास गेलें. "आश्विन वद्यांत दादासाहेबांसही थेउरास आणविलें. प्रकृति बिघडतच चालली.

‡ इ. सं. पे. द. पृ. २०२.

मोठाच वाखा झाला. कांहीं बाकी नव्हती. ईश्वर काय करतो नकळे. अवस्था फारच कठिण. औषध घेण्याचें टाकलें. कार्तिक वद्यांत वरचेवर घाबरे होऊं लागले. त्रिंबकराव मामास पुण्याचे बंदोबस्तास पाठविलें. थेउरास वाड्यांत होते ते गणपति देवळाच्या आवारांत ओवऱ्यांत येऊन राहिले. सर्व मंडळी झाडून थेउरास आली आहेत. दादासाहेबांस व सखारामपंतांस म्हणाले, कीं "आपल्या हातून वेदना सोसवत नाहींत, खंजीर द्या, पोटांत खुपसून घेतों." तेव्हां दादासाहेबांनीं शपथ घेऊन सांगितलें, रविवारपर्यंत गुण न आला तर खंजीर देतों. त्यावरून पुनः दुसरे दिवशीं खंजीर मागितला. बहुत रागें भरले. अर्जुनवाद्यें केलीं. ज्वर नव्हता तरी नुसत्या संतापानें घाबरे झाले. सर्व लोक उपाशींच होते हें कळतांच आपण पथ्याचें घेतलें, तेव्हां सर्व लोक जेवले. श्री गणपतीस जलाची संतत धार धरली आहे. ज्वरशांति व अनुष्ठानास ब्राह्मण घातले आहेत. मातुश्री काशीयात्रेस जाणार होत्या त्या राहिल्या. श्रीमंतांस कांहीं वायूचा संचार होतो. कांहीं अविचार बोलणें अथवा असमंजस करणें असें नाहीं. आठवण चांगली धरून बोलतात. बहुतच आक्रोश करितात. कार्तिक शु. ६ रोजीं रमाबाईस सहगमनाविषयीं फार बोध केला. रुबरू तिनें इतकाच जबाब दिला कीं ईश्वरसत्ता प्रमाण. कारभाराचें बोलणें सर्व सोडलें. एकशें ऐशीं गाईदानास प्रारंभ केला. दुसऱ्यानें भरवावें तेव्हां जेवण. दादासाहेब जवळ असतात. दहा हजारांचा मोत्यांचा तुरा देवास दिला. भूतबाधा, मांत्रिक प्रयोग असेंही कोणी म्हणतात. दादासाहेबांचा गुरु कोणी मांत्रिक नर्मदेस आहे त्याचा हा प्रयोग आहे असें कोणी म्हणतात. दहा लक्षांचा नवस श्रीव्यंकटेशास करून पंधरा दिवस झाले. देवानें घोड्यावर बसते करावे, स्वतः जाऊन नवस फेडावा, मग कारभार करावा. दिवसेंदिवस अधिक, शक्ति नाहीं, तेव्हां हाका बोंबा होत होत्या तें मात्र राहिलें. इच्छारामपंतानें खंजीर दिला नाहीं तेव्हां त्यास मुसक्या बांधून मारविलें. एकदम पर्जन्य फार पडला त्यामुळें हवा खराब झाली. चौकी दाट बसविली, बातमी बाहेर फुटों देत नाहींत. देवळांत कोणी बसूं नये. दर्शन मात्र घेऊन बाहेर यावें असें आहे. सर्वांगास सूज आली आहे. धाकटेराव व हरिपंत भरवितात. नित्य क्षीरभोजन शतब्राह्मणांस होत आहे. कार्तिक शु० ११ स सायंकाळीं फार गडबडले. भुईवर उतरले. रात्रौ भूमिशयनच होते. येतील त्यास येऊं देत जाणें, मना न करणें अशी आज्ञा झाली. नाना फडणीस समीप होते, धाकट्यास त्यांजकडे निरवणूक केली. पहाटे सर्व प्रायश्चित्त द्या

म्हणून निकड केली. द्वादशीचे दिवशीं सकाळीं क्षौरान्त विधिपूर्वक सर्व प्रायश्चित्त केलें. पन्नास हजार रुपये कांची कामाक्षीस धर्म करण्याचीं उदकें घातलीं. भूमि सारवून सोवळा बिछाना घालून शूद्रस्पर्श नसावा या न्यायें राहिले. फार अवस्था कठिण शरिराची. दुसऱ्यानें हातपाय उचलावे तेव्हां हालचाल घडते. धाकटे यजमान सर्वांस फार दरडावतात. इतका दुखणेकरी, हालचाल सर्व बंद, शब्द नसतां अजून लोक चळचळां कांपतात. मोटा दाब. ईश्वरकृपेनें मुसळास अंकुर फुटेल तर पाहावें. रमाबाई फक्त गोमूत्र व दूध यांजवर पांच सात दिवस आहेत. बहुत कृश झाली आहे. तेरदाळकर रणछोड वैद्य व रूपेश्वर वैद्य आले. गंगाविष्णुही आहेत. * उपाय बहुतच होत आहेत. कार्तिक व० ३ चे दिवशीं रमाबाईनीं सती जाते वेळीं नेसण्याचीं पातळें आणावयास सांडणीस्वार पुण्यास पाठविला, त्यावरून पुण्यांत मृत्यूची आवई उठून दोन घटका दुकानें बंद झालीं. मागाहून खरी बातमी समजली तेव्हां गडबड शांत झाली. हें वर्तमान पेशव्यास समजलें. तेव्हां सांडणीस्वाराचे हात तोडण्याचा हुकूम केला. लोकांनीं रदबदल केली तेव्हां हात तोडणें राहिलें. नेहमीं सेवेंत असणाऱ्या मंडळीस प्रत्येकास हजार पांचशेंचे गांव इनाम दिले. खिजमतगारासही रोख बक्षिसें दिलीं. आपाजीराव पाटणकर व खंडेराव दरेकर यांस तुमचें कर्ज वारीन म्हणून वचन दिलें, त्याचें स्मरण ठेवून त्यांस विचारलें, तुमचें कर्ज किती आहे? परंतु अशा स्थितींत आपल्या कर्जाचा प्रश्न त्यांनीं श्रीमंतांस कळूंच दिला नाहीं. 'गजानन कृपा करील तर काय न होईल' एवढेंच बोलले. हरिपंत फडके यांस आपलें श्रीवर्धनचें वतन इनाम करून दिलें. चार दिवस सारे मातबर श्रीमंतांजवळ बसूनच आहेत. चारचार घटका सर्वांनीं बसावें असें श्रीमंत बोलले. कोणास मनाई नाहीं. अशा रीतीनें उत्तरोत्तर क्षीण होऊन गेले. भीषण मृत्यु समोर दिसत असतां दुःखाचा किंवा निराशेचा उद्गार नाहीं. खाशा गाई होत्या त्या आपल्या हातानें ब्राह्मणांस दान दिल्या· मोक्षधेनूचा संकल्प स्वमुखें करून दानें दिलीं. वैद्यास अगोदरच प्रार्थना असे कीं मरणसमयीं अतिसार व्हावा हें उत्तम, कफ होऊं न द्यावा, नाहीं तर गजान.

---

* हा त्या वेळचा सुप्रसिद्ध वैद्य जयपुरचा राहणारा पुष्कळ वर्षांपासून पुण्यास जाऊन येऊन असे. स. १७५९ पासून त्याचा उल्लेख आढळतो. पैशाचा लोभी असून अनेक सरदारांकडे त्याचें जाणें-येणें असे. स. १७७० त तो महादजी सिंद्याकडे दिल्लीस गेला होता. पे. द. ३९·१२९, व ४५ पृ० १०१.

नाचें स्मरण व्हावयाचें नाहीं. दोन घटकांनीं प्राण जाणार त्यापूर्वीं सर्व मंडळी व मोठमोठे वैदिक ब्राह्मण बोलावून नमस्कार केला. कृतकृत्यतेच्या आनंदानें वदन खुलून आम्हीं महायात्रेस जातों, स्वारीची तयारी करा म्हणून सांगितलें. प्राण जाऊं लागला ते समयीं अन्न घालूं नका, दूध अथवा गंगोदक घालणें अशी ताकीद केली. स्मृति अखेर क्षणापर्यंत होती. बुधवार कार्तिक व० ८ स प्रातःकाळीं सहा घटका दिवसास गजानन गजानन म्हणत मोठ्या योग्याप्रमाणें नेत्रद्वारें प्राण गेला. प्रजेचें छत्र गेलें. मोठा घात झाला. बाईसाहेबांनीं तरुणपणांत स्त्रीधर्माची शर्थ केली. सर्व जवाहीर आपले हातानें वांटलें. धर्मशिलेवर उभें राहून दादासाहेबांस बोलावून धाकटे श्रीमंतांस त्यांचे हातीं दिलें. सर्वांचें वडीलपणें यथास्थित चालवावें, असें सांगोन सती गेली. मोहोरांच्या पिशव्या दोन जवळ ठेवून जो नमस्कार करावयास आला त्यास कनिष्ठास देखील एक एक मोहोर दिली. जसा श्रीमंतांचा प्रताप होता, तसा बाईनीं शेवट केला. त्यांच्या पुण्यास जोडा नाहीं. सूर्यमंडळ भेदून गेली. * उभयतांच्या उत्तरकार्याचा खर्च सत्तर हजार झाला. शिवाय रोख दानधर्म एक लाख रुपये. रमाबाईचें वय मरणसमयीं पंचवीस वर्षांचें असावें. तत्कालीन लेखकांचें वरील वर्णन सत्य-सृष्टींतलें असून त्यावरून माधवरावाची धन्यता प्रत्ययास येते.

**४. कौटुंबिक, रमाबाई** — माधवरावाचें लग्न रमाबाईशीं ता० ९ डिसेंबर स. १७५३ रोजीं झालें, तेव्हां त्याचें वय साडेआठ वर्षांचें होतें. ती शिवाजी बल्लाळ जोशी यांची कन्या, लग्नप्रसंगीं चार-पांच वर्षांची असावी. गर्भाधान ता० ३ जुलई स. १७६५ ला झाल्याचा उल्लेख असल्यामुळें, त्या वेळीं ती सुमारें पंधरा वर्षांची असल. आपाजी नरहर याचे कन्येशीं लग्न टरून आमंत्रण-चिठ्या रवाना झाल्या, परंतु आयत्या वेळीं कांहीं अडचण येऊन लग्न मोडलें, तेव्हां रमाबाईस पसंत करून त्याच मुहूर्तावर समारंभ सिद्धीस नेला. ‡ अर्थात् यांचा वैवाहिक काल फार तर सात वर्षांचा दिसतो. पैकीं शेवटचीं दोन वर्षें तो

---

* द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडल भेदिनौ । परिव्राड् योगयुक्तश्च रणेचाभिमुखो हतः । उत्तर-क्रियेचा खर्च पहा मा. रो. १·१०१. अंतकाळचे भरपूर तपशील खरे यांच्या पटवर्धनी कागदांत पहावे. पु. द. भा. ३ यांतही तपशील पुष्कळ आहेत. लेखांचा अल्प संक्षेप वर दिला आहे.

‡ विश्वनाथ भट वैद्य यास बाळाजी बाजीरावाचे नांवाची लग्नचिठ्ठी ता० २८ नोव्हेंबर स. १७५३ ची गेली तींत नरहर आपाजीचे कन्येचा निश्चय केल्याचा मजकूर आहे. वैद्य संग्रह खं. ५, श्रीमुख ले. २५.

अंथरुणास खिळलेलाच होता. स. १७७० च्या ऑक्टोबरांत स्वारीस निघण्याचा मुहूर्त ठरला असतां 'चतुर्थ दिवसाचा गुंता पडला सबब राहिले' असा उल्लेख आहे. मिळून स. १७६५–७० च्या पांच वर्षांत स्वारी प्रवास वगैरे कारणांनीं हें दांपत्य फारसें एकत्र नव्हतें. कित्येक प्रसंगीं रमाबाई स्वारींत बरोबर असे. त्यांस मूल झालेंच नाहीं. गंगापुर, वाई वगैरे ठिकाणीं रमाबाई जात असे. स. १७६७ त तिचा बाप वारला तेव्हां ती नाशकास जाऊन आईचें सांत्वन करून परत आली. ता० ४ एप्रिल स. १७७२ ला ती हरेश्वरच्या यात्रेस गेली होती, त्याचा उद्देश पतीच्या आरोग्याचा असावा. रमाबाई अत्यंत पतिसेवानिष्ठ होती आणि त्याच्या इच्छेस अनुसरून तिनें हसत मुखानें सहगमन करून अखंड कीर्ति मिळवली हें सुप्रसिद्ध आहे. नेमनिष्ठेंत तिनें भीषण तपश्चर्या केली आणि शरीरास कष्टविलें. नवऱ्याची कडक शिस्त तिनें संतोषानें पाळून लौकिक मिळविला, तरी राज्यकारभारांत तिचें अंग बिलकूल नव्हतें. राधाबाई व गोपिकाबाई यांनीं जो कार्यभाग राजकारणांत करून दाखविला, तशी संधि रमाबाईला आलीच नाहीं, म्हणून त्या बाबतींत तिचें बुद्धितेज कशा प्रकारचें असेल तें सांगतां येत नाहीं. एकदां तिनें आपला कारकून जिवाजी परशुराम यास मोरोबा पटवर्धनाकडे पाठवून 'तुमच्या दोन हत्तिणींपैकीं एक आमचे स्वारीस देणें, तुम्हांस दुसरा चांगला हत्ती मुबदला देऊं,' अशी मागणी केली. परंतु मोरोबानें ती विनंती मान्य केली नाहीं; आणि नवऱ्याला कळवून ती बाईनें पुरी केली नाहीं, यावरून तिच्या इच्छेकडे लक्ष देण्याचा माधवरावाचा स्वभाव नव्हता असें म्हणावें लागतें. अशीच दुसरी एक आख्यायिका विड्याच्या पानांची प्रचलित आहे. नवरा स्वारींत असतां रमाबाईनें नाना फडणिसाकडे विड्याचीं पानें मागितलीं, तीं त्यानें दिलीं नाहींत आणि जबाब पाठविला कीं नवरा संनिध नसतां बायकांनीं विड्याचें सेवन करूं नये. अशा प्रकारांवरून अनुमान होतें कीं या दांपत्याचा प्रेमभाव सल्ला-मसलतीचा नसून पूर्वपरंपरेला धरून होता. माधवरावाचा कडक स्वभाव किती होता हेंच यांत कळून येतें.

५. **मातुश्री गोपिकाबाई** — माधवराव लहान असल्यामुळें राक्षसभुवना-पावतों गोपिकाबाईनें दोन अडीच वर्षें राज्यकारभारांत बरेंच लक्ष घातलें, पण त्यामुळें चुलते-पुतण्यांचा व देशस्थ कोंकणस्थांचा कलह वाढून लोकप्रवादांत

त्याची आळ गोपिकाबाईवर आली, तेव्हां तिला एक प्रकारचा वैताग उत्पन्न होऊन ती स. १७६४ च्या चैत्रांत पुणें सोडून नाशकाजवळ गंगापुर क्षेत्रांत कायमची जाऊन राहिली, ती बहुधा पुनः पुण्यास आली नाहीं. स. १७७१ च्या चैत्रांत मात्र एकदां थोडे दिवस पुत्राची प्रकृति पाहून ती परत गेली. त्याच्या अंतसमयीं देखील ती जवळ नव्हती. अर्थात् तिचाच करारी स्वभाव माधवरावांत उतरला होता. कोणाची भीडभाड न ठेवणारीं तीं माणसें होतीं. नानासाहेबाच्या मृत्युसमयीं घरांत अनवस्था प्रसंग उत्पन्न झाला. दादा व गोपिकाबाई हीं दोनच विद्यमान अनुभवी माणसें. त्यांत गोपिकाबाई निदान दहा वर्षांनीं मोठी, बुद्धीनें चलाख व बाजीरावापासून राज्याच्या घडामोडी पहात आलेली. दादांचा दुर्लौकिक अगोदरच गाजलेला, अशा स्थितींत पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यावर माधवराव मातुश्रीच्या सल्लयानें वागूं लागला. तिचे बंधु रास्ते राज्यांतील प्रमुख सरदार. निजाम पुण्यावर चालून आला, त्या प्रसंगांत रास्त्यांनीं माधवरावाचे हुकूम वेळेवर मानले नाहींत. उलट मल्हारराव रास्ते दादाचे पक्षास मिळाला आणि त्यानें जानोजी भोसल्यास पेशव्याचे विरुद्ध बळविलें, निजामही त्या कटांत सामील झाला. या कारणास्तव पेशव्यानें रास्त्यांचें शासन केलें. गोपिकाबाईनें बंधूंचा कैवार घेऊन माधवरावास सांगितलें, असें जाहीर शासन करूं नये. आपली मांडी आपणच उघडी करून दाखवूं नये. ही शिफारस माधवरावानें मानली नाहीं. सिंदे-होळकरादि डोईजड सरदारांवर पेशव्याला धाक बसवायचा असल्यामुळें, आपण आपल्या नातेवाइकांचाही मुलाहिजा ठेवीत नाहीं हें दाखविण्यासाठीं आईच्या मर्जीविरुद्ध त्यानें रास्त्यांचें शासन केलें. एवढ्यावरून जिथें माझ्या शब्दाला मान नाहीं, तिथें मी पाणी सुद्धा पिणार नाहीं असा त्रागा करून ती बाई लगेच नाशकास तीर्थाचे ठिकाणीं जाऊन राहिली. दोन करारी माणसांचें एकत्र पटेना. गोपाळराव पटवर्धनावर माधवरावाचा लोभ जडला तसा रास्त्यांवर जडला नाहीं. § राक्षसभुवनानंतर दादानें क्षेत्रवास पत्करला, तशीच वृत्ति गोपिकाबाईनें स्वीकारली. माधवरावानें तिच्यासाठीं गंगापुरास सर्व सोयी असलेला वाडा व इमारती बांधून खर्चाची व्यवस्था ठरवून दिली. वाड्यास अठरा हजार रुपये खर्च झाले. तिला वार्षिक नेमणूक बारा हजार होती. याप्रमाणें माता पुत्र दूर राहूं लागलीं तरी उभयतांचें रहस्य निर्बंध कायम राहिलें. मातुश्रीची सल्ला माधवराव नेहमीं विचारी आणि

§ पे. द. २०·१३०, सातारा २·३१३.

तिला अत्यंत आदरानें वागवी. बारा दिवस मातुश्रीचें पत्र आलें नाहीं, तेव्हां " बहुत दिवस आशीर्वाद पत्र नाहीं, ' असें पेशव्यानें तिला लिहिलें. उभयतांचा पत्रव्यवहार सारखा चालू असे. तिची प्रकृति विचारणें, लहान मोठ्या घडामोडी तिला कळवून सल्ला पुसणें, खाजगी बाबतींत तिची आज्ञा पाळणें हे प्रकार त्यांच्या पत्रांत पूर्णपणें दिसून येतात. पुण्यास येण्याविषयीं त्यानें तिला पुष्कळ आग्रह केला. ' बहुत दिवस पत्र येत नाहीं, प्रस्तुत वडिलांची प्रकृति कशी आहे, पुण्यास कधीं येणार, एक–दोन पत्रें निकडीनें पाठविलीं यास्तव मर्जीत कांहीं विपर्यास आला किंवा कसें तें लिहिणें. गंगास्नानें बहुत झालीं, आधींच प्रकृति अशक्त, नित्य गंगेचें स्नान, हवा सर्द, शिवाय कागद-पत्र यावयास लांब पडतें, सबब जरूर पुण्यास येण्याचें करावें. असेंही असून मर्जीस न येईल तर मला तरी वडिलांचे मर्जीपेक्षां अधिक काय ? ' अशीं पत्रें वारंवार लिहिलेलीं आढळतात. ' आज्ञा वारंवार केली कीं तालीम न करणें ; त्यास आज्ञेपेक्षां तालीम अधिक कीं काय, तालीम सोडली, नमस्कार मात्र घालीत असतों, " नासिक प्रांतीं पावसाच्या आपत्तीमुळें महागाई फार झाली आहे सबब त्या प्रांतीं धान्य आणण्यास जकात माफ करावी असें मातुश्रींनीं लिहिलें, त्यास एके ठिकाणीं जकात माफ केल्यास ती सर्वत्र माफ करावी लागेल, अशी विनंती वडिलांस करून आज्ञा होईल ती कळवावी असें पेशवा तिचा कारभारी रामचंद्रपंत गोरे यास लिहितो. " प्रस्तुत प्रकृति बरी नाहीं, सबब गंगाविष्णु वैद्यास तेथें नेऊन त्यांचें औषध घ्यावें. " माधवराव स्वारींत असतांना गोपिकाबाईची खबर नाना फडणीस ठेवीत असे. तिनें नारायणरावास नाशकास बोलावलें तेव्हां नानानें तिला कळविलें, " पुण्यांत लोक दहशत खाऊन तजावजा झाले आहेत, नारायणराव आले म्हणून लोकांस भरंवसा येऊन वस्ती पूर्वीप्रमाणें होत चालली, याकरितां नारायणरावांस गंगापूरास न नेणें, आपणच येथें यावें, आपण येथें आल्यानें लोकांस धीर पुरोन गांवची भरवस्ती होईल. " स. १७६९ त भोसले पुण्यावर चालून येणार अशी गडबड उडाली, तेव्हां पत्र पावतांच नारायणरावांस घेऊन आपण त्र्यंबकेश्वरास जावें, अनमान करावयाचा नाहीं, उपेक्षा करूं नये, असें नानानें बाईस रगडून लिहिलें, पण ती गंगापुराहून हालली नाहीं. माधवरावाप्रमाणेंच तिची वृत्ति निर्भय व स्वतःसंबंधीं बेफिकीर होती. तथापि माधवरावाचा थोरपणा ती पूर्ण ओळखीत असून तिला त्याच्या कर्तृत्वाविषयीं मोठें कौतुक व अभिमान वाटे, म्हणून तिला पुत्राच्या मरणानें

केवढा आघात झाला असेल याची कल्पना करावी. मात्र क्षयरोगाचें चेंगट दुखणें दीर्घकाल चालल्यानें त्या भीषण प्रसंगाला सर्वांच्या मनाची तयारी बरेच दिवस होत गेली.

'सविस्तर वृत्त बालबोध कागद लिहून सेवेसीं रवाना केला होता,' असें वाक्य माधवरावाचे पत्रांत आढळतें, यावरून बाईला मोडी येत नसून इतरांस न समजावयाचा मजकूर तो स्वतः तिला खासगी पत्रांत लिही हें उघड आहे. 'अपत्यें माधवरायानें' असे शब्द तो आपणास लावतो, यावरून 'माधवराव' हें लौकिकांतलें नांव त्याला पसंत नसावें. तमाम राजकीय घडामोडींचीं तपशीलवार वर्तमानें, हैदराच्या, इंग्रज-निजामांच्या व भोसल्यांच्या तहांचीं कलमें, नफा-नुकसानी, जयापजय इत्यादि प्रकार माधवराव मातुश्रीला पूर्णपणें कळवी आणि तिलाही तशी जिज्ञासा उत्कट असे. कारभारास अवघड असणाऱ्या तिच्या शिफारसी तो मानीत नसला, तरी तिचा अभिप्राय तो सदैव विचारी आणि शक्यपावेतों तिचा शब्द तो मोडीत नसे.

दादा व गोपिकाबाई यांचाही पत्रव्यवहार असा विस्तृत आढळतो. मनांत कांहीं असलें तरी लेखांत दादानें भावजयीचा अवमान यत्किंचित् केलेला आढळत नाहीं. शिवाय नारायणरावाच्या वधासारखें निर्घृण कृत्य जोंपावेतों दादाकडून घडलें नव्हतें, तोंपावेतों त्याची प्रतिष्ठा व मान्यता चहूंकडे बरीच कायम होती. आनंदीबाईसंबंधानें मात्र माधवरावाचा अभिप्राय व्यक्त झालेला आढळत नाहीं. दादाच्या कैदेप्रमाणें तिच्यावर निर्बंध नव्हते. ती वयानें लहान असून मुलें वरच्ेवर होत असल्यामुळें आरंभीं तिनें कारभारांत लक्ष घातलें नाहीं आणि माधवरावही जरुरीशिवाय कौटुंबिक भानगडींत पडत नसे. पार्वतीबाईसंबंधानेंही माधवरावाची भावना कशी होती हें समजण्यास मार्ग नाहीं. तिला त्यानें पत्रें लिहिलेलीं नाहींत. शिवाय सर्व समंजस मंडळींनीं तोतयाची परीक्षा करून त्यास खोटा ठरविला असतां, पार्वतीबाईनें सवाष्णपणाचा हेका चालविला तो त्याला अयुक्त वाटला यांत संशय नाहीं. भाऊसाहेबांची क्रिया करून तिनें सहगमन करावें अशी त्याची सूचना होती, यावरून तिचें करणें माधवरावास पसंत नव्हतें हें सिद्ध होतें.

**६. कर्तृत्वाचा आढावा** — राज्यकर्त्याच्या अंगीं जो गुणसमुच्चय असावा लागतो, तो लक्षांत ठेवल्यास माधवरावाची योग्यता थोर पुरुषांत गणली पाहिजे.

अकरा वर्षांच्या त्याच्या कारभारापैकीं पहिलीं सात तर कौटुंबिक कलहांत व्यर्थ गेलीं हें ध्यानांत घेतल्यास बाकीच्या चार वर्षांच्या अल्पावधींत त्यानें जें यश मिळविलें तें अजब होय. एका अर्थानें तो केवळ छत्रपतीचा कारभारी किंवा प्रधान होता, तथापि राज्याची संपूर्ण मालकी त्यानें पूर्ण स्वतंत्रतेनें सांभाळिली आणि सर्वतोमुखीं भलेपण मिळविलें. सोळाव्या वर्षी त्याजवर राज्याची जबाबदारी येऊन पडली आणि वयास अठ्ठावीस वर्षें पुरीं होण्यापूर्वींच त्यानें परलोकवास केला हें त्याच्या नैसर्गिक कर्तृत्वशक्तीस जास्तच पोषक ठरतें. तीन पिढ्यांच्या पूर्वजांनीं जो राज्यवृद्धीचा कार्यक्रम आखून नेटानें चालविला, तो माधवरावानें मृत्युपूर्वीं पूर्णपणें शेवटास नेला हें त्याचें कर्तृत्व सदैव झळकत राहणारें आहे. एवढेंच नव्हे तर बाळाजी विश्वनाथाचें राजकारणी धोरण, बाजीरावाची लष्करी धडाडी, नानासाहेबाची प्रजापालनदक्षता, इत्यादि गुण माधवरावाचे अंगीं जन्मतःच उतरले होते. पानिपतावर मराठी राज्याचा अवतार संपला असा अल्प-काळ शत्रुमित्रांचा समज झालेला माधवरावानें साफ नाहींसा करून मराठ्यांचें सामर्थ्य पूर्वीप्रमाणें कायम आहे ही गोष्ट समस्त हिंदुस्थानास पटवून दिली. पानिपतापासून मराठी राज्यास उतरती कळा लागली हा इतिहासकारांचा गैरसमज आतां निरास पावला असून माधवरावाचा अकालीं मृत्यु हाच त्या र्‍हासाचा आरंभ होय ही गोष्ट विशिष्ट अभ्यासानें विचारवंतांस मान्य झाली आहे. मोगल पातशाही उलथून पाडून आपण पातशाही पद स्वीकारावें अशी पेशव्यांची आकांक्षा कधींच नव्हती. पातशहाचा अमिरुल-उमरा व्हावें, फौजा ठेवून पात-शाहीचा बंदोबस्त करावा, परशत्रूपासून पातशाहीचा बचाव करावा, अशी जी राज्यमर्यादा शाहू छत्रपतीनें पेशव्यांस घालून दिली, तीच शेवटीं माधवरावानें पूर्ण करून दाखविली. सन १७७१ च्या अखेरीस मराठे सरदारांनीं शहा आलम बादशहास दिल्लीस आणून वरील कार्यक्रम पुरा केला म्हणून आपला देह ठेवतांना या तरुण पेशव्यास कृतकृत्यतेचें समाधान लाभलें. याच कारणास्तव पानिपतच्या संहारानें मराठी राज्याचें नुकसान झालें नाहीं, इतकें माधवरावाच्या अकाली मृत्यूनें झालें असे मार्मिक उद्गार मराठ्यांच्या आद्य इतिहासकारानें नमूद केले. +

---

+ The plains of Panipat were not more fatal to the Maratha empire than the early end of this excellent prince." Grant Duff.

वर जें विवेचन माधवरावाच्या स्वाऱ्यांचें व कारभाराचें केलें आहे त्यावरून त्याची योग्यता कोणाही वाचकास सहज पटणारी आहे. घरांतल्या कलिपुरुषाची बाधा त्यास झाली नसती तर पहिल्याच म्हणजे स० १७६२ च्या स्वारींत त्यानें हैदरअलीचा नायनाट करून कर्नाटकांतली मराठी सत्ता अल्पावकाशांत अबाधित केली असती आणि दक्षिणेंत निर्वेध अंमल झाल्यानें पुढील आयुष्यांत त्याला मराठी राज्याचें संपूर्ण सामर्थ्य उत्तर हिंदुस्थानावर खर्चून इंग्रजांचा प्रतीकार यशस्वी रीतीनें करतां आला असता, हाही प्रकार अलीकडील संशोधनानें आतां अभ्यासकांस पटला आहे. घरदुरुस्तींतच त्याचीं आठ वर्षें गेलीं हें राज्याचें मोठें नुकसान होय. एका समकालीन तत्रस्थ इंग्रजानेंही असाच अभिप्राय व्यक्त केलेला आढळतो. “ माधवराव जसजसा अनुभव येऊन मोठा होत गेला तसतसे निश्चय, तडफ वगैरे त्याचे गुण व्यक्त होऊन लोकांत त्याजबद्दल आदर व जरब वाढत गेली. त्याचा कारभार अल्प काळ चालला तरी तेवढ्यांत बाहेरचे सत्ताधीश त्याला उत्कृष्ट आदर दाखवूं लागले आणि या बाहेरच्यांचें मनोगत माधवरावास कळून आल्यामुळें तो जास्त काळ जगता तर पेशवाईचें सामर्थ्य देशांत अबाधित केलें असतें याबद्दल संशय वाटत नाहीं. परंतु दुर्दैवानें तो अल्पायुषी झाला. ” †

पूर्वी उत्तर हिंदच्या प्रकरणांत या विषयाचें विवेचन केलें आहे तें संदर्भासाठीं वाचकांनीं लक्षांत आणावें. स. १७६५ च्या ऑगस्टांत राघोबानें पुतण्याशीं राज्याच्या वांटणीचा दावा मांडला, त्याच वेळीं क्लाइव्हनें बादशहा-पासून पूर्वहिंदची दिवाणी पटकावली. चुलत्यापुढें माधवरावाचा नाइलाज झाला. निजाम-भोसले या दादाच्या साथीदारांस व प्रत्यक्ष त्यास धोडपेवर झोडपी-पर्यंत माधवरावाचें आसनच स्थिर नव्हतें. तदुत्तर त्यानें लगेच परंपरागत कर्तव्य हातीं घेऊन प्रथम बादशहास इंग्रजांच्या छत्राखालून सोडवून आपल्या संरक्षणाखालीं दिल्लीस आणिलें, म्हणजे हिंदी राजकारणाचा अर्धा डाव त्यानें जिंकिला. पुढें इंग्रजांस पूर्वेकडून उखडून काढण्याचा उरलेला अर्धा डाव तो हातीं घेणार तोंच त्यास यमराजाचें पाचारण आलें. आणखी दहावीस वर्षें त्याची आयुष्यमर्यादा टिकती तर कित्येक परिणाम निश्चित लक्षांत येतात. शहाआलम बादशहा मराठ्यांचे ताब्यांत नांदून मराठ्यांचा अंमल बंगालच्या

† Taylor's Report, Forrest's Maratha series I, pp. 247–264.

उपसागरापर्यंत वसण्यास कांहीं प्रत्यवाय नव्हता. माधवराव जिवंत असता तर नारायणरावाचा खून न होतां चुलत्याचे चाळे बंद पडले असते आणि सिंदे-होळकरादि सरदारांवर पेशव्याची हुकमत कायम राहिल्यामुळें सर्व मराठी राज्याचें एकवटलेलें सामर्थ्य इंग्रजांस उखडून काढण्यास पुरेसें होतें. माधवरावाच्या शहाणपणाचे व कर्तबगारीचे जे उल्लेख ठिकठिकाणीं खुद्द इंग्रजांनींच काढलेले आढळतात त्यांवरून वरील प्रमेयें निघतात. मृत्युसमयीं इंग्रजांच्या चढाईचाच विषय पेशव्याचे दृष्टीपुढें वावरत असून त्याच्या अंतःकरणास बोंचत होता. इंग्रजांशीं सामना करण्याची पूर्वतयारी त्याची भरपूर झाली होती. मराठमंडळाची एकजूट होऊन सर्व सरदार व प्रजा त्याचे भजनीं लागली होती. कलिपुरुष प्रतिबंधांत पडून राष्ट्रीय सामर्थ्य भक्कम बनलें होतें. नजीबखान-अब्दालीसारखे शत्रु नाहींसे होऊन बादशहासुद्धा सर्व मुसलमान पेशव्यास अनुकूल होते. सर्व राज्यांत एक हुकमत नांदूं लागली, जिवास जीव देणारे अनेक तरुण योद्धे, मुत्सद्दी, वकील, सावकार अशी होतकरू पिढी नवीन तयार होऊन पूर्वींचा पानिपतचा संहार सर्व बुजून निघाला. एकंदर राष्ट्राच्या उमेदी परमोच्च बिंदूस पोंचून आतां मराठ्यांचें सर्व दैन्य दूर होणार अशी भक्कम परिस्थिति निर्माण झाली असतां या थोर कर्तृत्ववान पेशव्यास काळानें ओढून न्यावें याहून कठोर अन्य दैवदुर्विपाक कोणता असूं शकेल ! मृत्यूच्या या दृष्टीनें मराठी इतिहास तपासूं लागलें म्हणजे असें वाटतें कीं मराठ्यांचा भाग्योदय कधीं होऊंच नये असा परमेश्वरी नेमानेम असावा कीं काय ? शिवाजीमहाराज, बाजीराव व माधवराव पेशवे हीं कर्तबगार माणसें दहावीस वर्षे जास्त जगतीं तर हा इतिहास खात्रीनें बदलला असता. एवढेंच काय, पण पुढेंहीं हातीं-तोंडीं आलेला सवाई माधवराव खर्ड्यांचे विजयानंतर आकस्मिक रीतीनें नाहींसा व्हावा ही काय विधिघटना म्हणावी कीं काय म्हणावें हेंच समजत नाहीं. पण या मुद्द्याचा जास्त विचार करण्यांत अर्थ नाहीं. मराठी राज्य इतक्या लवकर मोडलें कां याचें उत्तर दोन माधवराव पेशव्यांचा अकाली मृत्यु होय हेंच समर्पक मानावें लागेल. †

---

† इतिहासानें घडलेल्या गोष्टींची तेवढी विचक्षणा करावी, अमुक घडलें असतें तर तमुक झालें असतें असा ( might-have-beens चा ) विचार करूं नये हा दंडक युक्त नाहीं. शक्य उपाय असून घडले नाहींत ही चर्चा इतिहासांत अवश्य पाहिजे.

राज्य करण्याचें कर्तृत्व पाहूं गेल्यास सगळ्या पेशव्यांत माधवरावास अग्रस्थान द्यावें लागलेच, किंवा प्रत्यक्ष शिवाजीच्या खालोखालही त्यास बसविण्यास हरकत नाहीं. पेशव्यांच्या घरांत चिमणाजी आपा, सदाशिवरावभाऊ व माधवराव हे तीनच पुरुष सदाचारी वंदनीय दिसतात. माधवरावाचें निर्मल वर्तन, कर्तव्यनिष्ठा, धाक व लौकिकांतील पूज्यभाव हे गुण केव्हांही उदात्त व अनुकरणीय म्हटले पाहिजेत. माधवरावाच्या व त्याच्या कक्षेंत वागणाऱ्या सखारामबापू, रामशास्त्री, नाना फडणीस, हरिपंत फडके, गोपाळराव पटवर्धन मुराररराव घोरपडे, गोपिकाबाई, रमाबाई इत्यादि व्यक्तींच्या अनेक आख्यायिका अद्याप लोकमुखांत टिकून राहिल्या आहेत, त्या सर्वांत या पेशव्याचे अनेक थोर गुण व्यक्त झालेले दिसतात. शिवाजीमहाराजांना समर्थ रामदास पारमार्थिक गुरु होते, त्याप्रमाणें माधवराव पेशव्याला रामशास्त्री हे ऐहिक गुरु होते असें नजरेस येऊन त्याजबद्दलचा आपला आदर द्विगुणित होतो. रामशास्त्री न्यायासनावर राहून माधवरावास हरएक विषयांत मार्गदर्शन तर करीतच असे, पण खुद्द माधवरावही प्रत्येक महत्त्वाचा प्रश्न, युद्धसंग्राम, जयापजय, नफानुकसान, खासगी किंवा सार्वजनिक कोणतीही बाब रामशास्त्री यास विचारून करीत असे. घरांत मातुश्री व बाहेर रामशास्त्री हीं दोन त्या पेशव्याचीं उपास्य दैवतें असून त्यांना लिहिलेलीं पत्रें वाचलीं म्हणजे मोठें कौतुक वाटूं लागतें. " कर्नाटकांत छावणीस राहूं नये अशी शास्त्रीबुवांची आज्ञा, यास्तव राहत नाहीं. " असा भाव इतरांस आज्ञा करणाऱ्या या पेशव्यानें दाखविलेला आढळतो.

आपल्या उदात्त व निष्पक्षपाती भावनेनें माधवरावानें शत्रुमित्रांवर जशी छाप बसविली तशी पूर्वी दुसऱ्या कोणीं बसविलेली दिसत नाहीं. चुलत्यानें त्याला इतकें छळलें, पण वडीलकीचा पूज्यभाव माधवरावानें कधीं सोडला नाहीं कीं अखेरपर्यंत सूडाची भावना व्यक्त केली नाहीं. दादाचे दुष्ट चाळे लक्षांत घेतले म्हणजे उलट आपणांस असें वाटूं लागतें कीं इतकी नरमाई त्यासंबंधानें दाखवावयास नको होती. दादानें आपल्या शक्तीचा उपयोग राज्य-हित संवर्धनाकडे केला नाहीं, याबद्दल कोणासही सदैव उद्वेगच वाटेल. संताजी घोरपड्याचें सेनापतिपद जाऊन त्यास प्राणांस मुकावें लागलें हा अन्याय दूर करण्याकरितां माधवरावानें त्याचा नातू मुराररराव घोरपडे यास पुनः सेनापतिपद

देऊन घोरपड्यांच्या राष्ट्रसेवेची कदर केली. महादजी सिंदे, तुकोजी होळकर, अहल्याबाई अशा भिन्न स्वभावी व्यक्ति माधवरावाच्या भजनीं लागल्या. जानोजी भोसले शरण येऊन त्याच्या आज्ञेंत वागूं लागला. मराठ्यांचा उघड वैरी निजामअली माधवरावाचा कायमचा दोस्त बनला. शहाआलम बादशहा एवढा बट्टेबाज पण तोही माधवरावाच्या कर्तृत्वावर विसंबून इंग्रजांस सोडून मराठ्यांचे आश्रयास आला. नाना फडणीस व हरिपंत फडके हे तर केवळ पेशव्याचे दोन हातच ना, पण ते देखील त्यास कसे चळचळां कांपत तें सांगणारीं पत्रें कांहीं थोडीं नाहींत. "मर्जी फार कठिण, विश्वास नाहीं, जन्मभर निष्ठेनें कारभार केला आणि एक दिवस अंतर पडेल तर मागें चांगलें केलें तें आठवणार नाहींत. मी यांस फार भितों, सर्वकाळ जगन्निवासजवळ चिंतन करतों कीं देवा, अब्रूरक्षण कर, एक दिवस शेवटास गेला म्हणजे निभावलों असें वाटतें," * असे उद्गार हरिपंतानें माधवरावाबद्दल काढलेले वाचले म्हणजे त्या पेशव्याच्या स्वभावाचें चित्र डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभें राहतें. गंगाधर यशवंताचें प्रकरण तीन वर्षें धुमत होतें, शेवटीं त्यास सडकून चोप बसलेला पाहून चिंतो विठ्ठल, सखारामबापू, सखाराम हरि इत्यादि मंडळींचें धाबें दणाणून गेलें. सखारामबापूच्या शहाणपणाचा उपयोग माधवरावानें उत्कृष्ट करून मोठ्या खुबीनें त्यास निःसत्त्व बनविलें. गोपाळराव पटवर्धन, त्रिंबकराव पेठे, विसाजी कृष्ण इत्यादि सेनानायकांवर पेशव्याचा पूर्ण इतबार असूनही अनेक प्रसंगांत त्यानें आपलें सांग्रामिक चातुर्य त्यांसही दाखवून दिलेलें आढळतें. युद्धकलेंत काय किंवा हिशेबव्यवहारांत काय, माधवरावानें आपलें तेज सर्वांवर लागू केलें. तोफखाना व शस्त्रास्त्रें सजवून आपली युद्धपद्धति पाश्चात्यांच्या बरोबरीची करण्यांत त्यानें एवढे कष्ट केले कीं प्रत्यक्ष इंग्रज देखील भयभीत होऊन गेले. हरएक प्रकारचें कपट, दुष्टावा, वक्रगामीपणा यांचें जें पीक राष्ट्रांत थयमान घालीत होतें, त्याचें संपूर्ण उच्चाटन करून न्यायनीतीचें, निष्पक्षपाताचें, सार्वजनिक हिताचें असें एक नवीनच वातावरण या पेशव्यानें राष्ट्रांत उत्पन्न केलें. नवीन कर्तबगार माणसें इतकीं तयार झालीं कीं या एका तरुण पुरुषानें एवढ्या अल्पकालांत इतक्या गोष्टी कशा साधल्या याचेंच आश्चर्य वाटूं लागतें. माधवरावाचें वर्तन आंतबाहेर एक होतें, त्यांत लपवाछपवी यत्किंचित् नव्हती, रेखीव रोखठोक बाणा,

* पे. द. २९. ६४, १०३.

नजर सदा चहूंकडे फिरत असणारी, कडक शिस्तीची निर्मिति, दुष्टांचा काळ तर दुःखितांचा कनवाळू हितकर्ता, असा या अद्वितीय पुरुषाचा अवाढव्य व्याप पाहिला म्हणजे त्यास थोर हेंच नामाभिधान देणें योग्य होय. मराठी राष्ट्राचा माधवराव पेशवा हा एक देदीप्यमान अलंकार असून तिशीच्या आंतला एक लहानसा तरुण काय करूं शकतो याची प्रचीति जगास पटवतो, आणि हा गृहस्थ तुम्हाआम्हांसारखा मनुष्यच होता, त्यानें केलें तें करणें आपणांसही शक्य आहे असा विचार मनांत येऊन मराठी राष्ट्राला त्याजबद्दल निरंतर अभिमान वाटत राहील, आणि या राष्ट्राला भविष्यकाळाबद्दल बिलकूल धास्ती वाटण्याचें प्रयोजन नाहीं असेंच कोणीही म्हणेल.

यानंतर माधवरावाच्या प्रत्यक्ष कारभाराचे थोडे विशिष्ट तपशील सांगणें अवश्य आहे.

**७. हिशेबी कारभार** — कामाचा ताण सर्वच कार्यकर्त्या माणसांस सारखा पडत असतो, तसा तो या पेशव्यासही पडला तर नवल नाहीं, पण माधवरावाचे बाबतींत तर हा ताण कल्पनातीत होता असें दिसून येतें. यासंबंधानें नाना फडणिसानें लिहविलेल्या बखरींत पुढील उल्लेख आहे: “ हिंदुस्थानांत व कर्नाटकांत गड, किल्ले व स्थळें नानासाहेबांचे कारकीर्दीस आलीं नव्हतीं तीं माधवरावांनीं घेऊन शत्रु पादाक्रान्त केले. बारा वर्षे राज्यरक्षण करून नानासाहेबांहून अधिक पराक्रम केला. त्यांत व्यथा होऊन दोनतीन वर्षे हैराणच होते. ” नानासाहेबाप्रमाणेंच माधवराव जबरदस्त लेखक होता, हें त्याच्या पत्रसंभारावरून निदर्शनास येतें. मातुश्री, नाना फडणीस, रामशास्त्री, दादासाहेब, ठिकठिकाणचे सेनानी व कार्यकर्ते अशा सर्वांस त्याचीं पत्रें वारंवार गेलेलीं आहेत. त्याच्या लेखांत निःसंदिग्धता, हुकमत व रेखीव मर्यादा आढळून येते. नानासाहेबाचें लेखन मधुर व गुंतागुंतीचें तर माधवरावाचें ताडफाडीचें व निकराचें म्हणतां येतें. स्वारींत व बाहेरच्या व्यवसायांत असतां त्यानें तमाम महत्त्वाच्या बाबती मातुश्रीस लिहून कळविलेल्या आढळतात. चुलत्यास लिहिलेल्या पत्रांत आदरपूर्वक त्याच्या अन्यायांचें माप पदरांत घातलें. निष्ठुर पण दयार्द्र अंतःकरण पत्रांत व कारभारांत ओतलेलें व्यक्त होतें. राज्य हें उपभोगार्थ नसून लोकहिताकरितां कष्टानें चालवावयाचें असतें ही त्याची भावना सर्वत्र दिसून येते. अनेक भानगडींचे निकाल तो तावडतोब करी.

सरदारांचे रुसवे, वंडावे, अंतःकलह मोठ्या शिताफीनें मिटविलेले दिसतात. मातुश्रीस लिहिलेल्या पुढील वाक्यांतील तडफ कशी उठावदार दिसते पाहा. " मनोळी चिकोडीचा गुंता उरकून धारवाडास आलों, कित्तूरचा गुंता थोडा राहिला आहे, तो सत्वर उरकून तुंगभद्रातीरास जाऊं. सावनूरकर भेटीस येणार, मुरारराव निघाले आहेत, हैदर नाईक व मीर फैजुल्ला बिदनुरीं आहेत. वरकड वर्तमान होईल तें सेवेसीं लिहीन. " दुसरें उदाहरण, " हुबळीहून कूच करून सावनुरास आलों, तेथें नबाब भेटीस आले, दुसरे दिवशीं आम्ही नबाबाचे घरीं गेलों, मेजवानी केली, हत्ती, घोडे, वस्त्रें दिलीं. दुसरे दिवशीं आम्ही नबाबास डेऱ्यास बोलावून मेजवानी केली, दोन हत्ती, दोन घोडे, एक शिरपेंच व पुत्रांस दोन पदकें दिलीं. " निजामाकडील आपल्या वकिलास माधवराब लिहितो, " हैदराचा वकील गप्फा मारीत असेल त्याजवर तुम्हीं न जाणें, सविस्तर अर्थ युद्धाचा वगैरे तुम्हीं नबाबास सांगणें, ईश्वराची कृपा आहे तर या दोचौ रोजांत हैदराचें पारिपत्य उत्तम प्रकारें होईल. " नानासाहेब स्वतः संग्रामकुशल नसल्यामुळें गोड पत्रें लिहून त्यास सरदारांचीं आर्जवें करावीं लागत तसा भाव माधवरावाच्या लेखांत आढळत नाहीं.

हिशेबी कामांतही माधवरावाचें लक्ष तसेंच तीक्ष्ण होतें. " रावसाहेबांनीं हाल्लीं कारस्थानी हिशेबावर धरली आहे. कोंकणपट्टीचे हिशेबास प्रारंभ झाला आहे. " अशा कारभाराच्या कामीं मोरोबा व नाना फडणीस, महादाजीपंत गुरुजी, नारो आप्पाजी, हरिपंत फडके, रामाजी मल्हार चिटणीस, दिनकर महादेव इत्यादि हुशार, निःस्पृह व पाणीदार मंडळी पेशव्याचे मुख्य हस्तक होते. हिशेबाचें व कारभाराचें काम पुण्यास पावसाळयांत जोरानें चाले, त्या वेळीं महालोमहालचे हिशेब पाहून मामलती ठरवून देत. पेशव्यास लबाडी व धरसोड बिलकूल खपत नसे, आप्त किंवा मर्जीतला मनुष्य असला तरी गुन्हा दिसतांच त्यास शिक्षा व विटंबना झालीच. लबाडी, लांच, कुचराई वगैरेबद्दल मामलेदारांस व अधिकाऱ्यांस जबर शिक्षा झाल्याचीं उदाहरणें मुबलक आहेत. आरमार, तोफखाना इत्यादींच्या हिशेबांत छडा लावून लबाड्या उघडकीस आणल्या व शासनें केलीं. असा तपास चालू झाला म्हणजे अधिकारी वर्ग कांपूं लागे. सरदारांचे कारकून आपापल्या धन्यास कळवूं लागले, " आतां कागदपत्रांस फार जपावें. तमाम रुमाल आणवूं लागले. आम्हांकडील पत्रें कलमदानांत न

ठेवतां निराळीं ठेवावीं. आम्ही आपल्या तर्फेनें ममता संपादण्यास चुकत नाहीं, पण मर्जी फार नाजूक झाली आहे. रास्ते बंधु मामा ह्यांजकडील चौथाई सरंजाम घेण्याची घालमेल फार पडली. स्वारींत फौज सामील व्हावयास दिवसगत झाली म्हणून त्यांजवर फार राग झाला. हिशेबांत जाबसाल होऊं लागला म्हणजे कामाची जलदी फार होते. बोलावणें गेल्याबरोबर न आल्यास खपत नाहीं. कागद हजर न केले तर बेमर्जी होते. मग कोणाचें ऐकत नाहींत. कानाचे फारच अल्प झाले आहेत. मध्यस्थ समंजस आहेत म्हणून बरें."
"स्वारीस निघण्याची त्वरा आहे. तमाम पागा आणविल्या, लोकांस जलदीचीं पत्रें पाठविलीं. डेरे दाखल होऊन पर्वती, थेऊर, जेजुरी, मोरेश्वर, कर्कमभोसे ह्या पंच यात्रा करून लोक जमा करीत पंढरपुरावरून जाण्याचा निश्चय ठरला आहे. दरबारची मर्जी फारच नाजूक, रंग पाहून जाबसाल करतों. कागदपत्रांस फार जपावें. तमाम रुमाल आणतात."

पुष्कळशा मोहिमा माधवरावानें दबावाखालीं पार पाडल्या. शिन्यांचा प्रचंड किल्ला अल्पावधींत ताबडतोब काबीज केला. माधवराव स्वभावाचा मितभाषणी असून, उत्तम, बरें, ठीक, जरूर नाहीं, अशा ह्रस्व भाषेनें किंवा संकेतांनीं तो कामाचा निकाल लगोलग करी. उगाच वादविवाद किंवा हुज्जत घालीत बसत नसे. कामास येणारीं माणसें तशाच मोजक्या शब्दांनीं बोलत. अधिक उणें बोलणारास तत्काल शासन ठेवलेलें. पत्रलेखनांतही तोच हिशेबी रेखीवपणा असे. त्याच्या अकरा वर्षांच्या अंमदानींत प्रथम तीन वर्षें नीलकंठ महादेव पुरंदरे व सखारामबापू, नंतर नऊ महिने त्रिंबकराव पेठे, पुढें साडेचार वर्षें सखारामबापू, नंतर अखेर पावेतों मोरोबादादा असे त्याचे कारभारी असल्याचा उल्लेख आहे. †

**८. कडक शिस्त** — माधवरावास कोणत्याही विषयांत, युद्धसंग्रामाच्या विशिष्ट प्रश्नांतही, स्वतः आपलें मत बनवून त्याप्रमाणें वागण्याची धमक होती. दुसरा कितीही शहाणा असला तरी आपल्या बुद्धीस पटेल तेंच तो करीत असे. बुद्धिही तशीच तेजस्वी व प्रखर होती. परावलंबनाची त्याला स्वभावतःच चीड असे. प्रत्येक माणसाचा गुण ओळखून त्याचा त्यानें राष्ट्रकार्याकडे उपयोग करून घेतला. नानासाहेबानें वाड्यांत फड उभारून माणसें तयार केलीं, तसा

† का. सं. प. या. २२५ व पृ० ५०१ ले. ४९७.

फड माधवरावानें चालविल्याचा उल्लेख नाहीं. तथापि प्रत्यक्ष व्यवहाराचा विस्तीर्ण अनुभव फडाच्या कचेरीहून जास्त मोलवान ठरला. त्यांत अनेक तरुण सेवानिष्ठ माणसें माधवरावानें तयार केलीं. याच माणसांच्या कर्तबगारीनें पुढें मराठ्यांचें राज्य टिकलें. यावरून माधवरावाची कारकीर्द म्हणजे माणसें तयार करण्याची शाळाच बनली. त्याचें स्वतःचें उदाहरण हा या शाळेचा आत्मा होय. आय-व्ययावर दाब, लांचखाऊपणाचें उच्चाटन, वेठबिगारीची बंदी, शेती व उद्योगधंद्यांची जोपासना, त्वरित न्याय मिळण्याची सोय, दंगेधोप्यांचा बंदोबस्त अशा किती तरी बाबतींत या पेशव्यानें लक्ष घातलेलें पाहतां त्याच्या उद्योगाची हद्द वाटते, तशीच त्याच्या सर्व ठिकाणीं फिरत राहणाऱ्या दृष्टीचीही कमाल वाटते. म्हणूनच मराठ्यांच्या इतिहासांत या पेशव्यास उच्च स्थान देण्यांत येतें तें सर्वोपरी युक्त आहे.

माधवरावाच्या कडक शिस्तीचीं उदाहरणें पूर्वीं अनेक सांगण्यांत आलींच आहेत. कर्नाटकच्या स्वारींत ता० ८ मार्च स. १७६७ रोजीं मीर रेजा याचा गोठ घोरपड्याच्या लोकांनीं लुटला, त्या वेळचा पेशव्याचा रुद्रावतार पाहून छावणींतले लोक कांपूं लागले, तें वर्णन मुळांतच खऱ्यांच्या ग्रंथांत वाचावें. प्रत्यक्ष रमाबाईच्या पातळांची व इच्छाराम पंतानें खंजीर दिला नाहीं त्याची शेवटच्या आजारांतली हकीकत पूर्वीं येऊन गेलीच आहे. ‘स्वारींत शितोळ्याचा जमाव प्रहररात्रीं भांडूं लागला, त्याजवर खिदमतगारांची चौकी पाठविली. हल्ला करण्यासाठीं गाडदी तयार करविले. सखाराम हरि वगैरेंनीं बहुत सांगितलें परंतु न ऐकत. अलीकडे क्रूरता फारच धरली आहे. नित्य एक दोन हात तोडितात. इजत जतन होऊन परत येईल तो प्रारब्धाचा.’ अशा या वर्णनावरून माधवरावास रुद्रावतार किंवा कर्दनकाळ हीं विशेषणें लावलेलीं आढळतात तीं गैर नव्हत. अंथरुणावर हात हालविण्याची शक्ति नाहीं, पण तेव्हां देखील त्याचा दरारा सर्वांना वाघासारखा वाटत होता. जरबेशिवाय राज्य चालत नसतें. पूर्वीचा पोकळ कारभार बंद पडला. सदाशिवराव व माधवराव हे दोनच पुरुष राज्याला शिस्त लावणारे निपजले. *

सरंजामदारांचे लष्करी जाबते माधवरावानें बांधून दिले ते अभ्यसनीय असून ते त्याच्या नियमबद्ध कारभाराची साक्ष पटवितात. “सालमजकुरीं सर्व

* रा० सं. ६. ५२० ; पे. द. १९-९२.

सरंजामीयांचा तह जाहला," असें वाक्य ता० ४ मार्च स. १७६८ च्या पत्रांत आहे. † यावरून चुलत्याचें पारिपत्य करण्याकरितां फौजेची घडी बसविणें प्राप्त होऊन त्यानें नवीन धारे बांधून दिले. माणसें, घोडे, सामान सर्व स्वतः तपासून लष्करांत कडक शिस्त उत्पन्न केली. "गणत्या घ्यावयाची चौकशी फार झाली ती कोठवर लिहावी. रामचंद्र गणेश, गुरुजी, हरिपंत वगैरे पाठवून स्वारींत तमाम गोठगणत्या घेतल्या ( जाने० १७६७ ). गणती घेतांना जिंतीकर भोसल्याकडून नारो कोन्हेर यानें १०० रु० लांच घेतल्याचें श्रीमंतांस कळलें. चौकशी करून अंगीं लाविलें. ढालाईतांकडून लष्कराबाहेर त्यास घालवून दिलें. साल मजकुरीं चौकशीची सीमा आहे. पंक्तिभोजनास बोलावून स्वतः लोकांची पाहणी करितात. नजर अत्यंत करडी आहे."

माणसाची योग्यता ओळखून त्याजला प्रेमानें व औदार्यानें वागविण्यांतही माधवराव तसाच दक्ष होता, त्यामुळें त्याचा राग सहन करूनही भजनीं राहणारीं माणसें थोडीं नव्हतीं. लबाडी किंवा खोटें त्याला बिलकूल खपत नसे, इतकेंच. सरळ व निष्कपटी माणसाला त्यानें कधीं अन्याय केला नाहीं. रास्ते, मुराराव घोरपडे इत्यादि दुटप्पी माणसांना त्यानें बोल बोल म्हणतां नरम केलें. बजावा पुरंदऱ्यास माधवराव लिहितो, "चाकरी करून दाखवावी म्हणून तुम्ही लिहिलें, त्यास योग्यतेसारखी चाकरी करण्यांतच सर्व आहे. आपलें स्वरूप काय आणि सरकारची तैनात काय खातों हें मनांत आणावें. करतों चाकरी हीच फार असें कित्येक मानतात. पण तुमची मातबरी अशी आहे कीं सर्वांपेक्षां अधिक चाकरी करून दाखवावी. तुमचें पत्र व माझ्या ‡ आतचें उत्तर दुसऱ्यास कळूं न द्यावें."

कारभारांत माधवराव स्वमतानुवर्ती व निरंकुश होता, तरी त्याची खासगी राहणी अत्यंत साधी व श्रमशील होती. चैन व आराम त्यास बिलकूल खपत नसे. केवळ सत्याचा पक्षपाती असल्यामुळें त्याजपासून अमुक काम हटकून करून घेऊं अशी हिंमत जवळच्यांसही होत नसे. आपण राष्ट्राचे सेवक आहों अशी त्याची एकनिष्ठ भावना होती. प्रत्यक्ष मृत्यूचेंही भय त्याला वाटलें नाहीं मग इतरांची कथा काय! 'ईश्वर करील तसें होईल, संसार असत्य' हे दादाचे नेभळट शब्द माधवरावास कधीं पटले नाहींत. मनुष्यप्रयत्न बलवत्तर, आपण

† इ. सं. पे. द. सरंजाम यादी नं. ८ वगैरे. मा. रो. १·१८१, १८३, १८५, व ३४१–३७४. ‡ का. सं. प. या १९९. माधवरावास 'ह' उच्चार येत नसे. 'ह' बद्दल तो 'अ' वापरी.

करूं तें होईल, ही गोष्ट स्वोदाहरणानें त्यानें राष्ट्रास पटवून दिली. त्याच्या तीक्ष्ण नजरेंतून कोणती हलकी बाब देखील सुटली नाहीं. निजामानें पुणें जाळल्यानंतर माधवरावानें सालोसाल मेहनत घेऊन शहराची सर्व नवीन रचना केली. लोकांस परत आणून हवेल्या बनविल्या. विशेष सवलती देऊन शहराच्या पेठा वसविल्या. घोड्यांची निपज सुधारण्याकरितां मस्कतहून उत्तम घोडे खरेदी करून आणिले. पानिपतावर तोफखान्यानें दगा दिला ही गोष्ट लक्षांत घेऊन माधवरावानें पुण्यांत व इतरत्र तोफखान्यांची नवीन सिद्धता केली. “दारूगोळ्याची तर्तूद जरूर जाली पाहिजे, सोरा मिळत नाहीं तो कडप्याहून मिळवावा. पुण्यांतील कारखाना चालीस लावावा. तोफांचे फर्मे पाठवावे, गोळ्यांची तर्तूद करावी. सुतार लोहार कसबी लावून गाडे बनवावे. नव्या तोफा ओतावयास बाळाजी वामन पाठविले आहेत. मुंबईस माणसें पाठवून तोफा व माहिती आणवावी. ठिकठिकाणच्या जायबंदी तोफा असतील त्या आणून आटवाव्या, आणि पंचरस काढावे. सत्वर काम चालीस लावावें.” अशा मजकुराचीं शेकडों पत्रें नाना फडणिसास व स्थानिक अंमलदारांस लिहिलेलीं आढळतात. हिंदुस्थानच्या स्वारीसाठीं भेलसा येथें मुद्दाम स्वतंत्र तोफखाना बनविला. *

तत्कालीन प्रघाताप्रमाणें माधवरावाचा ज्योतिषावर भरंवसा होता. महत्त्वाच्या भेटी, संग्राम, तह इत्यादि प्रसंग मुहूर्त पाहून तो योजीत असे. ‘आज दिवस बरा नव्हता म्हणून भेट घेतली नाहीं’ असे उल्लेख वारंवार येतात. मुरली ज्योतिषराय नांवाचा काशीप्रयागकडील कोणी ज्योतिषी त्यास मुहूर्ताची सल्ला देत असे. ‘जानोजी भोसले को ऐसा लिया, जेसा सिंह के आगे मृग.’§

या वर्णनावरून माधवराव म्हणजे सर्व गुणांचा पुतळा होता असें समजण्याचें कारण नाहीं. मनुष्याचे अंगीं दोषही असणारच. माधवरावाचा क्रोध अनावर होता आणि त्या आवेशांत तो काय करील व काय नाहीं हें कळणें कठिण होतें. गंगाधरपंत चंद्रचूड यास स्वहस्तें भर दरबारांत छड्या मारणें हें मालकाच्या इभ्रतीस शोभत नाहीं. पुष्कळदां रागाच्या आवेशांत देहभान सुटून तो खाडकन

---

* मा. रो. २ ले. ७७७–७८२; पे. द. ३९-३७, ७०, ७३, १०८, १२६, १२७, १२८; पे. द. ३७. १८०, २०२, २०८; पे. द २९. २६४ व पृ० ३३६.

§ का. सं. प. या. २१९.

भर दरबारांत एखाद्याच्या तोंडांत मारी, छडी हातीं घेऊन त्यांस ठोकी, हे प्रकार थोरपणास केव्हांही उचित नव्हत. सखारामबापूसारख्यांस सदैव धास्ती वाटे ती ही. जवळ वावरणारे हरिपंत, नाना फडणीस हे देखील सदैव त्याला घाबरत असत. असा क्रोधावेश म्हणजे एक प्रकारचें तात्पुरतें वेडच म्हटलें पाहिजे. हातीं अनावर सत्ता असल्यामुळें त्याला आवरणाराही कोणी नव्हता. प्रामाणिक माणसास धन्यापुढें निर्भीडपणें जाण्याचा संकोच वाटतां नये. माधवरावाचा हा कोपिष्ट प्रकार महशूर होता.

परंतु संतापाच्या लहरीइतकीच प्रेमाची पाखर पसरून आत्मीयतेनें मनुष्य जोडण्याची कलाही या पेशव्यास चांगली साधली होती. स्वतःचीं मुलेंबाळें नाहींत. एक मातुश्री तीही दूर राहणारी असल्यामुळें हाताखालच्या लायक माणसांस स्वकुटुंबियांप्रमाणें वागवून सर्वांना त्यानें आपल्या भजनीं लाविलें. या बाबतींत शाहूच्या वेळची आत्मीय भावना राज्यांतील सर्व लहान-थोरांशीं त्यानें उत्पन्न केली. राक्षसभुवनावर विजय मिळविल्यानंतर पेशवा गोदावरी उतरून औरंगाबादेवर चालून गेला. तेथून ता. ५ सेप्टेंबर स. १७६३ रोजीं त्यानें नाना फडणिसास खालील पत्र लिहिलें: " पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. स्वामीकडून पत्र येऊन सांभाळ होत नाहीं. मोगलाची फौज बुडविली परस्पर ऐकिलें. सविस्तर ल्याहावयास आज्ञा करावी म्हणून लिहिलें ऐशास, मोगल मोडलियाचें वर्तमान तुम्हांस लिहिलेंच आहे. पत्र पावलें असेल, व तुम्हांस दोनतीन पत्रें दर्शनास यावयाकरितां पाठविलींच आहेत, पावलीं असतील. सत्वर यावयाचें करणें. इकडील वर्तमान तरी शहरासमीप स्वारी दाखल जाली. निजाम अलीखान शहरांत आहेत. श्रीकृपेंकरून पारिपत्य लवकरच होईल. छ २६ सफर. गुरुजींनीं पत्र लिहिलें आहे त्यावरून कळेल. तुम्ही हें पत्र पावतांच सत्वर येणें. जरूर पत्र पावतांच यावें. गुरुजी तुमचें चिंतन रात्रंदिवस करीत असतात. अन्न खात नाहींत. जवळ कोणास येऊं देत नाहींत. यांची मर्जी बहुत तुम्हावांचून हैराण आहेत. बळेंबळें एकेक घास गिळतात. आग्रह केला तर ब्राह्मण्यपण करीन म्हणतात. प्रस्तुत तूप महाग जालें आहे, एक बुधला पाठविणें, तरच तुमची भेट होईल. त्यांच्या सांगितल्यावरून लिहिलें आहे." ‡ माधवरावाच्या अनेक सुंदर पत्रांपैकीं हें

‡ सातारा २·३०६.

एक आहे. मुसलमानी तारखेच्या पुढचा मजकूर त्यानें स्वतः लिहिला आहे. त्यांत दिसतें कीं राक्षसभुवनापासून सर्व कारभार तो स्वतः उलगडूं लागला. त्याला आत्मविश्वास निर्माण झाला. लगेच लायक माणसें जमवून तो आपले निष्ठेचे सेवक बनवूं लागला. नाना फडणिसाचा दरख दूर झाल्यामुळें तो उद्विग्न झाला ही गोष्ट गुरुजीनें माधवरावास कळविल्याबरोबर त्यास त्यानें लगेच कारभारावर बोलाविलें. अर्थात् आरंभापासून रामशास्त्र्याप्रमाणेंच हा गुरुजी त्याजवळ निटकवर्ती सल्लागार म्हणून असे हें सिद्ध आहे. गुरुजीच्या वर्तनाचा बारकावा स्वतः पेशवा इतका ठेवतो, यावरून त्याच्या अंतःकरणांत प्रेमपाझर केवढा होता हेंही दिसून येतें. पण असा हा नाना फडणीससुद्धा पेशव्यास कसा कांपत असे त्याचें वर्णन दुसरीकडे आलेंच आहे. सर्व प्रजांना हा पेशवा पितृतुल्य वाटत असे, हा प्रकार स्पष्ट आहे.

समरांगणावर ठासून उभा राहून लष्करी मोहिमा त्वरेनें व नेटानें सिद्धीस नेणारा, सर्वांचें ऐकून स्वतःच्या निश्चयानें तात्काळ कृति करणारा, अनेक बिकट कारभार व भानगडी तडकाफडकी पार पाडणारा, सर्व राज्यावर सतत नजर फिरविणारा, खऱ्याचा पुरस्कर्ता व खोट्याचा कर्दनकाळ, स्वसुखा-संबंधानें निरभिलाषी, रयतेचा कनवाळू असा हा पेशवा माधवराव इतर सर्वांहून वरचढ होय, आणि यास्तव मराठी राष्ट्राचा तो एक निरंतरचा देदीप्यमान हिराच म्हणतां येईल. बाळाजी विश्वनाथानें दूरदृष्टीनें मराठी राज्याचा पहिला नकाशा आखला, बाजीरावानें धडाडीनें त्याच्या मर्यादा गांठल्या, नानासाहेबानें दमखाऊ वृत्तीनें त्याला मांसलत्व आणिलें आणि अशा या राज्यशरीरास माधवरावानें आपल्या नेकीनें परमोच्च भाग्य मिळवून दिलें. लोक बाळाजी विश्वनाथाची तारीफ करीत, बाजीरावास नमत, नाना-साहेबास भजत, आणि माधवरावास वचकत, चुलता व मातोश्री देखील वचकत. नाना व भाऊ जें उदगीर पानिपतवर करूं शकले नाहींत, तें माधवरावानें अल्पावधींत सिद्धीस नेलें. हैदरावर शह बसविला, भोसले निजामांस भजनीं लाविलें, चुलत्यास नरम केलें, बादशहास स्थानावर आणिलें. अशा प्रकारें सर्व प्रकारच्या कृतार्थतेच्या संतोषांत त्यानें परलोकवास पत्करिला.

९. **लायक माणसांची पैदास** — साडेतीन शहाण्यांच्या रचनेंत वर्णिलेला कपटनीतीचा मामला नाहींसा करून माधवरावानें मराठी राज्यांत निदान आपल्या

हयातीपुरतें उच्च वातावरण निर्माण केलें, तेणेंकरून पूर्वीच्या अंमदानींत रुळलेलीं माणसें मागें पडून नवीन इतबारी सेवक तयार झाले. आपसांतील फूट विसरून एकजुटीनें उद्योग करण्याची प्रथा माधवरावानें निर्माण केली. तिच्या आधारावर पुढील राज्य टिकलें. सिंदे, होळकर, गायकवाड सोडले तरी प्रतिनिधि, बाबूजी नाईक, जानोजी भोसले, मुराररावघोरपडे, नारो शंकर, सदाशिव रामचंद्र, सखाराम हरि, चिंतो विठ्ठल, दिवाकर पंडित, गंगोबा तात्या अशा धेंडांचें प्रस्थ मोडून व त्यांचा गर्व उतरवून त्यांना थोडेंबहुत कार्यप्रवण केलेंच, पण या दुटप्पी मंडळीवर पेशवा अवलंबून राहिला नाहीं. गोविंद शिवराम खाजगीवाले, नारो आपाजी, गोपाळराव व पटवर्धन कुटुंब, कृष्णराव काळे, बाबूराव वैद्य, नारो कृष्ण जोशी, महादाजी बल्लाळ गुरुजी, त्रिंबकराव पेठे, रामचंद्र गणेश, विसाजी कृष्ण, नाना व मोरोबा फडणीस, हरिपंत व त्याचे बंधु अशीं किती तरी नवीन होतकरू माणसें माधवरावाचे शिस्तींत बनलीं. सर्वांवर गुरुस्थानीं रामशास्त्री प्रभुणे असून त्याच्या द्वारा एक प्रकारें सामाजिक शुद्धीकरण राज्यांत उत्पन्न झालें. मराठे सरदारांतही या नवीन वृत्तीचा अंगीकार केलेले व माधवरावास भजणारे पुष्कळच लोक होते. शहाजी भापकर, खंडेराव दरेकर, महिपतराव कवडे, आनंदराव व जानोजी धुळप अशीं नानाविध नांवें दाखवितां येतील कीं ज्यांनीं माधवरावास मनापासून साह्य केलें. शत्रुपक्षीय हैदर, निजाम, आरकाटकर महंमदअली व वहुंशीं इंग्रज यांना या पेशव्याचें नवीन मन्वंतर कळून त्यांच्या अंतःकरणांत पेशव्याबद्दल दरारा, आदर व पूज्यबुद्धि उत्पन्न झाली.

गोविंदराव तात्या व महादाजी बल्लाळ गुरुजी या व्यक्ति म्हणजे रामशास्त्र्यांप्रमाणेंच राज्यांतली त्या वेळची मोठी शक्ति होत. कोणाची मध्यस्थी करणें झाल्यास दोनही वादी-प्रतिवादी तात्यांचा निकाल संतोषानें मान्य करीत. खुद्द दादा व पेशवा यांचा कलह मिटविण्याची गोविंदराव तात्यानें शिकस्त केली. तात्या, आमचें एवढें संकट निवारण करा, आम्हांस हात द्या, तारा, अशा आर्जवी भावनेचीं तात्यास गेलेलीं पत्रें वाचलीं म्हणजे शत्रूंना देखील तात्याबद्दल केवढा सन्मान वाटे तें लक्षांत येतें. माधवराव एवढा तापट पण तात्याला अगदीं नमून असे. गोपाळराव पटवर्धन तसाच धाडशी शिपाईगडी, सर्वांआधीं संकटांत उडी घेणारा माधवरावाचा केवळ शरीर-पालक बनला. संग्रामांत किंवा

महत्त्वाच्या भेटींत, वाड्यांत किंवा प्रवासांत छायेप्रमाणें गोपाळराव पेशव्याबरोबर सदैव राहून त्याचा सांभाळ करी. प्रत्यक्ष मातुश्रीचाही पेशव्यास आग्रह कीं गोपाळरावास घेतल्याशिवाय परक्यांच्या भेटीस वगैरे जाऊं नको. गोपाळरावाच्या अकालीं मृत्यूनें पेशव्याला परमावधीचें दुःख झालें. नारोआपाजी तुळशीबागवाले तर त्या वेळचा चीफ एंजिनिअरच म्हणतां येईल. पुणें शहरची रचना हीच त्याची मुख्य कृति असली तरी इतर व्यवहारांतही तो निःस्पृह, कर्तबगार व राज्यहितास जपणारा नामांकित अधिकारी होता. नाना पुरंदरे व त्याचा पुत्र महिपतराव हे सदा माधवरावाच्या भजनीं असत. खुद्द नाना फडणीस माधवरावाचे हयातींत त्याचा उजवा हातच बनला आणि पुढें तर सर्व राज्याचा भार संकटकाळीं त्यानें कसा निभावला तें इतिहास सांगतो. महादाजी बल्लाळ करकरे हा रत्नागिरि जिल्ह्यांतला गृहस्थ दप्तरदारीच्या कामावर असून बहुधा माधवरावाचा शिक्षक असावा, म्हणून माधवराव त्यास गुरुजी नांवानें संबोधीत असे. त्याचा करारी व निस्पृह बाणा लोकांच्या इतका परिचयाचा झाला होता कीं, आज गुरुजी तपासणीस येणार आहेत, ही वार्ता कानीं पडतांच अंमलदार लोक गर्भगळित होत. रामशास्त्र्याचे खालोखाल गुरुजी ही व्यक्ति पुष्कळ काळ पावेतों राज्याचा आधार बनली. सवाई माधवरावाचे मृत्यूपर्यंत त्यानें राष्ट्रसेवा करून उत्कृष्ट लौकिक मिळविला. *

अशा या अनेक मंडळींचीं चरित्रें उपलब्ध आहेत तीं पाहिलीं म्हणजे माणसें हीच दौलत ही माधवरावाची भावना किती सार्थ होती तें कळून येतें. या माणसांतील प्रत्येकाच्या अंगीं कांहींतरी विशिष्ट गुण किंवा कसब होतें. लष्करी काम, हिशेब, वसूल, शेती व लागवड, रस्ते-विहिरींची सोय, परराष्ट्रीय व्यवहार अशा निरनिराळ्या कारभारांत नानाविध माणसें तयार होऊन राज्यास बळकटी आली. राज्याची मोठी हानि हीच कीं अशी ही भरभक्कम तयारी पूर्ण होतांच तिचा चालक नाहींसा व्हावा. सिंदे-होळकरांच्या घरांतील महादजी व अहल्याबाईचें कर्तृत्व माधवरावाच्या मृत्यूनें पुष्कळसें वायां गेलें. तो हयात असता तर उत्तरेंत झालेली मराठ्यांची पीछेहाट बहुधा टळली असती. फक्त ब्राह्मणांस पुढें आणून मराठ्यांस मागें टाकलें असाही दोष माधवरावाचे पदरीं येत नाहीं. पटवर्धनादि ब्राह्मण परिस्थितीनेंच पुढें आले. मुख्य चालक ब्राह्मण असल्या-

* पाहा मावळंकर-सरदेसाई ध० इ० १ पृ० १६५.

मुळें त्यांचेजवळ स्वजातीयांचाच भरणा होणें अपरिहार्य होतें. पण इतर लोकही पेशव्याच्या भजनीं असल्याचीं उदाहरणें थोडीं नाहींत. भोसले वगैरे जुन्या घराण्यांवर माधवरावाचा इतबार केवढा होता हें उमाजी राजे भोसले मुंगीकर यास लिहिलेल्या त्याच्या पत्रांवरून व्यक्त होतें. " खासा स्वारी बाहेर निघाली, तुम्हीं तयारी करून सत्वर निघून येणें ; तुम्हांकडील पथकाचा करार करावा लागतो त्यास तुम्ही आपला कारकून पाठविणें. तुम्हांकडील जखमी लोक पैठणास रवाना केले आहेत. " अशा मजकुरांचीं पत्रें स. १७६८-७२ दरम्यानचीं माधवरावाची समदृष्टि व्यक्त करतात. *

आपणांस लोक फसवितात अशी रघुनाथरावाची भावना असे, ती माधवरावास कधींच शिवली नाहीं. त्याचा आत्मविश्वासच तसा दांडगा होता. तो कोपिष्ट असला तरी सात्त्विक भावनेचा हा कोप लवकर येणारा व लवकर मावळणारा त्या त्या कारणापुरता असे. माधवरावाची ही सात्विकता कारभारांत भरपूर व्यक्त झालेली आढळते. † त्याचें धैर्य खचल्याचें किंवा संकटकाळीं डगमगल्याचें एकही उदाहरण नाहीं. धडाडीनें संकटास तोंड देण्याचा त्याचा बाणा राष्ट्रोद्धारास कारण झाला.

**१०. विहंगमावलोक** — माधवरावाचे अखेरीस मराठी राज्याचा वसूल दशकोटींच्या आंत बाहेर असावा असा अंदाज आहे. त्याचा खासगी खर्च चारपांच लाखांचा होता. चुलत्यास पांच लाखांची नेमणूक त्यानें बांधून दिली ती चांगली सढळ स्वतःचे खर्चाएवढी होती. अंतसमयीं कर्ज वारण्याची उत्कंठा त्यास फार लागली, परंतु पांच चार लाखांचें तें कर्ज सहज लोकांनीं फेडलें. पानिपतपट्टी, इनाम-तिजाई, दहकपट्टी वगैरे कर प्रसंगानुसार सरदारांवर बसवावे लागले तरी सर्वांचीं इनामें व उत्पन्नें माधवरावानें यथान्याय पुढें चालविलीं ; अपहारबुद्धि बिलकूल दाखविली नाहीं. देवस्थानांचा व विद्वानांचा परामर्ष त्यानें पूर्व प्रघातानुरूप घेतला.

शास्त्रीय ज्ञानाची प्रगति माधवरावाचे वेळीं फारशी नसून सामान्यतः त्या-संबंधानें मराठ्यांनीं हेळसांडच केली असें म्हणावें लागतें. तोफांचे कारखाने माधवरावानें घातले, पण ते शास्त्रीय पायावर नसून देशी कारागिरांच्या पिढी-

* इ. सं. मुंगीकर भोसल्यांचे कागदपत्र. † ख. पृ० १२०८, १२७७, १३०३.

ज़ाद अज्ञानानेंच चालले. पाश्चात्यांच्या संसर्गानें पुष्कळ नवीन गोष्टी, औषधें, घड्याळें, यंत्रें वगैरे हिंदुस्थानांत येत, पण त्या कला आपण हस्तगत कराव्या अशी बुद्धि एतद्देशीयांना झाली नाहीं. माधवरावाच्या आजारांत तर औषधींची परीक्षाच झाली. पोर्तुगीझांनीं रुग्ण परीक्षा, शस्त्रक्रिया, औषधयोजना यांचें शास्त्र शंभर दोनशें वर्षांपासूनच हिंदुस्थानांत आणलें होतें. खुद्द पेशव्याच्या आजारांत त्यास उपचार करण्यासाठीं फिरंगी वैद्य पुण्यास आणलेला होता. क्षयरोगाचा उपचार होऊं शकला नाहीं, रोगच असाध्य हा प्रकार वेगळा, पण अलाहबादच्या इंग्रजांपासून रघुनाथ हरीनें पाश्चात्य शास्त्र व विद्या हस्तगत केल्या तो प्रकार माधवरावाचे वेळीं पुणें-मुंबईचे दरम्यान शक्य होता. पेशव्यास औषध देणारा बाबा वैद्य हा जवळ असेच, शिवाय महंमदअली नांवाचा त्याचा हकीमही जवळ वावरणारा असून इंग्रज वकील मॉस्टिन पुण्यास आला त्यानें या मुस्लीम हकीमामार्फत पेशव्याकडे आपलें बस्तान बांधलें. पण तो आल्यावर लवकरच पेशवा मरण पावला. *

छत्रपतींची व प्रधानमंडळाची पूर्वीची व्यवस्था मोडली, तिचे दोष सुधारून नवीन संघटना करण्याची आवश्यकता माधवरावाचे नजरेस चांगली आली होती. लष्कराचे व आरमाराचे जाबते त्यानें नवीन पायावर बांधून दिले. अल्पायुषी झाल्यानें त्याचे मनोरथ जागच्या जागीं राहून पुढें नारायणरावाचाही प्रकार विपरीत घडला तेव्हां सर्वच राज्य ढांसळलें. तथापि त्यामुळें माधवरावाचें कर्तृत्व जास्तच उठावदार दिसतें. मराठशाहींतील अनेक आख्यायिका प्रचलित आहेत त्यांत पुष्कळशा या माधवरावाच्या काळच्या आहेत. कारण त्याची अमदानी इतरांच्या मानानें प्रचंड घडामोडींची झाली. कौटुंबिक भांडणांत तर विलक्षण प्रसंग व घोर व्यक्ति यांचा संबंध येत गेला. माधवरावाचा अंत व पुढें अल्पावकाशांत बनलेला नारायणरावाचा खून हे दोन राष्ट्रीय अनर्थ राष्ट्राच्या हृदयावर कायमचे कोरले गेले. दोहोंनीं राष्ट्राचा अधःपात ओढून आणिला म्हणून अद्यापि त्या प्रसंगांच्या वेदना राष्ट्रास तीव्र भासतात. अर्थात् माधवराव व त्या वेळच्या व्यक्ति यांज संबंधानें पुष्कळशा आख्यायिका जनमनांत स्थिरावल्या आहेत. कोंकणस्थ, देशस्थ, प्रभु इत्यादींचे जातिकलहांचा उद्भवही वरील असामान्य घडामोडींतून झाला असें म्हणतां येईल. तात्पर्यार्थानें बहुतेक आख्यायिका

---

* ऐ. टि. २. १९; Forrest, p. 159; Mostyn's Diary, p. 383.

बिनचूक असून त्यांवरून माधवराव ही व्यक्ति व त्याचा कारभार यासंबंधानें योग्य अंदाज बांधतां येतो. सिंद्यानें हुकमाप्रमाणें लगोलग प्रयाण केलें नाहीं हें थेउरास जातांना पाहून त्याचा गोठ लुटण्यांत येईल अशी धमकी दिल्याबरोबर महादजी निघून गेला. दिल्लींत सिंदे-होळकर बादशहाचे दरबारास जात असतां रस्त्यांत माधवरावाचे जासुदांनीं त्यांस गांठून निकडीचीं पत्रें दिलीं व जबाब घेतल्याशिवाय पुढें पाऊल टाकूं नये, असा धन्याचा हुकूम कळविला, त्याबरोबर जागच्याजागीं त्यांनीं जबाब लिहून दिले. फितुरांचे कागद फाडीत असतां सखारामबापूनें पेशव्यास भेटून कागद फाडूं नयेत म्हणून विनंती केल्यावर बापूच्याच फितुरांचें पुडकें त्यास देऊन पुसलें, " बापू, हे कागद ठेवूं कीं फाडूं तुम्हीच सांगा. " पुडकें उघडून पाहतां तें सर्व स्वतःचें आख्यान. बापू सर्द झाला. नेहमीं जवळ वागत असून प्रत्यक्ष सखारामबापूला पेशव्याची अंतर्वृत्ति उमगली नाहीं. दुसरी एक अशीच आख्यायिका एका संस्कृत पद्यांत जनमुखीं ऐकूं येते, ती अक्षरशः सत्य नसली तरी तत्कालीन लोकभावना व्यक्त करणारी आहे. तें पद्य असें :—

**वृष्टिंविना पंकमहो विचित्रं स्थलद्वये तिष्ठति सार्वकालं ।**
**दानांबुभिर्माधवरायमंदिरे विप्रस्य बाष्पैः खलु रामशास्त्रिणां ॥**

पुण्यांत वावरणारा एक निरीक्षक सांगतो, काय आश्चर्य आहे पहा, या नगरांत पर्जन्य नसतांनाही दोन ठिकाणीं सदा चिखल दृष्टीस पडतो. कोणतीं हो तीं ? एक माधवराय पेशव्याचे राहत्या जागीं दानोदकानें नेहमीं चिखल असतो; आणि तसाच चिखल रामशास्त्र्यांचे घरासमोरही असतो. परीक्षा देऊन दक्षिणा मागण्यास येणारे ब्राह्मण रामशास्त्र्यांच्या कडक तपासणीनें दुःखी होऊन रडत बसतात. त्यांच्या अश्रूंनीं तो चिखल बनतो.

आख्यायिकांतून आणखी एक माधवरावाची कामगिरी नजरेस येते. चहूंकडच्या बातम्या नाना उपायांनीं पैदा करण्याचें एक तंत्रच त्यानें बनविलें. त्याची जास्त वृद्धि पुढें नाना फडणिसानें केली. राजवाडे खं. ६, ले. ४३२ यांत व लोकहितवादींच्या गोष्टींत कांहीं विवेचन माधवरावाच्या बुद्धिकौशल्याचें नमूद आहे तें वाचकांनीं पाहावें. साडेतीन शहाण्यांची बुद्धिमत्ता अशा युक्त्यांनीं प्रगट झाली. माधवरावाचें तेज त्याच्या कागदपत्रांत निदर्शनास येतें तसेंच तत्कालीन आख्यायिकांतही कळून येतें. त्याची कडक शिस्त, निष्पक्षपाती न्याय,

तडफ व प्रजाहिताची कळकळ हे गुण लक्षांत येऊन त्याजबद्दल आपला आदर दुणावत जातो. §

एकंदरींत माधवरावाची अमदानी मराठी राष्ट्राच्या दृष्टीनें अत्यंत स्मरणीय बनली. त्या काळाचें चित्र कादंबरीप्रमाणें मनोरम वाटण्याजोगें आहे. तें इतकें रसभरित व आकर्षक आहे कीं अनेक महाराष्ट्रीय व परस्थ लेखकांनीं त्याजवर आपलें बुद्धिसर्वस्व खर्च केलें आहे. *



§ पे. द. ३९ हा भाग माधवरावाचा राज्यकारभार सांगतो.

* पहा Sir Richard Temple's Oriental Memoirs, pages 393–396.

# सूची

**सूचना** — ( माधवराव या नांवाखालीं सर्व विषय सांपडेल. )

